# मुक्तात्म्यापासून प्रमद्वरेपर्यंत

लेखक

प्रा. रा. शं. वाळिंबे,
एम्. ए. बी. टी.

एप्रिल १९४७ किंमत ५ रु.

# टीकाकारांस पाचारण

महाराष्ट्रांतील प्रसिद्ध कादंबरीकार श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांच्या सर्व कादंबऱ्यांचें सटीक विवेचन मीं प्रस्तुत प्रबंधांत केलें आहे. 'साहित्याचा ध्रुवतारा' या मूल्यविषयक पुस्तकांत जीं वाङ्मयीन मूल्यें मीं प्रमाण मानिलीं आहेत त्यांचा निकष मीं माडखोलकरांच्या कादंबऱ्यांना लाविला आहे. त्याचप्रमाणें 'वाङ्मयीन टीका' या पुस्तकांत टीकेच्या ज्या तत्त्वांना व पद्धतींना मी मान्यता दिलेली आहे त्या तत्त्वांचा व पद्धतींचा यथोचित उपयोग मीं या ठिकाणीं केला आहे. वाङ्मयीन टीका ही केवळ ऐतिहासिक, केवळ तौलनिक, केवळ चरित्रात्मक, केवळ रसास्वादक अथवा केवळ निर्णायक अशी ऐकांतिक स्वरूपाची असूं नये; आणि नवीन टीकाकारांनीं विविध टीकापद्धतींचा समन्वय करण्याचा प्रयत्न करावा असें माझें स्पष्ट मत आहे. त्याचप्रमाणें अनेक संप्रदायांचें ज्ञान प्राप्त करून घेऊन टीकाकारांनीं आपला दृष्टिकोन विशाल व व्यापक करावा असें मला वाटतें. केवळ रसग्रहण करणारी टीका कलाकृतीचें मूल्यमापन करण्यास व निर्णय देण्यास बिचकते. आणि केवळ निर्णायक टीका कलाकृतीचें रसग्रहण करण्यास असमर्थ ठरते. तात्पर्य, टीका केवळ रसग्रहणात्मक असूं नये किंवा केवळ निर्णायकहि असूं नये. तिनें योग्य त्या ठिकाणीं रसास्वाद रसिकतेनें घ्यावा व प्रसंगीं मूल्यपरंपरेवर आधारलेला निर्णयहि द्यावा. प्रशंसनीय गोष्टींची तिनें सहृदयतेनें समुचित प्रशंसा करावी व आक्षेपार्ह गोष्टींवर साधार प्रहारहि करावे आणि कलाकृतींचें अथवा लेखकाचें माहात्म्य कोणत्या प्रतीचें आहे हें ठरवितांना मुळींच कचरूं नये. कलाकृतींचें अथवा लेखकाचें माहात्म्य ठरवितांना कलात्मक (artistic) निकषांचा जसा उपयोग करावयास पाहिजे तसाच कलाबाह्य (non-artistic) निकषांचाहि उपयोग करावयास पाहिजे असें मला निश्चयानें वाटतें.

'तटस्थपणा' (disinterestedness) हा टीकेचा महत्त्वाचा गुण आहे असे मॅथ्यू आर्नोल्ड मानतो. हा गुण संपूर्णपणें अंगीं बाणणें

अशक्य असलें तरी त्याबाबतींत थोडासा प्रयत्न मी केलेला आहे असें दिसून येईल. कलाकृतींतील रसाचें व गुणांचें ग्रहण करतां यावें व तिच्यांतील आक्षेपार्ह भागावर टीका करतां यावी हा याचा उद्देश होय. आणि यामुळेंच माडखोलकरांच्या कादंबऱ्यातील प्रशंसनीय गोष्टींची मी यथोचित प्रशंसा केली आहे व आक्षेपार्ह गोष्टींवर कांहीं ठिकाणीं सौम्य व कांहीं ठिकाणीं प्रखर टीका केली आहे. पण ही टीका कोठेंहि भरपूर आधाराशिवाय केलेली नसल्यामुळें कोणासहि बिचकण्याचें कारण नाहीं.

प्रस्तुत प्रबंधात माडखोलकरांच्या प्रत्येक कादंबरीचें स्वतंत्रपणें विवेचन केलेलें असल्यामुळें प्रत्येक प्रकरण स्वतंत्र व स्वयंपूर्ण आहे. पण, हें विवेचन कालानुक्रमानें केलेलें असल्यामुळें त्यांत एक प्रकारची सूत्रबद्धताहि आहे असें दिसून येईल. यायोगें माडखोलकरांच्या कलेचा अथवा विचारांचा विकास कसा होत गेला आहे व तत्कालीन विविध घटनांचा त्यांनीं कसा परामर्श घेतला आहे हें समजण्यास मदत होईल.

सर्व कादंबऱ्यांचें सटीक विवेचन संपल्यानंतर त्याच्यात ज्या स्त्रियांचीं चित्रें माडखोलकरांनीं रंगविलीं आहेत त्यांच्या भावनांचें, विकारांचें व विचारांचें भरपूर विश्लेषण एका स्वतंत्र प्रकरणांत केलें आहे. आणि शेवटीं 'फलश्रुति' या ५४ पृष्ठांच्या प्रकरणांत माडखोलकरांच्या कलेचीं वैशिष्ट्यें, त्यांनीं केलेलीं शृंगारिक व कामुक वर्णनें, श्री. भेंडे यांनीं या बाबतींत केलेली त्यांची तरफदारी, सामाजिक प्रश्न, त्यांच्या कादंबऱ्यातील राजकारणाचें स्वरूप इत्यादि विषयांचा साकल्यानें व सांगोपांग विचार केला आहे. प्रस्तुत प्रबंधाची ही अशी रूपरेषा आहे.

माडखोलकरांच्या कादंबऱ्यांत पात्रांचे कांहीं नमुने पुन: पुन: आले आहेत, कांहीं विचारांची व कल्पनांची अनेक ठिकाणीं पुनरुक्ति झालेली आहे, एकाच प्रकारच्या राजकीय व इतर चर्चा थोड्या फार फरकानें अनेक ठिकाणीं आल्या आहेत. प्रत्येक कादंबरीची मी स्वतंत्रपणें चर्चा केली असल्यामुळें या विषयांची थोडीशी पुनरुक्ति माझ्याहि विवेचनांत होणें अगदीं अपरिहार्य आहे.

गांधीजी व त्यांचें तत्त्वज्ञान या विषयांवर माडखोलकरांनीं आपल्या अनेक पात्रांच्या द्वारें अत्यंत प्रखर टीका केलेली आहे. या टीकेचें विश्ले-

षण करणें मला अगत्याचें वाटलें. आणि हें विश्लेषण करून माडखोलकरांच्या या टीकापद्धतीवर अगदीं सडेतोडपणें मीहि उलट तितकीच प्रखर टीका केली आहे. पण ही टीका गांधीजींविषयींच्या वैयक्तिक अभिनिवेशानें अथवा दुराग्रहानें केलेली नसून अगदीं अपक्षपातीपणानें केली आहे हें येथें मुद्दाम नमूद करून ठेवीत आहें. समग्र ग्रंथ न वाचतांच केवळ ऐकीव माहितीवर त्या ग्रंथाविषयीं प्रतिकूल ग्रह बनवून एखाद्या वाक्यांत बेछूट निर्णय देण्याची विचित्र लालसा बाळगणारे कांहीं महाभाग मधून मधून विहरताना दिसतात. मीं माडखोलकरांवर कडक टीका केली आहे याचा बभ्रा करण्यापूर्वी अशा महाभागानीं माझ्या टीकेचें स्वरूप व तिचीं कारणें याची माहिती अगोदर मुळांतून करून घ्यावी. त्यांच्या सोयीसाठीं ही माहिती कोठें मिळेल हें सांगतों. माझी या बाबतींतील भूमिका ९२–९४, १२४–१२६ व २७८–२८० या पृष्ठावर मी अगदीं स्पष्टपणें विशद केली आहे. ही बाबत विशेष महत्त्वाची असल्यामुळें तिचा येथें मुद्दाम उल्लेख केला आहे.

त्याचप्रमाणें माडखोलकराच्या कादंबऱ्यांत अनेक ठिकाणीं आढळणारीं उत्तान शृंगारिक व भडक कामुक वर्णनें या गोष्टींवरहि मी कडक टीका केली आहे. एतद्विषय माझी भूमिका निःसंदिग्धपणें मीं ९१, ९२, १७३–१७६, १८३, १८४, २४७–२४९, २५१, २५३, २५९ या पृष्ठावर सविस्तर मांडली आहे. टीकाकारांनीं हीं पृष्ठें सावधान चित्तानें पहावींत.

"......अश्लील किंवा अनैतिक भासणाऱ्या वाङ्मयावर टीका करतांना तें वाङ्मय निर्माण करणाराचा हेतु व त्याच्या वाचनानें मनावर होणारा परिणाम या दोन्हीही गोष्टी प्रथम लक्षांत घेतल्या पाहिजेत" असें स्पष्ट मत खुद्द माडखोलकरांनीं 'वाङ्मय आणि नीति' या आपल्या निबंधांत मांडलें आहे.* त्याचप्रमाणें 'उद्बोधन' हें ललितवाङ्मयाचें कार्य आहे असा सिद्धांत मंडलेश्वर येथील साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षस्थानावरून

* माडखोलकरांचें हें मत मला संपूर्णपणें मान्य आहे. 'साहित्याचा ध्रुवतारा' या पुस्तकांत पृ. ११९–१२२ या ठिकाणीं या सिद्धांताचा मीं भरपूर ऊहापोह केला आहे.

त्यांनीं मांडला होता. याच सिद्धांतांचा निकष मी माडखोलकरांच्या कादंबऱ्यांच्या बाबतींत वापरून त्यांचें मूल्यमापन केलें तर त्यांत कांहींहि आक्षेपार्ह नाहीं! ' दुहेरी जीवन ' या कादंबरीची चर्चा चालू असतां उपर्युक्त सिद्धांतांपैकीं पहिल्या सिद्धांताचा निकष वापरूनच मी माडखोलकरावर टीका केली आहे. यासाठीं १०५–१०९ व २५९ हीं पृष्ठें अगत्यपूर्वक पहावीं.

माडखोलकराचे मित्र श्री. भेंडे यांनीं अतिरिक्त शृंगारिक वर्णनांच्या बाबतींत माडखोलकरांची तरफदारी करितां करितां त्यांना भलत्याच एका आपत्तींत न कळत लोटलें आहे. श्री. भेंडे यांच्या एतद्विषयक विवेचनाचा परामर्श घेतांना मला नाइलाजास्तव मनोविश्लेषणाचा बराचसा आधार घ्यावा लागला आहे. २६२ ते २६७ या पृष्ठांवर हें मनोविश्लेषण आढळेल. हें कलावंताचें मनोविश्लेषण आहे. ' शाप ' या कादंबरीतील निशिकांताचेंहि मनोविश्लेषण करणें मला भाग पडलें. हें ६८ व ६९ या पृष्ठांवर आढळेल. मनोविश्लेषणशास्त्राचा आपल्याकडे फारसा व्यासंग होत नाहीं ही प्रो. बनहट्टी याची तक्रार रास्त आहे. तो व्यासंग अवश्य व्हावा आणि कादंबऱ्यांतील अथवा नाटकातील पात्रांचें व खुद्द लेखकाचें सुद्धां कांहीं मर्यादेपर्यंत मनोविश्लेषण करावयास मुळींच हरकत नाहीं असें माझे स्पष्ट मत आहे. येवढ्या विश्लेषणाला कोणीहि बिचकूं नये.

माडखोलकरांवर ज्या ठिकाणीं मी विशेष टीका केली आहे अशीं ठिकाणें मुद्दाम वर उद्धृत केलीं आहेत. या टीकेच्या जोडीला सहृदयतेनें व रसिकतेनें त्यांच्या कृतींतील आस्वाद्य भागाचें रसग्रहण करतांनाहि माझी लेखणी थोडीसुद्धां अडली नाहीं. ' भंगलेलें देऊळ ' हें ३४ पृष्ठांचें सबंध प्रकरण व 'चंदनवाडी' हें २१ पृष्ठांचें सबंध प्रकरण हे याचे स्पष्ट पुरावे आहेत. विशेषत: ५४, १९६–२०२, २३९–२४६ हीं पृष्ठें यासाठीं जरूर पहावीं. आक्षेपार्ह गोष्टींवर प्रसंगोपात्त प्रखर टीका करणारी माझी लेखणी प्रशंसनीय गोष्टींची यथायोग्य प्रशंसा करतांना मुळींच संकोच करीत नाहीं हें सिद्ध करण्यासाठींच वरील उदाहरणें नमूद केलीं आहेत.

चालू युगांतील साहित्याच्या कार्याविषयींचें माझे स्वतःचे सिद्धान्त पृ. २७५–२७७ याठिकाणीं आढळतील. कादंबऱ्यांतील राजकीय व इतर चर्चाविषयींचीं माझीं मतें पृ. १७, ८७, ९२, ९३, २८७, २८८ या

ठिकाणीं मांडलेलीं आहेत. कोणतीं मूल्यें व कोणते निकष वापरून मी माडखोलकरांच्या कादंबऱ्यांचें विवेचन केलें आहे याविषयीं कोणाच्याहि मनांत संदेह राहूं नये व माझ्या म्हणण्याचा त्याला विपर्यास करतां येऊं नये यासाठींच केवळ इतका विस्तार करावा लागला हें अगदीं खरें आहे.

अतिरिक्त स्तुति हा मराठी टीकेला अलिकडे एक नवीनच रोग जडूं पहात आहे. 'परस्परं भावयन्तः' असें कांहीं लोक कांहींतरी निमित्त शोधून आपापले नगारे शक्य तितक्या जोरानें वाजविण्याचा प्रयत्न करीत आहेत, आणि स्नेह्यां–सोबत्यांची आडमाप स्तुति मतलबीपणानें करण्यांत धन्यता मानीत आहेत. केवळ बेफाट स्तुतीला चटावलेल्या अशा सभ्य गृहस्थांपैकीं एखाद्याचें माथें आपल्या प्रिय दैवतावर टीका झालेली पाहून भडकण्याचा संभव आहे. सदर सभ्य गृहस्थांनीं मीं काय लिहिलें आहे तें प्रथम मुळांतून वाचावें आणि आपली बाजू पक्की आहे अशी खात्री करून घेऊन मगच आपली आयुधें परजावीं.

ऱ्हस्व–दीर्घ व काना मात्रा यांच्या चुका, 'व' च्या ऐवजीं 'ब', विराम-चिन्हांच्या चुका इत्यादि सहज लक्षांत येणारे मुद्रणदोष वाचकांनीं सुधारून घ्यावेत अशी त्यांना प्रार्थना आहे. कांहीं मुद्रणदोषाचा येथें मुद्दाम उल्लेख करीत आहे. पृ. १९ ओळ १० 'राकीय' या ऐवजीं 'राजकीय' वाचावें; पृ. ७२ ओळ ८ 'कलाविकास' या ऐवजी 'कलाविलास' वाचावें; पृ. १४५ ओळ १, 'असलेली ही चळवळ अत्याचारी' हे चार शब्द पुनरुक्त असल्यामुळें वगळावे; पृ. १७७ ओळ ७, 'अंतदर्शन' याऐवजीं 'अंतर्दर्शन' वाचावें; पृ. १९९ ओळ १५, 'रखमा' याऐवजीं 'येसू' असा शब्द पाहिजे. इंग्रजी अवतरणांत क्वचित् स्पेलिंगची चूक झाली असली तरी ती सहज लक्षांत येण्यासारखी आहे.

हा प्रबंध छापण्याची व तो प्रकाशित करण्याची जबाबदारी पत्करून ती पार पाडल्याबद्दल 'जनार्दन सदाशिव लिमिटेड' या प्रकाशनसंस्थेचे आभार मानणें जरूर आहे.

पुणें शहर,<br>
वर्षप्रतिपदा,<br>
२३ मार्च १९४७

रा. शं. वाळिंबे

# अनुक्रमणिका


| | | पृष्ठें |
|---|---|---|
| १ | मुक्तात्मा | १— २१ |
| २ | भंगलेलें देऊळ | २२— ५६ |
| ३ | शाप | ५७— ७४ |
| ४ | कांता | ७५— ९४ |
| ५ | दुहेरी जीवन | ९५—१०९ |
| ६ | मुखवटे | ११०—१३३ |
| ७ | नवे संसार | १३४—१६४ |
| ८ | नागकन्या | १६५—१७६ |
| ९ | डाकबंगला | १७७—१८४ |
| १० | चंदनवाडी | १८५—२०५ |
| ११ | प्रमद्वरा | २०६—२१४ |
| १२ | माडखोलकरांच्या कादंबऱ्यांतील स्त्रीजीवन | २१५—२३६ |
| १३ | फलश्रुति | २३७—२९० |

# मुक्तात्म्यापासून प्रमद्वरेपर्यंत

## १

## मुक्तात्मा

'मुक्तात्मा' ही श्री माडखोलकरांची पहिली कादंबरी १९३३ च्या पहिल्या सहामाहींत प्रसिद्ध झाली. यापूर्वी डॉ. केतकर यांच्या 'गोंड-वनांतील प्रियंवदा', 'परागंदा', 'आशावादी', 'गांवसासू', 'ब्राह्मणकन्या' या कादंबऱ्या प्रसिद्ध होऊन गेल्या होत्या. 'कुलाब्याची दांडी', 'जादूगार', 'दौलत', 'अटकेपार' या प्रो. फडके यांच्या कादंबऱ्याहि मराठी वाच-कांच्यापुढें होत्या. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांतील समाजशास्त्रीय प्रश्नांची विस्तृत चर्चा, प्रो. वामनराव जोशी यांच्या कादंबऱ्यांतील तात्त्विक चर्चा आणि पराकाष्ठेच्या ललित भाषेनें नटलेल्या प्रो. फडके याच्या प्रणयप्रधान कादंबऱ्यांतील 'मदिर' वातावरण यांचा मराठी वाचकांना हा वेळपर्यंत भरपूर परिचय झालेला होता. अशा या कालखंडांत, टीकाकार म्हणून १९२० च्या सुमारास मराठी वाचकांना परिचित झालेल्या माडखोल-करांनीं आपली पहिली राजकीय कादंबरी लिहिली व आपल्या प्रतिभेचा दुसरा पैलू रसिकांच्या दृष्टोत्पत्तीस आणला.

दहशतवादी चळवळीच्या प्राथमिक अवस्थेतील महाराष्ट्रामधील समाज-वादी कार्यकर्त्यांच्या कामगिरीचें वर्णन करणें हा या कादंबरीचा मुख्य उद्देश आहे. "आमच्या आरंभींच्या चळवळीचं तुम्ही या कादंबरींत हुबेहूब वर्णन केलं आहे" हें प्रसिद्ध कम्युनिस्ट कार्यकर्ते श्री. श्री. अ. डांगे यांचें विधान माडखोलकरांनीं 'दोन तपें' या आपल्या आत्म-चरित्रांत उद्‌धृत केलें आहे. यावरून प्रस्तुत कादंबरींतील मध्यवर्ती विषयाच्या स्वरूपासंबंधीं कांहीं संदेह राहण्याचें कारण नाहीं. दहशतवादी चळवळीमधील घटनांच्या जोडीला ध्येयवादी कार्यकर्त्यांची मोहवशता, सामा-जिक व राजकीय क्षेत्रांत वावरणाऱ्या विविध व्यक्तींच्या स्वभावांतील वैचित्र्य

इत्यादि गोष्टी अर्थातच आहेत. पण, चंद्रशेखर या क्रांतिकारक तरुणाच्या जीवनातील घटना हा कादंबरीचा मध्यबिंदु असून इतर घटना पार्श्वभूमि म्हणून योजिलेल्या आहेत.

जिचा मध्यवर्ती विषय संपूर्णपणें राजकीय आहे व मुख्य विषयाशीं साक्षात् संबद्ध असलेल्या घटनाहि बहुंशीं राजकीय आहेत अशी ही मराठींतील पहिलीच महत्त्वाची कादंबरी असल्यामुळें तिच्यांतील राजकारणाचें चिकित्सक दृष्टीनें परीक्षण करणें आवश्यक झालें आहे. हें करीत असतांच तिच्यांतील ध्येयवाद व प्रणय याहि गोष्टींचें विश्लेषण करणें अगत्याचें आहे.

कादंबरीचा नायक चंद्रशेखर ध्येयनिष्ठ व करारी क्रांतिवीर आहे. ध्येयनिष्ठा व करारीपणा या गुणांच्या जोडीलाच बुद्धिमत्ता व साहस हे गुणहि त्याच्या ठायीं विपुल प्रमाणांत आहेत. आपण नायकिणीच्या पोटीं जन्मलों असून पित्याचें नाव आपणाला सांगतां येत नाहीं ही घटना ठाऊक झाल्यापासून उपनिषदांतील सत्यकाम प्रमाणें तो आपली जन्मकथा दडविण्याची यत्किंचित् खटपट करीत नाहीं. सत्याचा उच्चार करण्याच्या बाबतींत जो निर्भयपणा तो दाखवितो तोच निर्भयपणा कॉलेजांत सर दीनानाथ यांच्या तुकारामावरील इंग्रजी व्याख्यानाच्या प्रसंगीं तो दाखवितो. तुकारामाविषयींचें व्याख्यान तुकारामाच्या मातृभाषेंतच झालें पाहिजे असा आग्रह धरून ती सभा उधळून लावावयासहि तो कमी करीत नाहीं. त्याचा आत्मविश्वास जबर असून स्वाभिमानहि धारदार आहे. मोहाच्या आहारीं न जाण्यासाठीं वृत्तीचा जो कणखरपणा लागतो तोहि त्याच्या ठिकाणीं आहे. पुरती मिसरूडसुद्धां ज्याला अजून फुटली नाहीं अशा या ज्वलज्जहाल दहशतवादी नायकाच्या 'टपोऱ्या, निळसर' डोळयांत 'आत्मप्रत्ययाचें इतकें उद्दाम तेज होतें कीं, गगनाचा भेद करणाऱ्या उत्तुंग शैलाग्रांचा नीलिमा पाहून जसा धाक वाटावा, तशा तऱ्हेचा वचक त्याची दृष्टभेट होताच मनांत उत्पन्न होत असे.' (पृ. १०७)

अशा या नायकाचें व केशवचें प्रेम शब्दातीत होतें. दोघांच्या वयांत तीन चार वर्षांचेंच अंतर होतें. केशवची आई पार्वती स्वभाववैषम्यामुळें पतीच्या जीवनाशीं केव्हांहि समरस होऊं शकली नाहीं. तिच्या जीवनाचा,

तिच्या आकांक्षांचा, तिच्या अभिरुचींचा अगदीं कोंडमारा झाला होता. असा कोंडमारा निदान आपल्या मुलाचा तरी होऊं नये अशी तिची तळमळ होती. केशवच्या बुद्धीला 'घर' नाहीं आणि कोणत्याहि प्रबळ कल्पनेची छाप त्याच्यावर सहज पडते हें तिनें ओळखलें असल्यामुळें ती त्याला म्हणते, "स्वत:च्या आयुष्याला इच्छेस येईल तसं वळण लावण्याचा आम्हा बायकांना नसलेला हक्क तुम्हां पुरुषांना आहे......आपला आवडता व्यवसाय करण्यांत जरी अपेश आलं तरी पत्करलं. त्या अपेशात सुद्धां हृदयाच्या हांकेला ओ दिल्याचं—स्वत:च्या बुद्धीनं दाखविलेल्या ध्येयाला अनुसरल्याचं समाधान असतं......स्वत:च्या मनाला तळमळत ठेवून अन् बुद्धीच्या संवेदनांना दाबून टाकून केलेल्या व्यवसायांत यश मिळालं, तरी त्यांत सुख नाहीं,—त्यांत आत्मविकासाचा आनंद नाहीं." शिक्षणाच्या निमित्तानें केशव मुंबईस आपले काका भगवंतराव यांच्याकडे रहात असतो. ललिता ही भगवंतरावांची मुलगी. स्वाभाविकच त्या दोघांचें अत्यंत निकट साहचर्य आहे. पण दोघांचे स्वभाव मात्र अत्यंत भिन्न आहेत. तिचा आनंदी आणि प्रेमळ स्वभाव पाहून ती 'सुखलोलुप' आहे असें केशवला वाटे. तिचा स्वभाव केशवप्रमाणें ध्येयांत रंगून जाणारा नव्हता. ती पराकाष्ठेची 'स्वाभिमुख' होती.

या भावंडांत चालणारे बौद्धिक वाद मात्र चकित करून सोडणारे आहेत. सोळा वर्षांच्या आंतबाहेर असलेली हीं मुलें स्त्रीजातीचा प्रभाव, स्त्रीसौंदर्याचें मर्म इत्यादि विषयावर खरोखरी एखाद्या पंडिताप्रमाणें प्रवचन करितात हें पाहून आपल्या हीन बुद्धीची वाचकाला कीव करावीशी वाटल्यास कांहीं नवल नाहीं. 'निर्दोषदर्शना कन्यका' हें जीमूतवाहनाचें सूत्र ललितेला विशद करून सांगणारा केशव कीट्सच्या सॉनेटमधील अवतरणें देतो. उलट, ललिताहि ताबे, वर्डस्वर्थ इत्यादींच्या काव्यात अगदीं मुरलेली दिसते. कलेचें प्रयोजन व कलावंताचें ध्येय या विषयावरहि ती एक विद्वत्ताप्रचुर व्याख्यान देते. (पृ. ५८) तिचें म्हणणें असें कीं, मानवी जीवित हें आधींच दुःखमय असल्यामुळें कवींनीं त्या दुःखाचा भार हलका करावयास पाहिजे. या अपूर्ण जगाला पूर्णता देण्यासाठींच कलावंताचा अवतार असतो असें तिचें मत आहे. केशव ध्येयवादी आहे,

त्याचें जीवन ‘ विचारमय ’ आहे. यामुळें ललितेचे कलाविषयक विचार त्याला मान्य नाहींत. ‘ आयुष्य हें केवळ पुनवेचें चादणें नव्हे ’ असें त्याला वाटतें. ‘ आयुष्य हें कितीतरी विकट आणि भीषण आहे ’ याची त्याला जाणीव आहे. वाङ्मयसेवक होण्याचें ध्येय इतरांनीं त्याच्यापुढें ठेविलें होतें. पण त्या ध्येयावरील त्याचा विश्वास उडूं लागला आहे. नुसत्या वाङ्मयसेवेनें देशाभिमानी मनुष्याचें समाधान होणें शक्य नाहीं अशी खात्री झाल्यामुळें ‘ चंद्रशेखर जात आहे त्या मार्गानें ’ जाण्याचें विचार त्याच्या मनांत येतात.

ललितेची मैत्रीण सुमति सफ्रेजेट आहे. स्त्रियांचा दर्जा सुधारून त्या सर्वच बाबतींत पुरुषांच्या बरोबरीला यावयास पाहिजेत असा तिचा आग्रह आहे.

ललितेच्या सुखलोलुपतेमुळें स्वतःचे ध्येयवादी विचार तिच्याजवळ व्यक्त करावयास केशव भीत असे. पण ललितेचें मात्र केशववर प्रेम असतें. तिचें त्याच्यावर जें प्रेम आहे त्याचें स्वरूप मात्र अलौकिक आहे. केवळ भाऊ म्हणून किंवा केवळ प्रियकर म्हणून तो तिला आवडतो असें नव्हे. द्रौपदीला जसा श्रीकृष्ण प्रिय होता तसा तो तिला प्रिय वाटतो. “ एखाद्या तरुणाला प्रियकर न मानतांहि त्याच्यावर अगदीं निराळ्या प्रकारचं उत्कट प्रेम करणं स्त्रीला अशक्य आहे कां ? ” असा तिचा सवाल आहे. प्रियकराविषयीं ज्या भावना मनांत उत्पन्न व्हाव्या लागतात तसल्या भावना केशवविषयीं आपल्या मनांत केव्हांहि आल्या नाहींत अशी ती ग्वाही देत आहे. ( पृ. ६५ )

केशवचें मन हळुहळू सुमतीकडे ओढ घेऊं लागतें. मग मात्र केशव आपल्याला अंतरला असें वाटून ललिता खिन्न होऊं लागते. यावर सुमति तिला पुरुषांना स्त्रियांकडून बौद्धिक प्रेमाची अपेक्षा असते या विषयावर एक प्रवचन ऐकविते. केशवच्या बौद्धिक जीवनाशीं ललितेचा काडी-इतकाहि संबंध नाहीं, असेल तर विरोधच आहे असें सुमतीचें म्हणणें आहे. केशवचें मन सुमतीकडे आकृष्ट झालें याबद्दल ललितेला वाईट वाटलें तर त्यांत विशेष कांहीं नाहीं. पण नवल असें कीं, केशवला चंद्रशेखरचें आकर्षण फार आहे याचेंहि तिला पुढें वैषम्य वाटूं लागतें.

"आमच्या प्रेमांत तिसरें कोणीहि वांटेकरी झालेलं मला सहन होणार नाहीं" असें ती म्हणते. पण 'प्रेमविषयाचा पदोपदीं ताबा' मागणारें ललितेचें हें प्रेम सुमतीला पसंत नाहीं. प्रेमविषयाच्या सुखांत स्वतःचें सुख पाहण्याची ज्याची तयारी असेल तेंच खरें प्रेम अशी तिची प्रेमाची व्याख्या आहे.

## 'प्रबोधन' कचेरींतील अड्डा

नानासाहेब हे 'प्रबोधन' या मासिकाचे व 'प्रागतिक' या साप्ताहिकाचे चालक. 'गिरगांवांतील गावठी नॉर्थक्लिफ' अशी यांची ख्याति होती. केशवचे काका भगवंतराव हे 'प्रागतिका'चे संपादक होते. नानासाहेबांचीं मतें सर्वच बाबतींत प्रतिगामी असून ते संधिसाधु होते. उलट भगवंतरावांची भूमिका विचारवंताची आणि प्रगतिशील होती. समाजसत्तावादावर त्यांचा विश्वास असून टॉल्स्टॉय व कार्ल् मार्क्स यांच्या अध्ययनामुळें हिंदी राजकारणांतील प्राय: कोणत्याच पक्षाविषयीं त्याना आपलेपणा राहिला नव्हता. नानासाहेब पूर्णपणें स्वार्थी होते; उलट भगवंतराव ध्येयवादी होते.

या वर्तमानपत्राच्या कचेरींत नित्य जमणाऱ्या मंडळींपैकीं प्रो. राळे, रावसाहेब भुजंगराव देशमुख, भिषग्भास्कर शास्त्रीबुवा, बबनराव इत्यादि मंडळी प्रमुख होती. वर्गांत शिकवतांना मुद्दाम विषयांतर करून प्रचलित राजकारणावर व्याख्यान झोडण्याची प्रो. राळे यांना खोड होती. नेमस्तांच्या राजकारणाची तरफदारी करून ते राष्ट्रीय व क्रांतिवादी पुढाऱ्यांना सडकून शिव्या देत. रावसाहेब हे सी. आय. डी. अधिकारी होते. देशभक्तीचा बाह्यात्कारी देखावा करण्यांत ते मोठे तरबेज होते. यासाठीं इतिहाससंशोधन, पोवाडेगायन इत्यादि युक्त्या ते योजीत असत. 'क्रांतिकारकांच्या पोटांत शिरून त्यांचीं आतडीं बाहेर काढणारा पाताळयंत्री अधिकारी' असा त्यांचा लौकिक होता. त्यांची वाणी रसाळ असून लेखणी 'वक्तृत्वपूर्ण' होती. सर्व प्रकारच्या नाटकी ढंगांत ते तरबेज होते. नोकरींत असतांनासुद्धां ते स्वतःला देशाभिमानी म्हणवीत असत. या अभिमानाच्या प्रदर्शनाच्या जोरावरच त्यांनीं महाराष्ट्रांतल्या क्रांतिकारकांच्या

गोटांत प्रवेश मिळवून अनेक धाडसी तरुणांना काळें पाणी दाखविलें असा प्रवाद होता. बन्नराव हे मुंबईतील एक विख्यात कलमबहाद्दर होते. कोणत्याहि गोष्टीतील दोष तेवढेच नेमके हुडकून काढावयाचे असा त्यांचा स्वभाव होता. जगांतली कोणतीहि गोष्ट (अर्थात स्वतः शिवाय) त्याना कधीं आदरणीय वाटली नाहीं. कंड्या आणि कुचाळ्या त्यांच्या खिशांत नेहमी भरलेल्या असत. या गांवगप्पांचा मसाला आपल्या लेखांत भरून थोर लोकांची बदनामी करावयास त्याना कसलीहि शंका वाटत नसे. असा हा मारेकरी पत्रकार 'प्रबोधन' कचेरींतील अड्डयांत नित्य नवीन बातमी गटारयंत्रावरून मिळवून आणून तिचा प्रसार करीत असे.

'प्रबोधन' कचेरींतील हा शनिवारचा अड्डा विशेष गाजलेला होता. त्यांतील सदस्यांचा सामान्यधर्म असा कीं, 'ते सारेच या दोषपूर्ण जगावर कोणत्या ना कोणत्या तरी कारणानें नाराज झालेले व म्हणून इतराना शिव्या देण्याची प्रत्येक पर्वणी साधावयाला उत्सुक असे होते.'

## गांवठी मादाम द स्ताअल

'प्रबोधन' अड्डयांतील बहुतेक साऱ्या वल्ली प्रेमाबाईच्या घरच्या अड्डयांतहि जमत असत. प्रेमाबाई ऊर्फ प्रमिलाबाई एक और बाई होती. बालपणींच वैधव्य आल्यानंतर रावसाहेब देशमुखांच्या कृपेनें तिला शाळाखात्यांत 'आरोग्यनिरीक्षिके'ची जागा मिळते. यामुळें इतरांपेक्षां रावसाहेबांची तिच्याशीं विशेषच सलगी असल्यास कांहीं नवल नाहीं. ही बाई कोण आहे! संभावित आणि उंची वेश्या? हिच्याकडे हे सारे लोक कशासाठीं जमतात? प्रो. राळे व शास्त्रीबुवा तिच्याविषयीं आपसांत शृंगारिक व चावट उद्‌गार अनेक वेळां काढतात. रावसाहेब तर इतर सारे लोक निघून गेल्यावर एकांतांत तिच्याशीं शारीरिक लगटसुद्धां करतात. ते तिला लाडिकपणें एकेरी हाक मारतात आणि ती त्याना मोठ्या प्रेमानें जेवावयाला वाढते.

पण अशी ही 'प्रेमळ' ललना कोणाशींहि लग्न करावयास मात्र तयार होत नाहीं. 'जग ही निव्वळ भोगभूमि' असून 'ते भोग जितके विविध आणि उच्च तितकें जीवन व्यापक आणि आनंदमय' असें तिचें

तत्त्वज्ञान होतें. आणि म्हणून, प्रत्येक संधीचा मोठया धूर्तपणें उपयोग करून घेऊन ' संसाराला गोडी आणणाऱ्या शास्त्रांत आणि कलांत ती मनस्विनी हळुहळु पारंगत झाली होती.'

या ' मनस्विनी ' नें एक नाटक देखील लिहिलें होतें; आणि या नाटकानें म्हणे तिला मोठी प्रतिष्ठा मिळून ती ' विद्वानाचें विश्रंभस्थान ' होऊन बसली होती. नुसती साहित्यसेवा करून थांबली तर ती कलावती कसली ? एखादा रसिक ' साहित्यिक ' तिला ' अनिर्बंध प्रणयाच्या लता कुंजापर्यंत सानुनय खेळवीत ' नेण्यासहि कमी करीत नसे. ही "पृथुजघना ' अनेकांना खेळवीत असे हें खरें असलें तरी कोणताहि खेळ तिनें अंगलट मात्र येऊं दिला नाहीं. स्वतःच्या तारुण्याला झळ लागेल असा प्रसंग ती मोठ्या कटाक्षानें टाळीत असे.

अशी मोठी इरसाल आणि छटेल बाई आहे ही. प्रो. राळे तिला मोठ्या प्रेमानें ' मादाम द स्ताअल ' म्हणत असत. हें पात्र खरोखरी एतद्देशीय दिसत नाहीं. एखाद्या फ्रेंच कादंबरींतून अथवा नाटकांतून ते उसनें घेतलें असावें किंवा प्रत्यक्ष मादाम द स्ताअल या प्रसिद्ध बाईची सुद्धां ही नक्कल असावी असा दाट वहीम येतो. ही कलावती प्रो. राळे इत्यादि महानुभावांबरोबर जुहूच्या ' तालीवनमर्मर ' समुद्रतीरावर जाते, सिनेमालासुद्धा जाते. तिच्या दिवाणखान्याचें वर्णन करतांना पूर्वोक्त कलमबहाद्दर बबनराव मोठया रसिकतेनें म्हणतो, " तुमचा हा दिवाणखाना म्हणजे फ्रान्समधलं सलून समजतों आम्ही, प्रेमाबाई ! " ही व्यक्ति फ्रेंच कादंबरींतून घेतली असावी या शकेला या वाक्यानें दुजोराच मिळतो.

सर्वांना खेळवून त्या खेळाची झळ स्वतःला लागू न देणाऱ्या या प्रेमलेला चंद्रशेखरविषयीं मात्र विशेष आकर्षण वाटूं लागते. त्याची हकिकत कळल्यापासून त्याला भेटावयाची तिला मोठी उत्सुकता लागून राहते.

## फ्रेंच ' सलून ' मध्यें चंद्रशेखर

अखेर प्रेमा चंद्रशेखरला बोलावणें पाठवतेच. चंद्रशेखर एकटाच तिच्या घरीं जातो. त्याला बऱ्याच गोष्टी विचारावयाच्या योजिल्या होत्या तिनें. ती त्याच्याशीं अत्यंत मोकळेपणानें बोलते. ' सुखविलासाच्या तलम,

करतारी आभरणाखालीं ' दडवून ठेविलेलीं 'भग्न हृदयाचीं शकलें' ती त्याला उघडीं करून दाखविते; व शेवटीं तर त्याच्या समाजवादी चळवळींत सह-कार्य करण्याची तयारी ती दाखविते. त्याच्या गुणांचें आकर्षण ती स्पष्टपणें कबूल करते. " तुम्ही जर मला आपली सहकारी होण्याची संधी द्याल, तर माझ्या आयुष्याला थोडीतरी टवटवी येईल " अशी अजीजी करून ती चटकन त्याचा हात धरते व त्याच्या प्रेमाची याचना करते.

तो तिचें सहकार्य घेण्याचें कबूल करतो; पण उलट तिला प्रेम देण्याचें मात्र नाकारतो. आईशिवाय दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीवर प्रेम न करण्याचा स्वतःचा निश्चय त्यानें बोलून दाखविताच ती त्याच्या जुनाट मतांवर सड-कून टीका करते. त्याच्यावरील स्वतःच्या प्रेमाची महती त्याला पटवून देण्याची ती धडपड करते. तो यानेंहि द्रवत नाहीं असें दिसून आल्यावर कामगारांत जाऊन त्यांच्यांत चळवळ करण्याची ती तयारी दाखविते; आणि अखेर अगदीं कळवळून विचारते, "तुम्ही जें सोशॅलिझमचें अभ्यास-मंडळ काढलंय, त्यांत मला कां घेत नाहीं ?" तें स्त्रियांसाठीं नाहीं असें म्हणून चंद्रशेखर तिच्या शेवटच्या आशेचाहि चक्काचूर करून टाकतो.

## ध्येयवादाचा येळकोट

पण प्रेमाबाईसारख्या विलासिनीनें इतर कोणाच्याहि वांट्याला येऊं न दिलेलें स्वतःचें प्रेम स्वेच्छेनें अर्पण केलें असतांहि तें मोठ्या संयमानें व धीरानें लाथाडणारा कणखर वृत्तीचा चंद्रशेखर स्त्रीच्याच मोहांत गुरफटून कर्तव्यापासून च्युत होतो व त्यामुळें अनर्थ ओढवून घेतो. माडखोलकरांनीं आपल्या राजकारणी कादंबऱ्यांत क्रांतिवादी संप्रदायांत सामील झालेले जे पुरुष दाखविले आहेत त्यांपैकीं बहुतेक स्त्रीच्या मोहामुळें आपली ध्येयनिष्ठा कांहींकाळ तरी विसरतात व त्यामुळें क्रांतीच्या कार्यांत आपणच विघ्न उत्पन्न करतात असें दिसून येईल. चंद्रशेखर हा पराकाष्ठेचा करारी व कण-खर मनोवृत्तीचा आहे, त्याचें सारें आयुष्य क्रांतीची उठावणी करण्याच्या तळमळीनें भरलेलें आहे. स्वतःवरील जबाबदारी ओळखण्याइतपत तो विचारी व बुद्धिप्रधान आहे. पण, ' विकारवशता ही बुद्धीच्या दुर्बलतेची द्योतक असते ' असें नेहमीं म्हणणारा हा ध्येयवादी नायक अगदीं मोक्याच्या

प्रसंगींच आपण काय करीत आहों हें विसरतो व स्वतःच्या ध्येयवादी जीवनाशीं अगदीं विसंगत असें कृत्य करून स्त्रीचा मोह हा ध्येयवादी माणसाचा शाप होय हें सिद्ध करतो.

प्रेमाबाईच्या प्रेमोपायनाचा अव्हेर केल्यानंतर थोड्याच दिवसांनीं ललिता व चंद्रशेखर यांचा परिचय वाढत जातो. तिच्या आजारात तो तिची चौकशी करण्याकरितां येऊं लागतो. तिला बरें वाटावें म्हणून तिच्याशीं तो खूप गप्पाहि मारीत बसे. 'त्याचें तें उल्हासयुक्त सानिध्य' तिला उत्तेजित करी. ललिता प्रथम कॉलेजमध्यें जाते त्याच दिवशीं ती पुन्हां आजारी पडते. तिला भेटावयास जावें अशी चंद्रशेखरची इच्छा असते. पण प्रख्यात क्रांतिकारक वीरेंद्र चक्रवर्तीच्या गुप्त आगमनाची तयारी करण्यासाठीं सहकाऱ्यांची तांतडीची सभा बोलावणें जरूर होतें. ही सभा बोलावली तर ललितेकडे जातां येणार नाहीं असा पेंचप्रसंग निर्माण होतो. परंतु ललितेचा मोह बलवत्तर होतो व सभा पुढें ढकलण्याबद्दल सहकाऱ्यांना पत्र लिहून हा कठोर निश्चयाचा ध्येयनिष्ठ क्रांतिकारक तिच्या 'समाचारासाठीं' जातो. आपल्या समाजवादी चळवळींत स्त्रियांच्या सहकार्याची फार जरूर आहे असें म्हणून तो ललितेच्या सहकार्याची याचना करितो. गेल्या सहा महिन्यांत चंद्रशेखर ललितेच्या सांनिध्यांत इतका आला होता कीं, त्याच्या गुणांची तिच्यावर मोहनी बसली व आदर उत्पन्न झाला आणि अखेर त्या आदराची परिणति स्नेहभावांत झाली. पण त्याच्या म्हणण्याप्रमाणें सहकार्य देण्याचें मात्र मी कबूल करीत नाहीं. "देशोन्नतीबद्दलचीं तुमचीं मतं अन् देशसेवेच्या तुमच्या कल्पना भयंकर आहेत :—आमच्यासारख्या सामान्य माणसांनीं त्या मार्गानं न जाणंच चागलं" असें कारण ती सागते. वास्तविक, आपला मोह त्याच्या कार्याच्या आड येऊं नये असा तिचा हा नकार देण्यांत हेतु होता. आणि असें ती पुढें सुमतीजवळ कबूलहि करते.

सहकाऱ्यांची सभा तहकूब करून चंद्रशेखर ललितेकडे जातो याचा एक घोर परिणाम होतो. त्याच्या निर्णयाबद्दल पूर्ण नाखुषी दर्शविणारें पत्र त्याच्या सहकाऱ्याकडून येतें. हें पत्र चंद्रशेखर घाईघाईनें वाचून टेबलावर

उघडेंच टाकून देतो व तें दुसऱ्या दिवशीं नेमकें सी. आय. डी. राव-साहेबांच्या हातांत पडतें.

एवढें महत्त्वाचें पत्र रावसाहेबांच्या हातांत गेलें हें कळल्याबरोबर चंद्रशेखर गांगरतो. ललितेकडे जाण्याच्या मोहामुळेंच हा सारा अनर्थ झाला हें त्याला कळून चुकतें. स्त्रीप्रेम आपल्याला वर्ज्य आहे असें पंधराच दिवसांपूर्वी त्यानें प्रेमाला मोठ्या दिमाखानें सांगितलें होतें. तो त्याचा दिमाख धुळीला मिळाला. आणि त्याला तीव्र पश्चात्ताप झाला आपल्या प्रमादाबद्दल.

चोरीला गेलेल्या त्या गुप्त पत्रामुळें वीरेंद्राच्या आगमनाची हकिकत फुटली आणि तिला वर्तमानपत्रांतहि प्रसिद्धि मिळाली. पुन्हा त्याला प्रेमाबाईची आठवण होते. तिच्या प्रेमाचा त्यानें अव्हेर केला होता तरी आतां तें पत्र रावसाहेबांकडून युक्तीनें हस्तगत करण्याचें काम तो तिच्या-वर सोंपवितो; आणि तीसुद्धां शक्य तें करण्याचें तावडतोब वचन देते. मोठ्या लाडिकपणानें ती रावसाहेबांजवळ बोलणें काढते. पण इरसाल नाटकी रावसाहेब तिला दाद लागूं देत नाहींत.

## कातर दिलाचा क्रांतिकारक

चंद्रशेखर ललितेच्या मोहांत गुरफटत असतांच केशव व सुमति यांचीहि सलगी वाढत जाते. या सलगीचें पर्यवसान दुसरें काय होणार ? व्हावयाचें तेंच होतें. तीं दोघें फिरावयास गेलीं असतां जोराचा वारा येऊन तिची छत्री उडून जाऊं लागते. ती धरण्याच्या निमित्तानें तो सुमती-लाच घट्ट धरतो आणि तिचें एकदम चुंबन घेतो. ती अगदीं सुन्न आणि बेभान होऊन गेली. केशवहि लगेच वरमला. त्यांच्यांत संकोच उत्पन्न झाला. होऊं नये ती गोष्ट झाली असें दोघांनाहि वाटलें.

झालेल्या या प्रकाराबद्दल चंद्रशेखर केशवची खूप कानउघाडणी करतो. ध्येयवादी माणसानें फार जबाबदारीनें वागावयास पाहिजे असें तो त्याला बजावतो. केशवला भलत्याच वेळीं प्रणयचेष्टा सुचाव्यात याबद्दल त्याला फार संताप आला आहे. ' ज्याचं जीवित विशिष्ट ध्येयाला वाहि-लेलं आहे, त्यानें एकांताची पहिली संधि लाभतांच विकारवश होऊन

मोहाला बळी पडावं ' ही कल्पनाच त्याला सहन होत नाहीं. ध्येयवादी माणसानें टिळकाप्रमाणें ' सर्व मोहांपासून अलिप्त ' रहावयास पाहिजे असें तो म्हणतो. त्याचें हें प्रवचन ऐकून कच्च्या दिलाचा केशव विरघळतो, त्याला तीव्र पश्चाताप होतो. त्याला आपल्या वर्तनाची लाज वाटूं लागते; व तो चंद्रशेखरला म्हणतो, " तुझ्याइतका मी कणखर नाहीं. ध्येयनिष्ठेमुळें तुझ्या वृत्तींत आलेला कठोरपणा माझ्या ठिकाणीं नाहीं. म्हणून, माझ्या हातून जर अशी एखादी चूक कधीं काळीं घडली, तर तेवढ्यामुळं आपल्या या धाकट्या भावाविषयीं आपलं मन विटून देऊं नकोस."

सुमतीकडूनहि ललितेला सारी हकिकत कळल्यावर तीसुद्धां केशवच्या दुबळ्या मनाची आणि ठिसूळ स्वभावाची हेटाळणी करते व असल्या 'कातर दिलाच्या माणसाला' स्वतःचा सहकारी निवडण्यांत चंद्रशेखरनें मोठीच चूक केली असें म्हणते.

## मादामनें केलेली कामगिरी

रावसाहेबांच्या ताब्यांत गेलेलें पत्र काढून घेणें जरी प्रेमाबाईला जमलें नाहीं तरी ती दुसरी एक महत्त्वाची कामगिरी करते. रावसाहेब रात्रीं जेवावयास राहिले असतां त्यांच्या कोटाच्या खिशांत असलेलें चंद्रशेखरवरील वॉरंट ती पाहते. तो दुसऱ्या दिवशींच पकडला जाणार हें कळल्याबरोबर ती लगेच धोका पत्करून मध्यरात्रीं त्याच्या घरीं जाते व त्याला सावध करते.

चंद्रशेखरवर वॉरंट निघालेलें असतां व त्याचें गुप्त पत्र पोलिसांच्या ताब्यात असतां त्याच्या घरावर कडक टेहेळणी असूं नये ही गोष्ट कादंबरींत म्हणूनच शक्य आहे. दुसऱ्या दिवशीं ज्याला पकडावयाचें त्याच्या घरीं आदल्या दिवशीं मध्यरात्रीं खुद्द रावसाहेबांचें प्रेमपात्र जातें व पोलिसांना तें मुळींच कळत नाहीं हें मोठेंच अजब प्रकरण आहे. प्रमिला त्याच्या खोलींत जाते तेव्हां त्याच्या टेबलावर पिस्तूल पडलेलें होतें. असल्या भयंकर परिस्थितींत टेबलावर पिस्तूल उघडें ठेवणाऱ्या क्रांतिकारकाची धन्य आहे! आपलें अत्यंत महत्त्वाचें गुप्त पत्र रावसाहेबांच्या हातांत पडलें

असून पोलिस केव्हांहि आपल्या घरीं येतील हें त्याला कळूं नये काय ? हा निर्भयपणा कीं मूर्खपणा ?

तें कांहीं असलें तरी प्रेमाबाईकडून कळलेल्या माहितीमुळें चंद्रशेखर फरारी होतो. परळला एका मजुराच्या खोलींत वेषांतर करून तो राहतो. परंतु आपले कांहीं सहकारी व खुद्द केशव अटकेंत पडल्याचें कळतांच, आपल्या मित्रांचा बळी देऊन आपण स्वतंत्र राहण्यात कांहीं अर्थ नाहीं असें वाटून तो स्वतःच पोलिसांच्या स्वाधीन होतो. केशव पुराव्याच्या अभावीं सुटतो. पण चंद्रशेखरला मात्र पांच वर्षांची शिक्षा होते!

## या कादंबरींतील राजकारण

'आमच्या आरंभींच्या चळवळीचं तुम्ही या कादंबरींत हुबेहुब वर्णन केलं आहे' असें श्री. डांगे यानीं प्रस्तुत कादंबरीबद्दल दिलेल्या प्रशस्तिपत्रकांतील विधान परमार्थानें खरें आहे असें मानलें तर समाजवादी, किंवा अधिक यथार्थतेनें बोलावयाचें झाल्यास, दहशतवादी क्रांतिकारकांच्या प्राथमिक चळवळींतील अनेक वैगुण्यें स्पष्टपणें दिसूं लागतात. या कादंबरींतील नायक चंद्रशेखर म्हणजे एक प्रसिद्ध कम्युनिस्ट कार्यकर्ता होय असा प्रवाद बरेच दिवसांपासून प्रचलित आहे. नायकाची सारी ध्येयनिष्ठा, करारीपणा, निर्भयता इत्यादि गोष्टी मान्य केल्या तरी दहशतवादी चळवळीची प्रत्यक्ष कोणती माहिती आपणांस मिळते ! समाजवादी संघटनेची अंतर्गत माहिती तर राहूं द्याच, पण अगदीं वरवरची हकिकत सुद्धां वाचकांस कळूं नये अशी कादंबरीकारानें जणुं बुध्द्याच व्यवस्था केली आहे. एक दोन सभा उधळण्याखेरीज चंद्रशेखर समाजवादी संघटनेची प्रत्यक्ष कोणती कामगिरी करतो याचा शोध करूनहि तपास लागत नाहीं. नाहीं म्हणावयास तो परळला मजुराच्या वस्तींत सोशॅलिझमच्या स्टडीसर्कलमध्यें आठवड्यांतून तीन वेळां व्याख्यानें देतो एवढीच त्याच्या समाजवादी चळवळीची प्रत्यक्ष हकिकत उपलब्ध आहे. (पृ. २१४) प्रेमाबाईच्या बोलण्यांतूनहि या बाबतींत माहितीचे कांहीं कण हातीं लागतात. "श्रमजीवी वर्गाचं संघटन करून हल्लींची राज्यपद्धति उलथून पाडण्याच्या उद्देशानं तुम्ही परळला सध्या चळवळ करीत आहां" असें ती म्हणते.

यावरून तेव्हां प्रत्यक्ष कोणत्या प्रकारची दहशतवादी चळवळ चालली होती याचें बरेंचसें मौल्यवान ज्ञान आपल्याला होतें हें कबूल करावयास हवें.

दहशतवादी चळवळीचें आणखी एक अंगहि आपल्याला उपलब्ध झालेलें आहे. वीरेंद्र नांवाचा परागंदा क्रांतिकारक गुप्तपणें हिंदुस्थानांत येणार असून त्याच्या आगमनाची सर्व तरतूद करण्याचें काम चंद्रशेखर व त्याचे सहकारी आपल्या अंगावर घेतात. पण एवढी जोखीम पार पाडण्याचें त्यांच्या नशीबीं नसतें. कारण, यासंबंधींचें एक महत्त्वाचें पत्र चंद्रशेखरच्या हलगर्जीमुळें अचानक पोलिसांच्या तावडींत सापडतें व क्रांतिकारकांच्या माथ्यावरील भार अशा प्रकारें हलका होतो. चंद्रशेखरच्या समाजवादी चळवळीचा आणखी एक पुरावा उपलब्ध आहे हें आपल्याला मान्य केलेंच पाहिजे. परळवरील सुभान नांवाच्या एका मजुराची व त्याची ओळख असून फरारी झाल्यानंतर तो त्याच्या खोलींत राहतो हा तो पुरावा होय !

चंद्रशेखरची व त्याच्या समाजवादी अथवा दहशतवादी चळवळीची—अथवा चळवळीच्या अभावाची—अशी भीषण चेष्टा करावयाचा प्रसंग एखाद्यावर ओढवणें हें खरोखर दुर्दैव होय. पण निरुपाय आहे. वास्तविक, वाचकांच्या लेखकाकडून फार निराळ्या प्रकारच्या अपेक्षा निर्माण होणें स्वाभाविक आहे. समाजवादी संघटनेचें प्रात्यक्षिक दाखवून कार्यकर्त्यांना कार्य करीत असतां येणाऱ्या अनेक प्रकारच्या अडचणींची साक्षात् माहिती कादंबरीकारानें करून द्यावयास हवी होती अशी अपेक्षा आपण केली तर त्यांत काय चुकलें ? किंबहुना, कादंबरींतील प्रणयाचा आविष्कार व मादाम दस्ताअलच्या दिवाणखान्यांत जमणाऱ्या व्यक्तींचा वावदूकपणा यांचें वर्णन रसिकतेनें करण्यापेक्षां समाजवादी चळवळीच्या अंतरंगांत शिरून लेखकानें त्या चळवळीचे धागेदोरे प्रामाणिकपणें उलगडून दाखविले असते तर एका महत्त्वाच्या राजकीय चळवळीच्या इतिहासाचें प्रभावी साधन या दृष्टीनें त्याची योग्यता असामान्य ठरली असती यांत शंका नाहीं ! पण हें माडखोलकरांनीं केलें नसल्यामुळें दहशतवादी कार्यकर्त्यांच्या संघटनेविषयीं व त्यांच्या प्रत्यक्ष कार्याविषयीं जी एक आदराची भावना आपल्या मनांत निर्माण झाली असण्याचा संभव आहे तिला जोराचा तडाखा बसतो; आणि

समाजवादी चळवळ म्हणजे अन्य कांहीं नसून विविध विषयांवरील मुद्देसूद भाषणें असा ग्रह निदान ही कादंबरी वाचून तरी खास होतो.

दुसरें असें कीं, दहशतवादी चळवळीचा आधारस्तंभ असा जो आपला नायक तोच अगदीं अवघड प्रसंगीं ललितेच्या मोहानें आपलें कर्तव्य विसरतो व क्रांतिकारकांचें काम अशक्य करून टाकतो. त्यानें जे सहकारी निवडले असतील त्यापैकीं फक्त एकाचीच आपल्याला प्रत्यक्ष माहिती आहे. केशव हा तो सहकारी होय. वास्तविक दहशतवादी चळवळींत सामील होणाऱ्या माणसाच्या ठायीं ज्या गुणाची आवश्यकता असते त्यांपैकीं फारच थोडे गुण केशवपाशीं आहेत. आणि कदाचित् याच कारणामुळें चंद्रशेखरनें त्याला आपल्या 'अंतरंगमंडळा'चा सभासद करून घेतलें नसावें. 'आयुष्य हें बिकट आणि भीषण आहे' हा मंत्र मधून मधून जपणें हेंच त्याच्या ध्येयवादाचें व क्रांतिप्रवणतेचें सार असावें असें दिसतें. ध्येयनिष्ठेच्या पोटीं येणारा कणखरपणा त्याला परिचित नसल्यामुळें सुमति थोडा वेळ एकांतात सापडतांच त्याच्या हातून 'कुलीनपणाचा धरबंद' सुटला तर त्यांत कांहीं नवल नाहीं. क्रांति घडवून आणण्याची त्याची आकांक्षा असेलहि. पण ही आकांक्षा सफल करण्यासाठीं जें असामान्य साहस पाहिजे तें त्याच्याजवळ मुळींच नसल्यामुळें त्याचा असा 'लोळागोळा' झाला आहे. त्याची पूर्वीची सहचरी ललितासुद्धां म्हणते, "घड वाङ्मयाची सेवा नाहीं, घड सोशॅलिस्टाची चळवळ नाहीं. साऱ्या प्रकारचं अपेश तेवढं पदरात आणि पुढें निराशेंत पिचत सारं आयुष्य जायचं......असल्या कातर दिलाच्या माणसाला आपला सहकारी निवडण्यांत त्यानीं ( चंद्रशेखरनें ) त्याचा घात केला, स्वतःचाहि घात केला."

केशव जबाबदारी सोडून मोहवश झाला म्हणून चंद्रशेखर त्याची निर्भर्त्सना करतो. पण स्वतः चंद्रशेखरहि या बाबतींत अपराधी आहेच. वास्तविक, केशवपेक्षांहि त्याचा अपराध अधिक घातक आहे. वीरेंद्राच्या गुप्त आगमनाची तांतडीनें व्यवस्था करण्यासाठीं दहशतवादी कार्यकर्त्यांची भरणारी सभा केवळ ललितेच्या जवळ बसण्याच्या मोहानें त्यानें तहकूब केली नाहीं काय? आणि या मोहवशतेमुळेंच तो पुढें पकडला गेला नाहीं काय? शिवाय, वीरेंद्राच्या आगमनाची बातमी सार्वजनिक होऊन त्या

बहाल क्रांतिकारकाच्या कार्यक्रमांत विघ्न आणावयास तोच कारण झाला नाहीं काय? ज्या मोहवशतेमुळें मूळचाच दुबळा आणि ठिसूळ असलेला केशव अगतिक होतो त्याच मोहवशतेमुळें मूळचा करारी आणि ध्येयनिष्ठ असलेला संयमी चंद्रशेखरसुद्धां अगतिक होतो व आपल्या ईप्सित कार्याची स्वतःच अपरिमित हानि करतो हें पाहिलें म्हणजे केशवला त्यानें केलेला उपदेश अस्थानीं वाटूं लागतो!

तात्पर्य, विविध विषयांवरील व्याख्यानें व स्त्रियांच्या मोहानें अगतिक होऊन क्रांतिकारक कार्यकर्त्यांनीं स्वतःच्या कार्याची केलेली हानि येवढेंच या कादंबरींतील राजकारणाचें स्वरूप आहे असें म्हटलें तर त्यांत काय बिघडलें? येथें समाजवादी चळवळींतील प्रत्यक्ष घटनांना स्थान नाहीं; अशा चळवळींत अंग मोडून काम करणाऱ्या नैष्ठिक कार्यकर्त्याला सोसाव्या लागणाऱ्या अडचणी अथवा त्या चळवळींत त्याला येणारे विचित्र अनुभव यांची दुरूनसुद्धां ओळख येथें व्हावयाची नाहीं. आणि तरीहि समाजवादी चळवळीचें पहिलें स्वरूप या कादंबरींत 'हुबेहुब' वर्णिलें आहे असें सर्टिफिकेट श्री. डांगे बहाल करीत आहेत. यावरून कम्युनिस्ट कार्यकर्ते सुरवातीला तरी चंद्रशेखर, केशव आणि मडळीप्रमाणें नुसतींच व्याख्यानें देणारे व कामगार संघटनेचें कोणतेंहि प्रत्यक्ष कार्य न करणारे असावेत असा तर्क आपल्यासारख्या सामान्य माणसानीं केला तर तें क्षम्य आहे!

वस्तुस्थिति अशी आहे कीं, जातिवंत दहशतवादी कार्यकर्ते जें प्रत्यक्ष कार्य अत्यंत निष्ठेनें दररोज आणि दरघडीं करीत असण्याची शक्यता आहे त्या कार्याशीं माडखोलकरांचा कोणत्याहि प्रकारचा संबंध नसल्यामुळें समाजवादी कार्यकर्त्यांचीं स्टडीसर्कलें आणि त्यांचीं व्याख्यानें म्हणजेच समाजवादी संघटनेचें संपूर्ण स्वरूप अशी त्यांची कल्पना झाली आहे. आणि म्हणून, चळवळीच्या अंतरंगात वाचकास घेऊन जाणें त्याना शक्य झालें नाहीं. मग, एकच काम त्याना करता येण्याजोगें उरलें आहे; आणि तें म्हणजे वर्तमानपत्राच्या रिपोर्टराचें काम. हें काम त्यांनीं कलात्मकतेनें केलें असलें तरी त्यांत त्यांचें अंतःकरण रमलेलें नसल्यामुळें त्यांत प्रामाणिकपणाचा अंश जितका असावयास पाहिजे तितका नाहीं असें मोठ्या खेदानें नमूद करावेंसें वाटतें. कार्याची प्रत्यक्ष माहिती नसल्यामुळें

केलेलें रिपोर्टिंगहि कांहीं ठिकाणीं अवास्तव आणि भोंगळ झालेलें आहे. उदाहरणार्थ, चंद्रशेखर आपल्याजवळ हरवलेल्या पत्राविषयीं बोलत होता हें प्रेमाबाईनें रावसाहेबांना स्पष्टपणें सांगितलें होतें (पृ.२६२). यावरून चंद्रशेखर व प्रेमाबाई यांची थोडीतरी सलगी असली पाहिजे हें रावसाहेबांसारख्या सी. आय. डी. ऑफिसरला खास कळावयास हवें होतें. अर्थात् प्रेमाबाई व चंद्रशेखर यांच्या हालचालींवर त्यांची सक्त देखरेख यापुढें रहावयास पाहिजे अशी अपेक्षा करणें गैर ठरणार नाहीं. पण गंमत ही कीं, आणखी कांहीं दिवसांनीं रावसाहेब रात्रीं जेवावयास तिच्याकडे राहिले असतां ते आपला कोट तिच्या हातीं देतात व तो तिला आतल्या खोलींत ठेवावयास सांगतात. याच कोटाच्या खिशांत चंद्रशेखरच्या वॉरंटाचा लिफाफा असतो; लिफाफा बंद केलेला नसून फक्त त्याच्या तोंडावरचा रॅपर दुमडून आंत घातलेला असतो. (बरोबर आहे; कारण, नाहींतर प्रेमाबाईला तो गुपचूप कसा वाचतां आला असता?) हें सारेंच भोंगळपणाचें वाटतें. रावसाहेबांचें हेंच पोलिसी चातुर्य असल्यास धन्य आहे त्यांची! येवढ्यानेंच भागलें नाहीं. पोलिसांच्या हास्यास्पद बेसावधपणाचा आणखी एक पुरावा आहे. चंद्रशेखराच्या घरावर मुळींच पहारा नाहीं, मग प्रेमाबाईच्या घरावर पहारा कसा असणार? वीरेंद्राच्या आगमनाचें गुप्त पत्र खुद्द चंद्रशेखराच्या टेबलावरून रावसाहेबांनीं उडवलें. तरीसुद्धां चंद्रशेखरच्या हालचालींवर किंवा त्याच्या घरावर सक्त देखरेख नाहीं हा अजब प्रकार आहे. एखाद्या बुद्रुक देशी संस्थानांतील पोलिसखातें दिसतें हें! पोलिसांच्या गहाळपणामुळेंच मध्यरात्रीं प्रेमाबाईला चंद्रशेखरकडे जाता येतें व त्याला वॉरंटाची हकिकत कळवितां येते. दुसरें असें कीं, आपल्या ताब्यांतील अत्यंत गुप्त पत्र मोठ्या पोलिस अधिकाऱ्याच्या तावडींत सांपडलें आहे व यामुळें आपल्याला केव्हां अटक होईल याचा नेम नाहीं हें चंद्रशेखरला कळावयास नको होतें काय? पण हा असामान्य धाडसी क्रांतिवीर प्रेमाबाई वॉरंटाची हकिकत सांगावयास आली तेव्हां कागदांवर पेपरवेटच्या ऐवजीं भरलेलें पिस्तूल ठेवून अगदीं शांतपणें पत्रें टाइप करीत बसला होता. साराच अद्भुत प्रकार आहे! असाच प्रकार पुढें 'कांता' कादंबरींत व पुन्हां एकदां 'नवे संसार' या कादंबरींतहि

घडला आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे दोनच तर्क संभवतात. एक तर हे दहशतवादी क्रांतिकारक पराकाष्ठेचे बावळट असावेत अथवा माडखोलकरांचाच हा प्रमाद असावा!

दहशतवादी क्रांतिकारकांच्या चळवळीचें अंतरंग दाखविणें राजकीय बंधनांचा विचार करितां धोक्याचें झालें असतें हें मान्य केलें तरी समाजवादी कार्यप्रणालींत अंतर्भूत झालेल्या कामगारसंघटनेचें आणि तदंगभूत चळवळीचें अंतरंग प्रकट करणेंहि माडखोलकरांच्या आंवाक्याबाहेरचें असल्यामुळें या कादंबरींतील राजकारण केवळ राजकारणावरील व हिंदी राजकीय पक्षांवरील चर्चा व व्याख्यानें यांतच घोटाळत राहिलें आहे. राजकीय कार्यकर्त्यांच्या प्रत्यक्ष कृतींचा परिचय करून न देतां व त्यांच्या चळवळींत रममाण न होतां केवळ चर्चाच कादंबरीकारानें सुरू केल्या म्हणजे तक्रार करावीशी वाटूं लागते. एरवी प्रसंगोपात्त व अपरिहार्य चर्चेसंबंधीं कोणाचीच तक्रार असण्याचें कारण नाहीं. या कादंबरींतील चर्चांवर व व्याख्यानांवर मोठा आक्षेप असा आहे कीं, त्या चर्चा व तीं व्याख्यानें केवळ व्याख्यानबाजीच्या हौसेनेंच दिलेलीं दिसतात. कोणीतरी विषय काढतो व उलटसुलट चर्चा सुरू होते. यामुळें वादविवादमंडळांतील चर्चांसारख्या या चर्चा वाटतात. कादंबऱ्यांतील चर्चा त्यांच्यातील कथासूत्राशीं सर्वस्वीं एकजीव असावयास नकोत काय? एरवीं या चर्चा उद्बोधक व विद्वत्ताप्रचुर असतीलहि. पण वरील वैगुण्य त्यांत उत्पन्न होतें हें अमान्य करण्यांत कांहीं मतलब नाहीं.

माडखोलकराना समाजवाद फार प्रिय आहे असें दिसतें. म्हणून समाजवादाची प्रचलित परिस्थितींतील उपयुक्तता पटविण्यासाठीं थोडीशी चर्चा प्रसंगोपात्त आली तर ती रमणीय ठरेल यात शंका नाहीं. पण चंद्रशेखर अनेक विषयांवर व्याख्यानें देत बसतो याची गमत वाटते. या कादंबरींतील बहुतेक सर्व व्याख्यानें चंद्रशेखरच देतो व केशव त्याला मधुनमधून थोडा हातभर लावतो इतकेंच. दांभिक सुसंस्कृतता, महाराष्ट्रांतील राजकारण, मवाळांचें राजकारण, महाराष्ट्रांतील सुधारक, टिळकांचें राजकारण, गांधींचें राजकारण, बेझंटबाईचें राजकारण इत्यादि अनेक

विषयांवर चंद्रशेखराचीं भाषणें आहेत. यांच्या जोडीला प्रो. राळे इत्यादींचीं गांधीवादावर भाषणें आहेतच.

महाराष्ट्रांतील राजकारणाविषयीं चंद्रशेखराचें मत असें आहे कीं, सध्या येथील पक्ष तत्त्वावर अधिष्ठित नसून केवळ व्यक्तिमाहात्म्यावर आधारलेले आहेत. देशांत नवीन पक्ष निर्माण होण्याची वेळ आली आहे असें त्याला वाटतें. समाजसत्तावादाचा प्रसार करावयास ही अत्यंत अनुकूल वेळ असून टॉल्स्टॉय, रस्किन, मॉरिस, ओवेन इत्यादि 'अर्धवटां'च्या वाङ्मयांत घोळत राहणें त्याला निंद्य वाटतें. मवाळांचें राजकारण 'नेभळट' असून 'पारतंत्र्याला ईश्वराचें वरदान' मानणारे ते साम्राज्यवादी आहेत असें तो म्हणतो. महाराष्ट्रांतील सुधारक म्हणजे 'निव्वळ विलायती मतांचीं आणि विलायती मालाचीं सत्त्वशून्य' गिऱ्हाइकें आहेत असें म्हणून एका प्रसिद्ध मृत प्रार्थनासमाजिस्टाचा तो पुढीलप्रमाणें उपहास करतो—'पेडररोडवर किंवा संगमावर राहून लोकांना मंत्रद्रष्ट्याच्या दिमाखानं उपदेश करणं ही ज्यांच्या कर्तृत्वाची परिसीमा ... त्यांना सुधारक म्हणणं म्हणजे, स्वातंत्र्याच्या अन् बंधुतेच्या तत्त्वांची विटंबना करणंच होय!" (पृ.१२२) सरकारी रोषाला बळी पडण्याचा प्रसंग ज्या ज्या व्यक्तीवर आला त्या त्या व्यक्तीच्या पाठीशीं टिळक उभे असल्यामुळें त्यांच्याविषयीं मात्र चंद्रशेखरला आपलेपणा वाटतो. तरीसुद्धां 'विलायतेला शिष्टमंडळ नेणारांची कुचेष्टा करणारा टिळकासारखा बहिष्काराचा प्रवर्तक आपल्या अखेरच्या दिवसांत स्वतः शिष्टमंडळ घेऊन जातो' याबद्दल त्याचा टिळकांवरहि राग आहे. त्यांनीं लष्करभरतीची तयारी दर्शविली यावरहि तो टीका करतो. बेझंटबाईनीं होमरूलची जी चळवळ केली तींत 'हिंदुस्थानचें कल्याण हा उच्च हेतु नसून साम्राज्याचें कल्याण हाच दुष्ट हेतु होता' असें चंद्रशेखर आग्रहानें प्रतिपादितो.

भिन्न हिंदी राजकीय पक्षांवर चंद्रशेखरनें उपर्युक्त टीका केलेली असली तरी त्याचा अथवा माडखोलकरांच्या इतर राजकीय कादंबऱ्यांतील चर्चापटु व्यक्तींचा खरा रोष गांधी व गांधीवाद या गोष्टींवर आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. गांधींना अथवा गांधीवादाला शिव्या देतांना त्याची सारी सुप्त प्रतिभा उसळी मारून उठते व ते अक्षरशः अनावर होतात.

प्रस्तुत येथें चंद्रशेखराच्याच म्हणण्याचा आपणांस विचार करावयाचा आहे. बाकीच्या मंडळींची पुढें यथावसर भेट होणारच आहे. 'गोखले आणि टॉल्स्टॉय यांच्या परस्परविरोधी मतांची भेसळ करून तीं मतं आपलीं म्हणून सांगत फिरणारा विक्षिप्त मनुष्य' असें गांधीजींचें वर्णन करून पुढें तो म्हणतो, "अन्यायांवर आणि विषमतेवर भूतदयेची झिलई चढलेली दिसली कीं, त्याच्या भूतदयेनं द्रवणाऱ्या मनाचं समाधान होतं. मजुरांना हवाशीर चाळी बांधून दिल्यावर, मग टाटा टोलेजंग बंगल्यांत राहिला अन् लक्षावधि रुपयांचा नफा त्यानं दाबला, तरी गांधींना कांहीं वाटणार नाहीं. ते त्याच्या कारखान्याला खुशाल आशीर्वाद देतील." (पृ. १२५)

या सर्व व्याख्यानांचें तात्पर्य असें कीं, प्रचलित राकीय पंथ नष्ट करून त्याऐवजीं नव्या पक्षाची स्थापना करणें आवश्यक आहे. नव्या पक्षाची स्थापना करावयास कोणाचीच हरकत असण्याचें कारण नाहीं. पण वाईट इतकेंच वाटतें कीं, या महत्त्वाच्या कामासाठीं माडखोलकरांनीं अगदींच विलक्षण माणसें शोधून काढलीं आहेत. बरीचशीं कच्या दमाचीं आणि उरलेलीं कांहीं ऐन प्रसंगांत मोहवश होऊन आपल्या ध्येयावर बोळा फिरविणारीं!

गांधीवादावरील अभिनिविष्ट प्रचारकी टीका आणि गांधीवादाची कुत्सित टवाळी या गोष्टी माडखोलकरांच्या इतर कादंबऱ्यांत भरपूर आल्या असल्यामुळें येथें त्यांचा केवळ मासला दाखविला आहे. पुढें या एकाच विषयावर अनेक विद्वत्ताप्रचुर प्रवचनें आपणांस ऐकावयास मिळणार आहेतच.

## स्वभावलेखन

'मुक्तात्मा' कादंबरींतील राजकारणाचें स्वरूप हें असें असलें तरी स्वभावलेखनाचे कांहीं चांगले नमुने येथें पहावयास मिळतील. मुख्यतः 'प्रबोधन' कचेरींतील शनिवारच्या अड्ड्यांत व मादाम द स्ताअलच्या दिवाणखान्यांत नेहमीं जमणाऱ्या मंडळीचें स्वभावलेखन नमुनेदार झालें आहे. वारंवार वामांगवेपन करणारे व मधूनमधून फ्रेंचमध्यें बडबडणारे प्रो. राळे, मारेकरी कलमबहादूर बबनराव, संस्कृतप्रचुर भाषेचा अतिरेक

करणारे भिषग्भास्कर शास्त्रीबुवा, पोलिसखात्यांत असूनहि देशाभिमानाचा डौल मिरविणारे आणि अनेक नाटकी रंगांत व ढंगांत तरबेज असलेले रावसाहेब इत्यादि व्यक्तिचित्रें चटकदार झालीं आहेत.

केशवला प्रियकर न मानतांहि त्याच्यावर आसक्तिरहित पण उत्कट प्रेम करूं इच्छिणारी ललिता केशव सुमतीकडे आकृष्ट होऊं लागलेला पाहतांच खिन्न होते. त्याची चंद्रशेखरशींहि विशेष सलगी झालेली तिला आवडत नाहीं या गोष्टी स्त्रीच्या मनोव्यापारांचें दिग्दर्शन उत्कृष्टपणें करितात. त्याचप्रमाणें, आपल्या मोहामुळें चंद्रशेखर कर्तव्यापासून च्युत होईल अशी भीति वाटून ती भलतेंच कांहीं तरी कारण सांगून त्याची 'सहकारी' होण्याचें नाकारते यांत तिची जबाबदारीची जाणीव स्पष्टपणें दिसून येते.

## कादंबरींतील कला

माडखोलकरांची ही पहिलीच कादंबरी असल्यामुळें संस्कृतप्राचुर्यानें अगदीं अक्षरशः कहर केला आहे. बरीचशी रचना गडकऱ्यांच्या पद्धतीची वाटते. निसर्गवर्णनें, अर्थालंकार व संक्रमित विशेषणें या बाबतींत तर गडकऱ्यांचा भास अनेक वेळां होतो. नमुन्यासाठीं ४७ व्या पृष्ठावरील केशवच्या दुःखाचें वर्णन वाचावें. "त्या दुःखाशीं इतक्या मधुर स्मृति संलग्न झालेल्या होत्या कीं, नदीच्या प्रवाहावर धुक्याचें दाट छत पसरावें, त्याप्रमाणें त्यांच्या माधुरीचा तवंग त्या दुःखाच्या उद्रेकावर पसरून त्याला एक प्रकारची अवीट अशी गोडी आलेली होती. प्रेमाला आशेचें अधिष्ठान असलें, तरच त्यातून मनाला उल्लसित करणारें अमृत स्रवूं लागते." हा सबंधच उतारा गडकऱ्यांच्या रचनेची आठवण करून देतो.

पण संस्कृतप्राचुर्याचा मात्र अनेक वेळा संताप येतो. ही रचना अत्यंत प्रौढ व भारदस्त असली तरी अशीं निदान वीस स्थळें तरी काढून दाखवितां येतील कीं, जेथें जाणता वाचकसुद्धां थोडा वेळ तरी अडलाच पाहिजे. काहीं निसर्गवर्णनें खरोखरच अप्रतिम आहेत. पण तेथेंहि संस्कृत-प्रचुर रचनेचें अस्तित्व फार जाणवतें. ही संस्कृतप्रचुरता याच कादंबरींत विशेष दिसून येते हें मात्र खरें, पुढल्या कादंबऱ्यांतून ती कमी कमी होत गेली असून 'चंदनवाडी' मधील रचना कितीतरी सोज्ज्वळ आणि प्रासादिक

झाली आहे. वस्तुजातांतील साम्य हुडकून काढण्याचें माडखोलकरांचें सामर्थ्य 'मुक्तात्मा' कादंबरींत स्पष्टपणें दिसून येतें हें मान्य केलेंच पाहिजे. अनेक सुंदर उपमा व दृष्टान्त यांचीं उदाहरणें वाटेल तितकीं काढून दाखवितां येतील.

पण संस्कृतप्राचुर्याच्या वेडानें वाहवल्यामुळें माडखोलकरांनीं या कादंबरींत अनेक विलक्षण शब्द वा शब्दसमूह सर्रास वापरले आहेत. कांहीं शब्दसमुच्चय माडखोलकरांचे अत्यंत आवडते आहेत. साधे, समजणारे प्राकृत शब्द न वापरतां बळेंच रूढ नसलेल्या संस्कृत शब्दांची खैरात केलेली पाहून मौज वाटते. यांचीं उदाहरणें किती म्हणून द्यावीं! उदाहरणार्थ, संध्येची सुनील सुषमा, क्षितिजाचा नीलिमा, मदिर गंध, अशरणता, दुर्दम उत्कंठा, कातर दिल, उरोज, करुणाच्या सांद्र रेषा, आंतर जीवन, स्मित-सुंदर आविष्ट मुखमंडल, आविष्ट स्थिति, अंतर्गूढ आर्द्रता, प्रमाथी बुद्धि, मधुर नीरवता इत्यादि. कांहीं वेळां या संस्कृतप्राचुर्याच्या आसक्तीमुळें अर्थ-हानि सुद्धां होते.मोटारींची 'स्तिमित' रांग, 'करुणपूर्ण' डोळे,'आविष्ट' मुखमंडल असे तऱ्हेवाइक शब्दप्रयोगहि ते अनेक वेळां वापरतात. मदिर, अशरणता व उरोज हे शब्द तर माडखोलकरांनीं भारीच लोकप्रिय केले आहेत.

संस्कृतप्राचुर्याची व आलंकारिक रचनेची ही आसक्ति उत्तरोत्तर कमी होत गेली आहे हें खरें आहे. यानंतर लगेच लिहिलेल्या 'भंगलेलें देऊळ' या दुसऱ्या कादंबरींत वरील विधानाचा भरपूर प्रत्यय येईल. प्रस्तुत कादंबरींत निसर्गवर्णनाची जी विपुलता आहे तीहि पुढें पुढें बरीच कमी होत गेलेली दिसून येईल. 'प्रेमसंन्यास' या नाटकांत गडकऱ्यांच्या भाषेचें जे संस्कृतप्रचुर व आलंकारिक स्वरूप दिसतें तें 'एकच प्याला' या नाटकांत मुळींच दिसत नाहीं. माडखोलकरांच्या बाबतींत असेंच झालें आहे. पण संस्कृतप्राचुर्याचा व आलंकारिकतेचा हा या कादंबरींतील अतिरेकाला गेलेला दोष वगळला तर माडखोलकरांच्या शैलींत मोठा आकर्षक रेखीवपणा आहे हें कबूल केलें पाहिजे. त्यांना शब्दांची कधींच अडचण पडत नाहीं. वाक्यें अत्यंत बांधेसूत वाटतात. फडक्यांची शैली भारीच सुललित. माडखोलकरांची भाषा भवभूतीच्या भाषेप्रमाणें प्रौढ, घोटीव आणि भारदस्त वाटते. संस्कृतप्राचुर्यामुळें या गोष्टी निर्माण झाल्या असल्या पाहिजेत असें कोणी म्हणेल. आणि त्यांत बरेंचसें तथ्य पण आहे

# २

## भंगलेलें देऊळ

वासनारहित स्त्रीपुरुषप्रेमाच्या कल्पनेनें वंचित झालेल्या आणि पुढें पुरुषाच्या दुरंत वासनांमुळें गांजलेल्या एका सुशील, भावनावश आणि प्रेमळ मानिनीची ही कहाणी चटका लावून सोडणारी आहे. माडखोलकरांची ही दुसरी कादंबरी १९३४ मध्यें प्रसिद्ध झाली. 'मुक्तात्मा' कादंबरींतील पराकोटीला गेलेलें संस्कृतप्राचुर्य, उपमा–दृष्टान्तांची खैरात, निसर्गाचीं ठराविक वर्णनें, राजकीय चर्चा इत्यादि गोष्टींचा या कादंबरींत अभाव आहे. भाषा अत्यंत आकर्षक, ललित पण तितकीच प्रौढ व घोटीव आहे. याच्या जोडीला अनूचें उत्कृष्ट स्वभावचित्र, विवाहसंस्थेंतील अपरिहार्य वैगुण्यांचें मार्मिक विश्लेषण, पुरुषांची 'दुर्दम' भ्रमरवृत्ति आणि 'प्लेटॉनिक लव्ह'चें वैयर्थ्य यांचें वर्णन या गोष्टींमुळें प्रस्तुत कादंबरी मोठी बहारदार झाली आहे.

स्त्रीस्वभावाचे दोन नमुने या कादंबरींत आहेत; त्याचप्रमाणें पुरुषी प्रेमाचेहि दोन नमुने आहेत. प्रणयविषयाशीं एकनिष्ठता, शारीरिक वासनांकडे दुर्लक्ष करूनहि प्रणयविषयाशीं समरस होण्याची शक्ति, व अमर्याद भावनावशता या गोष्टींचें प्रतीक म्हणजे अनू. स्वतःच्या वासनांचें कोडकौतुक पुरविण्याच्या लालसेनें बहिणीसमान मानलेल्या उपकारकर्त्रीची वंचना करणारी मनू हा स्त्रीस्वभावाचा दुसरा नमुना होय. सुंदर वस्तूंच्या नुसत्या चिंतनांत सुख मानून वासनारहित प्रेमाचा बडिवार माजविणारा व प्लेटॉनिक लव्हच्या कल्पनेनें पछाडलेला अरू पुरुषी प्रेमाचा एक नमुना दाखवितो, तर दुरंत वासना, भ्रमरवृत्ति, वैचित्र्याची आसक्ति उपभोगलालसा इत्यादींचें प्रतीक असलेला अनिरुद्ध दुसरा नमुना दाखवितो; मानवी स्वभावाचे हे चार नमुने माडखोलकरांनीं मोठ्या कौशल्यानें वर्णिले आहेत.

स्त्री आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र झाली तरी तिला सहन करावी लागणारी

परवशता; तिची मानसिक गुलामगिरी; तिच्या भावनांचा, आकांक्षांचा व अभिरुचींचा होणारा कोंडमारा यांचीच ही कहाणी आहे असें म्हटलें तरी चालेल. या आत्मकथेचें प्रत्येक पान 'लिहितां लिहितां आंसवें पडून डागळलेलें' व 'स्त्रीजातीच्या मानसिक गुलामगिरी'च्या हकिकतीनें भरलेलें आहे. 'दैन्याची, दौर्बल्याची मूर्तीच' असें स्वतःचें वर्णन अनू करीत आहे, आणि ज्याच्यामुळें तिच्या आयुष्याची नासाडी झाली त्या अनिरुद्धाचें ती 'नवपुष्पावरले भ्रमर,' 'भोगलोलुप,' 'मनसोक्त वास घेतल्यावर, मनमुराद हाताळल्यावर कोमेजल्यामुळें फेंकून दिलेल्या फुलाच्या पाकळ्या पाहून' न द्रवणारे असें वर्णन करीत आहे. स्वतःचें व अनिरुद्धाचें हें जें वर्णन अनूनें केलें आहे त्यांत तिच्या शोककहाणीचीं कारणें व तिचें स्वरूप या दोन्ही गोष्टी आल्या आहेत.

## ते हि नो दिवसा गताः

तेरा वर्षांच्या शोककारक वैवाहिक जीवनांतील अनेक दुःखद घटनांनीं पोळलेल्या अनूला विवाहापूर्वीच्या स्वतःच्या प्रेमजीवनाची स्मृति होणें स्वाभाविक आहे. ' गेले ते दिन सीते यापरि हा बघतां बघतां ' असें म्हणणाऱ्या रामाप्रमाणें अनूसुद्धां पूर्वीच्या रम्य आयुष्यातील सुखद स्मृतींनीं व्यथित होत आहे. ' O Death in life, the days that are no more ' या टेनिसनच्या प्रसिद्ध पंक्तींत वर्णिल्याप्रमाणें तिच्या आतांच्या जीवनाची अवस्था असल्यामुळें गतकालच्या स्मृति विशेषानें मनाला विषण्ण करीत असल्या तरी तिचा तो तेवढाच एक विरंगुळा आहे.

बालपणींच्या आठवणी अत्यंत रम्य आहेत व अनूनें त्या अत्यंत तन्मयतेनें वर्णिल्या आहेत. अरूची पहिली ओळख, त्याचें तें रमणीय बालरूप, त्याचा अबोल व भावनावश स्वभाव, अनूची त्याच्याशीं जमलेली गट्टी या गोष्टी आकर्षक रीतीनें सांगितल्या आहेत. अरूच्या स्वभावांत खेळकरपणा मुळीं नव्हताच. तो सदा गंभीर, विषण्ण आणि अबोल असे. त्याच्या प्रतिकूल गृहस्थितीचाच तो परिणाम होता. पण यामुळें अनूचें मन त्याच्याकडे विशेषच ओढ घेऊं लागलें; आणि उलट त्याचेंहि मन तिला ' अगदीं घट्ट घट्ट बिलगलें. '

दिनू आणि मनू हीं अरूचीं मामेभावंडं. अरु व अनू यांची गट्टी दिनूला बघवत नसली तरी मनूचें मात्र अरूवर फार प्रेम होतें. ती प्रेमळ आणि पराकाष्ठेची लाघवी होती. पण सुंदर असूनहि कोवळ्या वयांत आई-च्या संसाराचा अर्धामुर्धा भार अंगावर पडल्यामुळें तिच्या साऱ्या आकांक्षा खचून गेल्या होत्या. भावंडांच्या खस्ता खाऊन उबगलेल्या तिच्या प्रेमाचा ओघ अरूकडे वळला यांत कांहीं नवल नाहीं. तिच्या उत्कृष्ट रूपाची अरू मोकळ्या मनानें तारीफ करीत असे. त्यामुळें अनूला त्या अल्लड वयांत कधीं कधीं वैषम्यहि वाटे. अनूला तो म्हणे, " मला तिच्याकडे ( मनूकडे ) पहात रहावसं आणि तुझ्याशीं बोलत रहावसं वाटतं. " पण मनूच्या शिक्षणाला लवकरच विराम मिळाला. इंग्रजी चौथींत असतांच घरांत तिच्या लग्नाच्या गोष्टी सुरू झाल्या.

मनूविषयीं अरूला आसक्ति वाटत होती याची प्रतीति अनूला एकदा आली. चैत्रांत मांडलेल्या गौरीकडे व त्या दोघींकडे पाहून तो म्हणाला, " आमच्या मनूताईला जर बसवली असती कीं नाहीं आज हिंदोळ्यावर अनू, तर एवढं सारं मांडण्याची यातायात न पडतांच तुमचा वसंतोत्सव शोभून दिसला असता. " तो आणखी म्हणाला, " आज तुम्हां दोघींना पाहिल्यावर...... मला वाटलें रजनी आणि उषाच बसल्या आहेत मूर्तिमंत माझ्यापुढं ! " आपल्याला ' रजनी ' म्हटल्याचें अनूला वैषम्य वाटलें, कारण मनूप्रमाणें तिचा वर्ण ' लखलखीत ' नव्हता. मनूच्या रूपावर अरू लुब्ध आहे असें अनूला बरेच दिवस वाटत होतें. पण या तुलनेनें ही गोष्ट तिला तीव्रतेनें जाणवली. ती रागावलेली दिसतांच अरू म्हणाला, " तुम्ही दोघी मला निरनिराळ्या परींनीं पण सारख्याच आवडतां. "

अखेर अनू मॅट्रिक परीक्षेच्या गडबडींत असतांनाच मनूचें लग्न होतें. पण, वैवाहिक जीवन फार काळ अनुभवण्याचें तिच्या नशिबीं नव्हतें. लग्नानंतर तीनचार वर्षांतच ती विधवा होते व तिचा एकुलता एक आधार तुटून आश्रयासाठीं ती पुन्हा माहेरीं परत येते.

कॉलेजांत अनूची कालिंदी कीर्तिकरशीं फार सलगी होते. अनिरुद्ध हा याच कालिंदीचा मावसभाऊ. दोघांचा परिचय कालिंदी करून देते. " तो

दिसावयास खरोखरच चांगला होता. पण त्याच्या घाऱ्या डोळ्यांतली ती चमक !—तिच्यांत कसला तरी विलक्षण उन्माद भरलेला होता." याच उन्मादानें पुढें अनूच्या जीवनाचा विध्वंस केला. त्याला पाहून तिच्या मनाची चलबिचल झाली यात शंकाच नाहीं.

## बौद्धिक सहजीवन

अरू यापुढें रेसिडेन्सींत न राहतां अनूच्या वडिलांच्या संमतीनें तिच्याच घरीं रहावयास येतो. त्यांचा एकत्र अभ्यास, एकत्र फिरणें या गोष्टी सुरू झाल्या. अनूनें याला 'सहजीवन' म्हटलें आहे. या सहजीवनांत अनिरुद्धाची मूर्ति केव्हांच अदृश्य होऊन गेली. घरची परिस्थिति वैभवशाली आणि त्यांत या सहजीवनाचा उन्माद अशी अनूची अवस्था झाली. ती म्हणते, "जिथें प्रेम, जिथें मीलन, तिथें उन्माद हा असावयाचाच." याचा अर्थ असा कीं, तिला अरूविषयीं प्रेमाचें आकर्षण उत्पन्न झालें होतें.

या सहजीवनाचा परिणाम असा झाला कीं, तिला अरूविषयीं अनिवार आसक्ति वाटूं लागली. अरूवरील हें तिचें प्रेम कधींच नष्ट झालें नाहीं. "अरूला विसरून जाण्याचा निश्चय मी कितीतरी वेळां केला असेल, पण त्याची आठवण झाली नाहीं असा एक तरी दिवस गेला कां? मानीव संसारसुखाच्या मदिरेंत आणि उत्कट वात्सल्याच्या अमृतांत त्याची स्मृति बुडवून टाकण्याचा मी कितीदां तरी प्रयत्न केला." पण हा सारा प्रयत्न व्यर्थ झाला !

## अरूचें प्रेमविषयक तत्त्वज्ञान

अनूचें अरूवर कोणत्या प्रकारचें प्रेम होतें याविषयीं शंका उत्पन्न होण्याचें कांहींच कारण नाहीं. पण तिच्या सहजीवनांतील भागीदार जो अरू त्याचें तिच्यावर कोणत्या प्रकारचें प्रेम होतें? वासनामय शारीरिक प्रेमाचा त्याला तिटकारा होता; अभिलाष न धरतां स्त्रीला पुरुषावर अथवा पुरुषाला स्त्रीवर उत्कट प्रेम करितां येईल असें त्याला वाटत असे. ('मुक्तात्मा' कादंबरींतील ललितेचे प्रेमाच्या बाबतींत हेच विचार होते. 'मुक्तात्मा,' पृष्ठ ६५ पहावें.) प्रेमविषयावर प्रेमाचा सारा वर्षाव करून

प्रेम करणाऱ्या व्यक्तीनें त्यापायीं स्वतःचें व्यक्तित्व गमावून बसावें हें त्याला मंजूर नाहीं. 'प्रेमाचं खरं सुख उत्कंठेंत, अतृप्ततेंत असतं; उपभोगांत, अद्वैतांत नाहीं. स्वतःचं व्यक्तित्व जर मनुष्य प्रेमापायीं गमावून बसला, तर काय मजा उरली त्या प्रेमांत ?" असा अरूचा प्रश्न आहे. ही अतृप्ततेची कल्पना पुरुषाच्या स्वार्थी स्वभावाची द्योतक असून 'अतृप्तता' हा पुरुष जातीला मिळालेला एक शापच आहे असें यावर अनू म्हणते. ती पुढें म्हणते, "प्रेमासाठीं सर्वस्वाचा त्याग फक्त स्त्रीनेंच करावा. ती जेव्हां जेव्हां प्रेम करते, तेव्हां प्रियकराशिवाय वेगळं अस्तित्व तिला मुळीं उरतच नाहीं." तिच्या साऱ्या भावना त्याच्याठायीं केंद्रित झाल्या आहेत आणि तो मात्र तिला निःस्वार्थ, उपभोगरहित, बौद्धिक प्रेमावर व्याख्यानें देत आहे. 'उपभोगासाठीं आसुसलेलं, जिवाचं रान करून घेणारं प्रेम' त्याला स्वार्थी वाटतें. त्याची बौद्धिक प्रेमाची कल्पना तिला कांहींशी पटते. पण प्रेम बौद्धिक असलें तरी आवडत्या माणसाला कधीं-तरी स्पर्श करण्याची इच्छा माणसाला होणारच व त्या स्पर्शापासून त्याला सुख मिळालेंच पाहिजे असें अनूला वाटतें. अरूला मात्र प्रेमाचें पर्यवसान उपभोगांत व्हावें ही कल्पनासुद्धां सहन होत नाहीं. सौंदर्याचें चिंतन केलें कीं झालें असें त्याला वाटतें. "सुंदर वस्तूच्या चिंतनांत जें सुख आहे, तें तिच्या उपभोगांत नाहीं. उपभोग म्हटला कीं, त्याच्या पाठोपाठ उपरति आलीच."

## अनूची वंचना

प्रेमाचें असलें हें लोकविलक्षण तत्त्वज्ञान मानवी प्रवृत्ति जागृत असलेल्या भावनावश अनूला मानवलें नाहीं यात आश्चर्य नाहीं. त्याचें आपल्यावर खरोखरीच प्रेम आहे, कीं हा निव्वळ आभास आहे अशी शंकाहि तिला वारंवार येऊं लागते. पण ते कांहीं असलें तरी एक प्रकारची आसक्ति त्याला आपल्याविषयीं वाटते असेंहि तिच्या मनांत येतें. पण मनाची संभ्रान्त अवस्था कांहीं नष्ट होत नाहीं. 'मला ज्या अर्थानें तो प्रिय आहे, त्या अर्थानें मी त्याला प्रिय असेन का ?' अशी शंका पुन्हा येऊन ती बावरते. हा आपल्याशीं लग्न करील अशी तिला आशा होती

अजून. पुण्यास डेक्कन कॉलेजांत जाण्यासाठीं जेव्हां तो मुंबई सोडतो तेव्हां ती त्याच्याजवळ एक वचन मागते. तो कांहींच बोलत नाहीं. पण, मग आपले विचार तिला बोलून दाखवीत असतां तिचीं बोटें हळूंच आपल्या ओठांवर त्यानें दाबलीं. "त्याच्या त्या थरथरणाऱ्या नाज़ुक ओठांच्या स्पर्शानें रोमांच उठले माझ्या अंगावर;—प्रणयपूर्तीचें स्वप्न सफळ झाल्याचा भास झाला मला." ही तिची शुद्ध वंचनाच नाहीं काय ? सौंदर्यचिंतनांत समाधान मानणारा हा मुलखावेगळा प्रेमवीर अनूला स्पर्श कशासाठीं करीत असतो वारंवार ? त्याच्या बौद्धिक प्रेमाला त्या स्पर्शानें झिणझिण्या येत नसल्या तरी जिच्या नसांनसांतून भावनोद्रेक ओतप्रोत भरला आहे अशा अनूची त्याच्या स्पर्शानें धुंद अवस्था झाली असल्यास तें पूर्ण क्षम्य आहे. तो मधूनमधून तिचे हात हातात घेऊन अश्रु गाळतो; आणि ते अश्रु 'टपटपां तिच्या गालावर' पडतात (पृ. ४४). तिचीं बोटें तो आपल्या ओठावर दाबतो आणि उसासे टाकतो. पण या गोष्टींचा त्या तरुण भावनावश मुलीवर काय परिणाम होईल याचा तो चुकूनसुद्धां विचार करीत नाहीं. तो आपला सदा सौंदर्यचिंतनांतच दंग ! व्यावहारिक गोष्टींचा विचार करण्याचें त्याला कारणच काय मुळीं ? लग्न करण्याचा विचार आतां वडिलांना सांगितला पाहिजे असें ती म्हणाल्याबरोबर तो लगेच तिचा हात सोडून देतो. त्याला तिचें बोलणें ऐकल्याबरोबर भयंकर धक्का बसतो व तो उसासा टाकीत म्हणतो, "तू आतां जें बोललीस तें इतकं अनपेक्षित होतं मला कीं, माझ्या साऱ्या भावनांना दचका बसल्यासारखा झाला एकदम !" तिनें अगदीं निःसंदिग्ध शब्दांत व्यक्त केलेल्या भावना त्याला अनपेक्षित होत्या म्हणजे काय ? सारेंच चमत्कारिक आहे. त्याचें तिच्यावर प्रेम आहे. पण, प्रणयपूर्ति होण्यासाठी विवाहाची काय जरूर असा परमगहन प्रश्न त्याच्या हळव्या आणि नाजूक मनाला सतत व्यथित करीत आहे याला त्या बिचाऱ्याचा इलाज काय ? प्रेमाचें पर्यवसान त्याच एका संबंधांत (विवाहांत) झालं पाहिजे ही कल्पना त्याला 'कशीशीच' वाटते. त्यानें इतक्या दिवस प्रेमासंबंधीं केलेलें तात्त्विक विवेचन स्वतःलाच अशा विचित्र तऱ्हेनें भोवेल ही कल्पनाहि नसल्यामुळें अनू त्याचीं हीं मुक्ताफळें ऐकून हतबुद्ध होऊन जाणें अगदीं स्वाभाविक आहे.

यानंतर तो तिला 'प्रेमानें ओथंबलेलें आणि आंसवांनीं भिजलेलें' एक लांबलचक पत्र लिहितो. संतापानें ती त्या 'प्रेमपूर्ण' पत्राचे तुकडेतुकडे करून टाकते व चिडून स्वगत उद्‌गारते—"ढोंग, सारें ढोंग! इतकें जर प्रेम आहे याचें माझ्यावर, तर हा माझ्याशीं लग्न लावायला कां तयार नाहीं?—हा काय विचित्र प्रकार आहे प्रेमाचा?—" मनूवर तर याचें प्रेम नसेल ना अशीहि तिला एकदा शंका येते; व त्याच्याजवळ हें ती बोलूनहि दाखविते. तो ती गोष्ट नाकबूल करतो. इतकें झाल्यावरहि स्वतःच्या वर्तनाचें तो पुढीलप्रमाणें चमत्कारिक समर्थन करीत आहेच—"आजपर्यंत ज्या भावनेनं मी तुझ्याकडे कधीं पाहिलं नाहीं, त्या भावनेनं मी तुझ्याशीं यापुढं कसा वागूं? आपल्या वासनेच्या पूर्ततेसाठीं तूं मला बळी द्यायला सांगते आहेस माझ्या भावनांचा,—माझ्या वैशिष्ट्याचा!" धन्य आहे खरोखर या अलौकिक प्रेमाची!

अनू चिडून खूप बोलते त्याला. त्याच्या चमत्कारिक ध्येयवादाची कटु शब्दांत ती निर्भर्त्सना करते व म्हणते, "खरोखरी पस्तावा होतो मला तुझ्यासारख्या, नालायक माणसावर प्रेम केल्याबद्दल! सर्व बाजूंनीं फसवणूक झाली माझी तुझ्या बाबतींत!"

अशा प्रकारें या वासनाशून्य चिंतनात्मक प्रेमानें बिचाऱ्या अनूची मात्र क्रूर वंचना होते. अनू व अरू यांचें हें प्रेम पाहिलें म्हणजे प्रसिद्ध जर्मन महाकवि गटे व शार्लोटे स्टाइन यांच्यामधील वासनारहित 'आत्मिक' प्रेमाची अथवा प्रा. क्षीरसागर यांच्या 'राक्षसविवाह' या कादंबरींतील नायक व नायिका यमू यांच्या 'बौद्धिक सहजीवना'ची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं.

## अनिरुद्धाचें उन्मादक प्रेम

सौंदर्याचें वासनारहित चिंतन करण्यांत धन्यता मानणारा अरू पुण्याला निघून गेल्यावर पुरुषी प्रेमाचा दुसरा नमुना अनूला पहावयास सांपडतो. कालिंदी कीर्तीकरशीं तिचें संघटण वाढूं लागते. तिच्याच घरी तिची अनिरुद्धाशीं पुन्हा भेट होते. चार वर्षांपूर्वी

तो तिला कॉलेजमध्यें भेटला होता. अरूच्या मैत्रींत ती त्याची 'ऐटबाज मूर्ति' विसरूनहि गेली होती. पण आतां ते उन्मादक डोळे पुन्हा दिसतांच अरूच्या बाबतींत झालेल्या भयंकर वंचनेमुळें अनूचें भावनावश मन अनिरुद्धाकडे एकदम आकृष्ट होतें. चार वर्षांपूर्वी त्यांच्या दृष्टिक्षेपानें तिला जितकें विचलित करून टाकलें होतें तितकेंच आतांहि तिला विचलित केलें. अनिरुद्ध मोठा रुबाबदार होता. या गुणाच्या जोडीला सुसंस्कृततेचे द्योतक असे आणखीहि गुण त्याच्यांत होते. तो इंग्रजी मोठ्या सफाईनें बोलत असे. अनूला सिगरेट ओढलेली आवडत नाहीं हें कळल्याबरोबर तिला बरें वाटावें म्हणून तो पेटवलेली सिगरेट फेकून देतो. कालिंदीच्या आग्रहास्तव ती सिनेमाला जाते. सिनेमातसुद्धां अनिरुद्धानें एकदाहि सिगरेट न ओढल्यामुळें अनूला फार बरें वाटतें. ओळख झाल्यापासून अवघ्या चार तासांच्या आंत 'आपल्या मधुर वर्तनानं आणि चतुर संभाषणानं' अनिरुद्धानें अनूचें अंतःकरण मोहित केलें. या नवीन तरुणाविषयीं एकाएकीं आपल्याला इतकें विलक्षण आकर्षण कसें वाटूं लागलें असें तिचें मन तिला विचारूं लागलें. त्याच्या सांनिध्यांत ती अगदीं गोंधळून जाऊं लागली. 'माझ्या व्यक्तित्वाचा दर्प अगदीं वचकून मागें सरत असे' अशी ती कबुली देत आहे. त्याच्या व्यक्तित्वामुळें कांहीं हें खास झालें नाहीं. कारण, ती स्वतःच फार बुद्धिमती होती. मग, त्याची दृष्टि तिच्याकडे वळल्याबरोबर तिला अगदीं चमत्कारिक कां होऊं लागलें? त्याच्या डोळ्यांतील उन्मादच याला कारणीभूत होता हें स्पष्ट आहे. तिच्या मनाचा आणखी गोंधळ उडावयास एक निमित्त सिनेमा सुटल्यावर झालें. पाऊस पडत असल्यामुळें अनू रेनकोट चढवीत होती. अनिरुद्ध तिला कोट चढविण्यास मदत करतो. हें करीत असतां अभावितपणें त्याच्या बोटाचा स्पर्श तिच्या मानेला झाला. त्याबरोबर 'अगदीं अननुभूत अशा विचारांचा कल्लोळ' तिच्या मनांत उठला. त्याच्या त्या स्पर्शानें तिला अगदीं बेभान, बेचैन करून सोडलें. अरूचाहि स्पर्श तिला अनेक वेळां झाला होता मागें. पण त्या स्पर्शानें तिची 'अशी' अवस्था कधींच झाली नव्हती. अनिरुद्धाच्या स्पर्शानें एक प्रकारची ग्लानि, एक प्रकारची मूर्च्छना तिला आली. याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. अनिरुद्धाची मूर्ति

तिच्या डोळ्यांसमोरून क्षणभरहि दूर होईना. त्याच्या स्पर्शानें तिचें सारें जीवन जणुं खळबळून सोडलें.

## अनूचे मनूवरील उपकार

विधवा होऊन निराधार स्थितींत मनू माहेरीं परत आल्यावर तिच्या दुरवस्थेबद्दल कळवळा येऊन तिचें शिक्षण पुढें चालू ठेवण्याची अनू व्यवस्था करते व तिला अनाथबालिकाश्रमात प्रवेश मिळवून देते. सहज अरूविषयीं बोलणें निघालें असतां मनू म्हणते, "तो...स्वार्थी आहे...त्याच्यावर कुणी कितीहि प्रेम केलं तरी चीज नाहीं व्हायचं त्या प्रेमाच...तो आपलं जिवाभावाचं प्रेम आहे तुझ्यावर म्हणून सांगेल तुला. पण लग्नाला मात्र कबूल व्हायचा नाहीं तुझ्याशीं...हा आपल्या स्वार्थबुद्धीलाच ध्येयाचं न् तत्त्वनिष्ठेचं रूप देऊन तुला सांगेल कीं, माझं तुझ्यावर कितीहि प्रेम असलं तरी तें तशा प्रकारचं नाहीं म्हणून." तिच्या या उदगारांवरून अरूनें मनूची सुद्धां आपल्याप्रमाणेंच प्रतारणा केली असली पाहिजे असें तिला वाटलें. आणि एखादी तरुणी प्रेमसर्वस्व अर्पण करावयास स्वखुषीनें तयार असतां त्याचा अव्हेर करणाऱ्या या प्रेमाची विचित्र जात कोणती असा संदेह तिच्या मनांत निर्माण झाला.

## दुरंत वासनांच्या तावडींत

—आणि तिला अनिरुद्धाकडे जाण्याची तळमळ लागूं लागली. व ती कालिंदीकडे हेलपाटे घालूं लागली. अखेर त्याच्या उन्मादक आकर्षणांत ती पूर्णपणें गुरफटून जाते. एकदा जरा धाडस करून तो तिला घेऊन अपोलो बंदरावर चांदण्यांत फिरावयास जातो. त्या एकातांत दोघांचींहि मनें 'व्यथित' व 'व्याकुल' झालीं. तोंच अनिरुद्ध अर्धवट स्वगत म्हणतो, "हा समुद्र पाहिला म्हणजे बायरनची आठवण होते मला; न् त्याच्याप्रमाणे कुठं तरी दूरदेशीं जाऊन बेछूटपणानं रहावंसं वाटतं." बेछूटपणाची त्याची आसक्ति दिसूनहि अनूचा त्याच्याविषयींचा मोह वाढत जातो. त्याच्यामुळेंच आपलें औदासीन्य कमी झालें व आपल्या 'वठलेल्या जीवनाला' थोडी तरी टवटवी आली असें तिला वाटूं लागलें. ओळख झाल्यापासून सुमारें

महिन्यानें तो तिच्या प्रेमाची याचना करितो. तिला हा प्रश्न अनपेक्षित नसला तरी ती स्वाभाविकच गोंधळून जाते आणि म्हणते, " नाहीं, नाहीं—क्षमा करा मला. ती गोष्ट शक्य नाहीं. "

हा प्रसंग घडल्यानंतर तो आपल्याशीं चमत्कारिक रीतीनें वागेल अशी तिला भीति वाटते. पण त्याच्या वर्तनात तिला कांहींच वावगें दिसत नाहीं. तो पूर्वीप्रमाणेंच तिच्याशीं मोकळेपणानें वागतो. पण यामुळें पुरुष कठोर असून पुरुषांना प्रेम ही ' केवळ करमणुकीची चीज ' वाटत असावी असें तिच्या मनांत आलें. पण त्याच्याविषयींचें आकर्षण अत्यंत प्रबळ आहे हें तिला आतां कळून चुकतें. तरी सुध्दां मधूनमधून अरूची आठवण होऊन अनिरुद्धाचा मोह सोडावा असें तिला वाटतें. पण त्याचा तो मोह तिला पुन्हां खेचून घेतो.

यानंतर तिची व अरूची पुन्हां भेट होते. शेलीच्या पद्धतीनें तो तिच्याविषयींच्या आपल्या भावना प्रकट करतो. बोलता बोलतां तो चटकन तिचा हात धरतो व त्याच्या ' आतुर ' ओठांचा स्पर्श तिच्या मानेला होतो. त्याच्या खांद्यावर मान टाकून मनसोक्त रडावें असें तिलाहि क्षणभर वाटतें. पण पूर्वी त्यानें केलेल्या अवहेलनेनें तिचा स्वाभिमान जागृत होतो; व ती त्याला स्पष्टपणें विचारते. पण त्याचीं पूर्वींचींच मतें कायम आहेत. केवळ तिच्या इच्छेसाठीं तो तिच्याशीं लग्न करावयास तयार आहे. तिच्याविषयीं विचार करण्यांत त्याला जें सुख वाटतें तें सुख विवाहामुळें नाहींसें होईल असें त्याला भय वाटतें. तो तिच्याशीं नाहीं तर दुसऱ्या एखाद्या स्त्रीशीं लग्नहि करील कदाचित्. पण ' लग्नाचा न् प्रेमाचा कांहीं संबध आहे किंवा असावा ' असें मात्र त्याला वाटत नाहीं. पण तिला त्याचें हें अतींद्रिय तत्त्वज्ञान पटत नाहीं व समजतहि नाहीं. आणि यापुढें दोघांत असले संबंध ठेवणें योग्य नाहीं असें ती त्याला निक्षून सांगते.

अनिरुद्ध पुन्हां एकवार तिच्या प्रेमाची याचना करतो. तो अगदीं नाटकी अविर्भाव करून व डोळयांत आंसवें आणून अशा कांहीं कौशल्यानें हें सारें करतो कीं, अगदीं ' अशरण ' होऊन त्याची मागणी ती मान्य करते. पण अनिरुद्धाचें शील चांगलें नाहीं व तो बेछूट आहे असें म्हणून या बेतापासून तिला परावृत्त करण्याचा तिचे वडील निकराचा प्रयत्न कर-

तात. ‘प्रेमोन्मादाच्या नशेंत बेहोष झालेल्या’ तिच्या मनाला वडिलांचें बोलणें अर्थातच रुचत नाहीं. जगांत पूर्ण निरागस कोण आहे? असाच प्रश्न विचारून ती स्वतःच्या मनाची खोटी समजूत घालते. विवाहाचें वय जसजसें वाढत जाईल तसतशी तरुण–तरुणींच्या ठिकाणीं निरागसता कमीच आढळणार. म्हणून, प्रौढ प्रेमिकांनीं एकमेकांच्या पूर्वायुष्याची फारशी चिकित्सा न करणेंच बरें. ‘अनाघ्रात पुष्पांची अपेक्षा करण्याचं तें युग संपलं आतां’–अशाप्रकारें स्वतःच्या मनाची समजूत करून ती अखेर अनिरुद्धाशीं विवाह करते.

वरील वंचक समर्थन ( rationalisation ) लग्न होण्यापूर्वींच तिला भोवतें. अनिरुद्धानें विलायतेंत असतां केलेलें भयंकर कर्ज फेडण्यासाठीं तिच्या वडिलांनीं जबर हुंडा दिला. यामुळें, ‘मला विकत घेतला तुझ्या वडिलानीं’ असें तो कुत्सितपणानें नेहमीं बोलूं लागला. एकदा तो अगदीं बायरनच्याच पद्धतीनें तिला म्हणतो, “आपल्या या लग्नातलं सारं काव्य नाहींसं होणार असं वाटायला लागलं आहे मला. भरतीचं हें उधाण ओसरून गेल्यावर जसा किनारा उघडा पडून शून्यता तेवढी शिल्लक रहाते, तसं लग्नानंतर होणार आहे कीं काय आपल्या जीवनाचं कोण जाणे!” अनिरुद्धाचें हें ‘काव्य’ वाचल्याबरोबर विवाहसमारंभ उरकल्याबरोबर लॉर्ड बायरननें लेडी बायरनजवळ जे उद्‌गार काढले होते त्यांची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. लॉर्ड बायरन मोठ्या लाडिकपणानें आपल्या नवोढा पत्नीला म्हणतो, “You are my wife, and that is enough for me to hate you. Were you some one else's wife, I might perhaps care about you.” अनिरुद्धानें मागें बायरनच्या बेछूटपणाचा जो सूचक उल्लेख केला होता तो वरील नाटकाची नांदी समजावयास हरकत नाहीं! बायरनचा हा ‘सच्चा चेला’ आहे यांत कसलीच शंका नाहीं!

लग्नापूर्वीं स्वतःचीं व्यसनें प्रेयसीपासून काळजीपूर्वक झाकून ठेवणारा ‘मुखवटे’ या कादंबरींतील मोहन लग्नानंतर लगेच आपलीं व्यसनें जोरानें सुरू करतो. त्याचप्रमाणें लग्नापूर्वीं अनूला बरें वाटावें म्हणून सिगरेटहि न ओढणारा अनिरुद्ध लग्नानंतर मधूनमधून चिरूट ओढूं लागतो व ‘पिऊं’

लागतो. बायकोखेरीज करमत नसल्यामुळें ती जवळ नसली म्हणजेच व्यसनांची सोबत घ्यावी लागते असें तो स्वतःचें समर्थन करतो. बायको त्याला अगदीं चोवीस तास जवळ हवी. सामाजिक कार्यासाठींहि तिनें घर सोडतां कामा नये असा त्याचा कटाक्ष आहे. तो बाहेरून आल्याबरोबर तिनें स्वागतार्थ तयार असलें पाहिजे असा तो आग्रह धरतो.

दिवसेंदिवस हें नाटक अधिकाधिक भीषण होत जातें. तिची पहिली प्रसूति कष्टाची होते. प्रसूतींतील आजारामुळें त्याचें अवखळ मन पागतें. त्याचीं व्यसनें दररोज वाढूं लागतात; श्वासातला दर्प जास्त जास्त उग्र होऊं लागतो. बाळंतपणाच्या थोड्याशा अवधींत जर त्याचें मन इतकें भिथरतें तर कालांतरानें आपलें तारुण्य कमी झाल्यावर तो काय करील या धाकानें तिला गांगरल्यासारखें होतें. आणि तिची शंका खरीच होती. दर बाळंतपणांत तिची प्रकृति खालावत जाते, तिचें तारुण्य लयाला जाऊं लागतें, तिचें सौंदर्य कोमेजूं लागतें—आणि त्याची भ्रमरवृत्ति प्रबळ होत जाते. त्याची भोगलालसा तृप्त करण्याचें सामर्थ्य तिच्या सुकणाऱ्या तारुण्यांत रहात नाहीं. त्याच्या ‘ शिकारी ’ मनाला अनूचें डागाळलेलें सौंदर्य इतःपर भुरळ घालूं शकत नाहीं. आणि यामुळें, त्याच्या प्रेमांतील सारी उत्कटता उडून जाते. प्रत्येक नवीन बाळंतपणांत तो तिच्यापासून जास्त जास्तच दुरावत जातो व घराविषयीं बेफिकीर बनूं लागतो. पहिली मुलगी मीना हिच्याविषयीं तेवढें त्याला खरें प्रेम वाटे. बाकीच्या घराशीं मात्र त्याचा कांहीं संबंधच उरला नाहीं. अपरात्रीं तो पिऊन बाहेरून येत असे आणि तिची चौकशीहि न करतां तडक आपल्या खोलीत जात असे. हे विलक्षण प्रकार पाहून प्रसूतीच्या खोलींत एकाकी अवस्थेत पडलेल्या अनूच्या मनात विचाराचें काहूर माजत असे. “ स्त्रीचें भंगुर तारुण्य आणि पुरुषाच्या दुरंत वासना ! काय नवल पुरुष अशा स्थितींत बहुस्त्रीक झाला तर ?—पण प्रेमाला जर कांहीं अर्थ असेल. तर पुरुषानें थोडें तरी नको का स्वार्थत्यागी, संयमी व्हावयाला ?......पण स्त्रीच्या तारुण्याचा बळी घेऊन स्वतः तरुण राहिलेल्या पुरुषाजवळ इतकी कृतज्ञता, इतकी सहृदयता असते कुठें ? तिच्या यौवनाचें आकर्षण नाहींसें होतांच त्याचें तें अतृप्त, शिकारी मन लगेच दुसरें आकर्षण हुडकण्याच्या मागें लागतें. ” ( पृ. ११७ )

## अस्तनींतील निखारा

सांसारिक जीवनाचा असा बट्ट्याबोळ झाल्यानंतर एक दिवस निराधार मनूची दया येऊन अनू तिला आपल्या घरीं राहावयासच बोलावते व तीहि येते. बरेच दिवस अनिरुध्दाचें तिच्याकडे लक्ष गेलें नव्हतें. जिवाला विरंगुळा म्हणून अनू थोडेसें सामाजिक कार्य करूं लागतांच अनिरुध्दाला संताप येतो. अखेर भांडाभांडी होऊन त्या 'प्रेमी' दांपत्यांत अबोला सुरू होतो. यांतच पुन्हा बाळंतपणाची भर. यामुळें धाकट्या मुलांना आईपेक्षां मनूचाच लळा अधिक लागतो. अनिरुध्द रोज मुलांना घेऊन फिरावयास जात असे. मुलांना मनूचा लळा फार, म्हणून तिच्यावाचून तीं फार कंटाळत. यामुळें मनूनेंच त्यांच्याबरोबर फिरावयास जावें अशी भोळ्याभावानें अनू सूचना करते. या गोष्टीचा मनूनें लवकरच अत्यंत वाईट फायदा घेतला. अनिरुद्ध व मनू यांना एकांत मिळूं लागला. हा 'अभिनवमधुलोलुप' भ्रमर बायकोला विसरून मनूशीं रोज प्रणयचेष्टा करूं लागला. शेवटीं अनूच्या आजाराचा फायदा घेऊन त्यांनीं खुद्द घरांतच हे प्रकार करावयास सुरवात केली. अनू रात्रीं अंथरुणावर तळमळत असतां बागेंत त्यांच्या हास्ययुक्त गप्पा चालत. स्वतःच्या बिछान्यावर झोपण्याचेंहि त्यानें सोडून दिलें. मनूनें आपल्या मुलांच्या व नवऱ्याच्या सहवासांत मजेनें संध्याकाळ घालवावी या विचारानें अनूचें मस्तक सुन्न होऊं लागलें. येणेंप्रमाणें सहा महिने त्यांची सलगी उत्तरोत्तर वाढतच गेली. तरीसुद्धां 'माझी मनू कधीं दगा देणार नाहीं आपल्या बहिणीला' असा अनूला अजूनहि वेडगळ विश्वास वाटे. स्त्री असल्यामुळें मनू तरी स्त्रीच्या भावना जाणील अशी तिला आशा वाटे. 'अयि विद्युत् प्रमदानां त्वमपि दुःखं न जानासि' असें म्हणणाऱ्या वसंतसेनेप्रमाणेंच ती मनूच्या स्त्रीत्वावर विसंबून होती. पण तिचा हा विश्वास अस्थानीं होता. अनिरूद्ध–मनूच्या शृंगाराला घरांतच ऊत येतो. तिला सारें कांहीं समजत होतें. दैवदुर्विलास असा कीं, मुलें देखील मनूभोंवतींच घोटाळत असत. जिवाचा संताप तरी किती करून घेणार ती!

## घराबाहेर

अखेर मोठ्या प्रयासानें निश्चय करून ती घर सोडण्याचें ठरवितें.

त्याला मुळींच वाईट वाटत नाहीं. उलट तो तिलाच टाकून बोलतो. मुलांना तो तिच्याबरोबर जाऊं देत नाहीं. "जी बाई घर सोडून निघाली तिचीं कसलीं मुलें? तिचा काय हक्क आहे मुलांवर?" असें तो इरसाल मानभावीपणानें विचारतो. ती यावर अगदीं कळवळून म्हणते, "तुमची इच्छा नसेल तर सारीं मुलें राहूं द्यात तुमच्याजवळ. मी जशी तेरा वर्षांपूर्वी एकटी या घरांत आलें, तशी एकटी जाईन परत इथून!"

## दोन प्रश्न

घराबाहेर पडण्याचा हा जो निर्णय अनूनें घेतला त्याविषयीं दोन शंका निर्माण होण्यासारख्या असून त्यांचीं उत्तरेंहि अनूनें देऊन टाकलीं आहेत. घराबाहेर पडण्यापूर्वी झाल्या प्रकाराबद्दल एका शब्दानेंहि तिनें मनूला जाब कां विचारला नाहीं? आणि, तिनें घटस्फोट कां घेतला नाहीं? पहिल्या प्रश्नाला तिचें उत्तर असें कीं, अनिरुद्ध खराखुरा नादी, जातिवंत व्यसनी. ज्या गोष्टीचा एकदा त्यानें ध्यास घेतला तिचा पिच्छा तो काय वाटेल तें झालें तरी पुरवणारच. मनू केवळ निमित्त झाली या अनर्थाला. तिच्याऐवजीं दुसरी कोणीहि आली असती त्यांच्या 'सहजीवनाची नासाडी करावयाला.' अतृप्तता आणि भोगलोलुपता या गोष्टी त्याच्या रक्तांतच आहेत मुळीं! त्याचें सौंदर्यच असें आहे कीं, मनूला त्याचा मोह पडला यांत ती मनूलाहि दोष द्यावयास तयार नाहीं. 'पतंगांनीं जशी दीपज्योतीवर झडप घालावी, तसें स्त्रियांचें मन त्यांच्या वासनेला बळीं पडावें' हें तिला अपरिहार्य वाटतें. मग तिनें घटस्फोट कां मागितला नाहीं? 'लग्नापूर्वीच्या' अनिरुद्धाविषयीं तिला अजूनहि विलक्षण आसक्ति वाटत आहे. 'त्यांच्याविषयींच्या या दुरंत आसक्तीमुळें घटस्फोट मागितला नाहीं मी,' असें तिचें बिनतोड समर्थन आहे.

## भंगलेलें देऊळ

पण पुन्हां एक शंका उत्पन्न होते. ज्या विवाहसंस्थेमुळें अनूसारख्या सर्वस्वीं निरागस स्त्रियांवर असला विचित्र प्रसंग येतो त्या विवाहसंस्थेचाच उच्छेद करून टाकला तर? अनूचें यावर उत्तर असें कीं, पुरुष स्वभावतःच

बहुस्त्रीक असल्यामुळें स्त्रीच्या सुरक्षिततेसाठीं तरी विवाहाची आवश्यकता आहे. विवाहसंस्थेचा आधार मिळाल्यामुळें पुरुषाच्या 'निरर्गल वासनांविरुद्ध' स्त्रीला थोडें तरी संरक्षण मिळतें. म्हणून तिच्यांत वाटेल त्या सुधारणा कराव्या. विवाहसंस्था हें 'भंगलेलें देऊळ' असलें तरी त्याचा विध्वंस करणें स्त्रीच्या दृष्टीनें घातक आहे असें तिचें म्हणणें आहे.

## संयम आणि त्याग यांचें महत्त्व

विवाहसंस्थेनें निर्मिलेल्या मर्यादांत तरी माणसाला कां कोंडून ठेवावयाचें ? तो स्वैराचारी होऊं नये म्हणून. "मानवजातीचें कल्याण हें स्वैराचारात नसून संयमांत आहे, भोगांत नसून त्यागांत आहे. जगांतलें कोणतेंहि सामर्थ्य मोकाट सुटलें कीं, तें विध्वंसाला, विनाशाला कारण होतें. आणि मानवी वासना हें तर सर्वांत प्रभावी सामर्थ्य आहे ! विवाहसंस्थेचें निर्मूलन करून तुम्ही काय तें सामर्थ्य मोकाट सोडणार ?" असा अनू शेवटीं समाजालाच प्रश्न विचारीत आहे.

## अनू आणि मनू

स्त्रीस्वभावाचे हे दोन विरोधी नमुने आहेत असें आरंभींच म्हटलें होतें. अनू ही अत्यंत प्रगल्भ विचारांची सुशिक्षित स्त्री असली तरी ती पराकाष्ठेची भावनाप्रधान व एकनिष्ठतेनें प्रेम करणारी आहे. प्रियकराच्या व्यक्तित्वांत स्वतःचें व्यक्तित्व विलीन करून टाकावयास ती केव्हांहि तयार आहे. तिच्या प्रेमळ हृदयाच्या हाकेला ओ देणारा फक्त कोणी तरी तिला हवा आहे. आणि यामुळें अरूच्या वासनारहित प्रेमाच्या मृगजळामागें लागून ती स्वतःची विलक्षण वंचना करून घेते. परंतु, ही वंचना झाली तरी अतृप्त प्रणयपूर्तीमुळें निराश झालेलें तिचें मन अनिरुद्धाच्या उन्मादक प्रेमाला बळी पडतें व तिचें शरीर त्याच्या क्रूर भोगलोलुपतेचें भक्ष्य बनतें. अरूच्या बाबतींत जी चिकाटी ती पहिल्यापासून दाखविते त्याच प्रकारची चिकाटी ती अनिरुद्धाच्या बाबतींतहि दाखविते. त्याचें वर्तन बेछूट आहे, त्याचें शील चांगलें नाहीं, मोहवश होणें हा त्याचा स्वभावधर्म आहे या साऱ्या

गोष्टी पूर्ण ठाऊक असतांहि वडिलांच्या प्रतिकूल इच्छेला न जुमानतां ती अनिरुद्धाशीं लग्न करते यांत अविचारापेक्षां पहिल्या प्रणयभंगामुळें दडपलेल्या आकांक्षांचाच तीव्र उद्रेक दिसून येतो. या उद्रेकामुळेंच आपल्या कृत्याचे परिणाम पुढें काय होतील हें समजून घेण्याचें सामर्थ्य तिच्या मनांत राहत नाहीं. तिच्या मनाची घडण लक्षांत घेतां असें म्हणावेसें वाटतें कीं, अरूनें तिची प्रतारणा केल्यानंतर अनिरुद्ध तिला भेटला नसता तरी दुसऱ्या कोणाच्याहि प्रेमांत ती सहज पडली असती. प्रेम करणें हा तिचा स्वभावधर्मच आहे. आणि यामुळें सतत तेरा वर्षें अनिरुद्धाच्या भयाण संसारांत राहूनहि त्याच्याविषयींची तिची आसक्ति थोडीहि कमी होत नाहीं; आणि तारुण्याच्या पहिल्या नव्हाळींत अरूनें दारुण वंचना केली असताहि त्याचीहि आठवण ती मुळींच विसरूं शकत नाहीं. निराळ्या मनोवृत्तीच्या एखाद्या स्त्रीनें हें सारें पचनीं पाडलें असतें व पुन्हां ती आनंदीहि झाली असती. पण अनूचा स्वभावधर्म निराळ्या जातीचा आहे. झाडाचीं मुळें ज्याप्रमाणें पाण्याच्याच दिशेला वळतात त्याप्रमाणें तिचें मन सदैव प्रेमाकडेच धाव घेत आहे. स्त्रीपुरुषांमधील हें आकर्षण तिला सर्व गोष्टी करावयास लावीत आहे. या बाबतींत तिनें स्पष्ट कबुलीहि देऊन टाकली आहे. "प्रणयाइतका उन्मादकारी मोह मानवी जीवितात दुसरा कोणता असूं शकेल! ...... स्त्रीपुरुषांमधलें आकर्षण कोणीहि उत्पन्न केलें असलें, तरी त्याच्यामुळें मनाला आल्हाद होतो ना? संसाराला सौंदर्य चढतें ना? जीविताला पूर्णता येते ना!" या आकर्षणानेंच ती बेभान होते; आणि अनिरुद्धाच्या डोळ्यांतील उन्मादामुळें तिचें व्यक्तित्व दचकून मागें सरतें. अनिरुद्धाला ती सोडून जाते त्यावेळीं तिचें तारुण्य लयाला गेलें होतें. नवीन प्रणयाच्या आकर्षणात सांपडण्याचें जें वय स्त्रीच्या बाबतींत सामान्यत: असतें त्याच्या पलीकडे ती गेलेली असते. आणि यामुळें भंगलेल्या देवळांत राहून भग्न मूर्तीवर आंसवाचा अभिषेक करीत दिवस घालविणाऱ्या उपासिकेप्रमाणें तिची अवस्था झाली आहे. अन्य पुरुषाच्या प्रणयांत तीं गुरफटूं शकत नसल्यामुळें गतस्मृतींचें चिंतन करणें ही एकच गोष्ट तिच्या प्रणयलालस आणि भावनावश मनाला आतां शक्य आहे. पण अनूची स्थिति उपासिकेसारखी झाली असली तरी अनिरुद्ध

मात्र कोणत्याहि प्रकारें विरघळलेला नाहीं. तो आपला मनूच्या सौंदर्याचा बहर लुटावयास तयारच! शेलीनें म्हटल्याप्रमाणें—

When hearts have once mingled,
Love first leaves the well-built nest ;
The weak one is singled
To endure what is once possest.
O Love! who bewailest
The frailty of all things here,
Why choose you the frailest
For your cradle, your home, and your bier ?

पुरुषांचें वर्तन कसेंहि असलें, त्यांनीं कितीहि प्रतारणा केली, कितीहि मनस्ताप दिला तरी त्याच्या प्रेमाच्या आणि त्यांच्याविषयींच्या आसक्तीच्या मोहांतून मुक्त होण्याची असमर्थता जशी अनूमध्यें दिसून येते त्याप्रमाणें माडखोलकरांच्या इतर कादंबऱ्यांतील बहुतेक स्त्रियांमध्येंहि स्पष्टपणें दिसून येते. 'शाप' मधील सुहास, 'दुहेरी जीवन' मधील सुलोचना. 'मुखवटे' मधील रोज इत्यादि स्त्रिया थोड्याफार अनूच्याच जातीच्या आहे.

पराकाष्ठेच्या भावनावशतेमुळें अरू आणि अनिरुद्ध याच्या बाबतींत तिला आकर्षण वाटतें. त्याबद्दल तिला दोष देण्याचें कांहींच कारण नसलें तरी एक गोष्ट तिनें करावयास नको होती असें वाटतें. मनूला तिनें आपल्या घरांत रहावयास बोलावलें हो तिची खास चूक झाली. बहिणी-प्रमाणें मानलेल्या व सर्वस्वीं निराधार झालेल्या मनूला तिनें आश्रय दिला यांत तिचें काय चुकलें, एखाद्यावर उपकार करणें हा मुद्धा गुन्हा आहे काय, असें कोणी विचारील. सकृद्दर्शनीं हा प्रश्न सयुक्तिक वाटतो. पण जरा खोलात जाऊन याचा विचार करावयास पाहिजे. मनू तिच्या घरीं केव्हां आली? तिचें अनिरुद्धाशीं लग्न होऊन जवळ जवळ एक तप झाल्यानंतर. या दीर्घ कालखडांत त्याच्या 'बेछूट' वर्तनाचे, त्याच्या मोहासक्ततेचे अनेक पुरावे तिला प्रत्यक्षपणें माहीत झाले होते. हा कांहीं सांगोवांगी प्रकार नव्हता. सारें कांहीं तिच्या डोळ्यासमोर चाललें होतें. स्त्रीचें तारुण्य लयाला गेल्याबरोबर भोगलोलुप पुरुषाचा कल

तडफडाट होऊं लागतो हें अक्षरशः रोज दिसत होतें तिला. बाळंतपणांतील आजारांतून तिची प्रकृति थोडी सुधारल्याबरोबर त्याचें बिथरलेलें मन पुन्हां थोडेसें ताळ्यावर येत असे हें तिला चांगलें माहीत होतें. मनू तिच्या घरीं येण्यापूर्वीच पुरुषांच्या दुरंत वासनांच्या भीषण परिणामाची तिला उत्कृष्ट ओळख झालेली होती. हें सर्व सांगण्याचें तात्पर्य असें कीं, नवरा असल्या प्रकारचा असतांना मनूला ती आपल्या घरीं रहावयास बोलावते हें तिचें चुकलें यांत मुळींच शंका नाहीं! बरें, मनू म्हातारी किंवा बरीचशी पोक्त तरी होती का! छे, जेमतेम अनूच्याच वयाची होती ती. शिवाय, अनेक बाळंतपणांमुळें अनूचें तारुण्य नष्ट झालें होतें व तिचें सारें सौंदर्य कोमेजून गेलें होतें. पण मनूची अशी अवस्था होती का? प्रसूतीचा त्रास नसल्यामुळें तिचें तारुण्य अजून टवटवीत असल्यास नवल नाहीं. आणि ती कुरूप होती काय? मुळींच नाहीं. ती चांगली सुंदर होती. अशा स्थितींत ही सौंदर्यवती आणि फारशी उपभुक्त नसलेली तरुण स्त्री अनिरुद्धासारख्या बेछूट चंडोलाच्या सांनिध्यांत अनूनें आपण होऊन आणून ठेवणें योग्य झालें काय? स्त्रीपुरुषांमधील विलक्षण आकर्षणाचा प्रभाव अनूला चांगला परिचित होता. अनिरुद्ध हा बोलून चालून बायरनचा चेला. त्याचा प्रश्नच नाहीं. पण मनूलाहि त्याच्या उन्मादक ऐटबाजपणाचा आणि सौंदर्याचा मोह पडेल अशी शंकासुद्धा तिला कशी आली नाहीं? अनू स्वतःच शेवटीं म्हणते, " मनूला त्याचा मोह पडला, याबद्दल तिला नावें ठेवायला जागा आहे का?......ती सुंदर आणि तेहि सुंदर—या दोघांना एकत्र येण्याची संधि देणाऱ्या मला संसारांतून उठावें लागलें याबद्दल मी त्यांना बोल का लावावा?" ( पृ. १५२ ) आपण त्या दोघांना एकत्र यावयाची उत्कृष्ट संधि दिली याची अनूलाहि जाणीव आहे. नवऱ्याची अनावर सौंदर्यासक्ति व बेफाम भोगलालसा यांची पुरेपुर ओळख असतांहि त्याच्या सौंदर्यपिपासू डोळ्यांपुढें मनूसारखी सुंदर स्त्री येऊं देऊन तिनें त्याच्या बुभुक्षेला आयतेंच खाद्य पुरविलें. कदाचित्, कोणी असें म्हणेल ( आणि अनूनें सुद्धां हेंच म्हटलें आहे. पृ. १५१ पहावें. ) कीं, मनू केवळ 'निमित्तमात्र' झाली. दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीच्यामागें तो लागलाच असता, कारण, त्याच्या

'रक्तांतच' आहे तें. कबूल. पण इरसाल मद्यपी काहीं झालें तरी कोठूनहि मद्य मिळवणारच हें माहीत असलें तरीं आपण होऊन कोणी त्याच्यापुढें मद्याचा प्याला आणून ठेवील काय ? 'नाहींतरी हा बाहेर जाऊन पिणारच, मग या एका प्याल्यानें काय बिघडणार आहे ?' असें कोणी विचारलें तर त्याला आपण काय म्हणूं ? नवरा पहिल्यापासूनच खराखुरा सच्छील आणि स्त्रियांच्या बाबतींत माथें भडकून घेणारा नाहीं अशी पूर्ण खात्री असती तरच एखादी तरुण सुंदर स्त्री नवऱ्याच्या सांनिध्यात येऊं देण्यास अनूला काहीं हरकत नव्हती. पण येथें साराच प्रकार विपरीत आहे. लग्नापूर्वीच जो जातिवंत बेछूट चंडोल होता व लग्नानंतर ज्यांचें चंडोलत्व प्रतिदिनीं वृद्धिंगतच होत होतें अशा नवऱ्याला अनूनें मनूच्या रूपानें घरांतच विलक्षण मोह निर्माण केला नाहीं काय ? सुरवातीला अनिरुद्ध बरेच दिवस मनूशीं बोलत नसे. अनूनेंच त्यांचें बोलणें सुरू केलें. "माझी जर धाकटी बहीण असती, तर आपण नसता कां मोकळेपणानं वागला तिच्याशीं ? तसंच मनूशींहि वागावयास हरकत नाहीं खरोखरी. आपल्या या असल्या वागण्यानं तिला बिचारीला किती अवघड वाटतं !" (पृ. १२३) हें औदार्यच अनूला फार थोड्या दिवसांत भोंवतें. हेंच काय, पण अनिरुद्धा-बरोबरोबर फिरावयास जाण्यासहि ती मनूला परवानगी देते. ही तिची कबुली पहा—"शेवटीं मीच मनूला म्हटलें, 'असला हा गोंधळ (मुलांना मनूचा लळा असल्यामुळें तीं तिच्यावाचून रहात नसत; म्हणून गोंधळ होत असे.) रोज पहाण्यापेक्षा जा बाई तूं फिरायला त्यांच्याबरोबर !" (पृ. १३१) पडत्या फळाची आज्ञा घेऊन तीहि जाते. पहिले दोन तीन दिवस ती मुलाना समुद्रापर्यंत पोंचवून त्याच पावलीं घरीं परत येत असे. पण जरा भीड चेपतांच ती अनिरुद्धाबरोबर वाळूंत गप्पा मारीत बसूं लागली. आणि एक दिवस छोटी मीना म्हणाली, "आई, आई, आज मावशी रडत होती किती तरी वेळ न् भाईसाहेबांनीं तिचे हात आपल्या हातात घेऊन कांहीं तरी सांगितलं तिला शेवटीं !" (पृ. १३४) पण, आतां हें अनूला कळू-नहि कांहींच फायदा नव्हता. दगड उताराला लागला होता आणि वाटेंत कसलाहि अडथळा नसल्यामुळें तो अगदीं तळापर्यंत गडगडत जाणार हें अगदीं स्पष्ट आहे !

## शेलीचा अवतार

प्लेटॉनिक लव्हच्या कल्पनांनीं भारलेल्या आणि सुंदर वस्तूंच्या केवळ चिंतनात समाधान मानणारा अरू शेलीचा अवतार आहे अगदीं. विलक्षण भावनावश असलेल्या माणसाला मधून मधून कवित्वाची स्फूर्ति येऊन आपल्या भावनांचा काव्यमय आविष्कार तो करतो. याप्रमाणेंच अरूलाहि अनेक वेळां कवित्वाचे झटके येत असत व तो अनूला लांबलचक काव्यमय पत्रें लिहीत असे किंवा तिच्यावर सॉनेट्स लिहीत असे. " He was subject to strange caprices, sudden frights, panic, terrors. Sometimes falling into a poetic vision, he forgot that he was expected to a tea-party " असें आंद्रे मोर्वाँनें शेलीचें वर्णन केलें आहे. याप्रमाणेंच अरूचेंहि वर्णन करितां येईल. तो अनूच्या शरीरावर किंवा हृदयावर प्रेम करीत नसून केवळ तिजविषयींच्या कल्पनेवरच प्रेम करीत आहे असें वाटतें. शार्लोटे स्टाइनच्या गटेवरील प्रेमाचें लुड्विगनें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे–" She loved the idea of Goethe, and not Goethe himself. " अरूचें अनूवर ज्या प्रकारचें प्रेम होतें त्याचें असेंच वर्णन करितां येईल. तिच्याशीं लग्न करून आपलें उच्च, उदात्त, चिंतनात्मक प्रेम अभिलाषेनें आणि उपभोगानें डागळण्याची त्याची इच्छा नाहीं. " तुझ्याविषयीं विचार करण्यांत, एखादेच वेळीं तुझ्या स्पर्शाचें सुख अनुभविण्यात जो आनंद मला वाटेल, तो कदाचित् जन्माची गांठ पडल्यानं नाहींसा होईल " अशी त्याला भीति वाटत आहे. प्रेमाचें खरें सुख प्रणयविषयाविषयीं वाटणाऱ्या उत्कंठेंतच असून त्याच्या प्राप्तींत नसतें; उपभोग घेतला कीं प्रेमांतील सौरस्य नष्ट झालेंच पाहिजे असें त्याला वाटतें. आणि येवढ्यासाठींच अतृप्ततेंत समाधान मानून उपभोगाच्या लालसेचा त्याग करावयास पाहिजे असें तो म्हणतो. पण अतींद्रिय तत्त्वज्ञान सांगत असतांच तिला स्पर्श करणें, तिचा हात हातांत दाबून धरणें, तिचीं बोटें आपल्या ओठावर दाबणें या साऱ्या गोष्टी तो नेहमींच करीत असतो हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. कदाचित् स्त्रीला वासनारहित स्पर्श करण्याची किमया त्याला साधली असेल !

तात्पर्य असें कीं, तिचें फक्त चिंतन त्याला करावयाचें आहे. हें चिंतन जें सुख प्राप्त करून देईल तें सुख तिच्याशीं लग्न केल्यानें अथवा तिचा उपभोग घेतल्यानें नाहींसा होईल असें त्याला वाटतें; कारण, 'उपभोग म्हटला कीं त्याच्या पाठोपाठ उपरति आलीच.' तिच्याविषयीं विचार करीत तो रात्रीच्या रात्री घालवितो. त्याच्या वहींतलं 'प्रत्येक सॉनेट' या गोष्टीला साक्ष आहे.

अरूच्या प्रेमाचें स्वरूप आपल्याला चांगलें कळलें. पण, शंका अशी कीं, अशा विचित्र प्रियकराना सौंदर्यचिंतनासाठीं प्रत्यक्ष स्त्री कशासाठीं लागते ? एखाद्या मनोमय, काल्पनिक सौंदर्याकृतीवर ते कां प्रेम करूं शकत नाहींत ? या अतींद्रिय प्रेमामुळें दोन गोष्टी साधतील. त्यांना स्वतःला चिंतनाचें सुख लाभेल आणि शिवाय अन्य कोणाहि व्यक्तीला त्या चिंतनाच्या जोडीलाच भावनोद्रेक करविणाऱ्या इतर गोष्टींचा उपसर्ग पोंचणार नाहीं. पण अरूच्या बाबतींत अशी अवस्था झाली आहे कीं, तो अनूकडे वासनारहित निर्मळ दृष्टीनें पहात आहे; पण त्याच्या निकट सहवासानें, भावनाविष्कारानें व शारीरिक स्पर्शानें अनू मात्र दरक्षणीं अधिकच गागरून जात आहे. यापेक्षां, एकाद्या सुंदर स्त्रीवर आणि तिच्या कल्पनेवर तिला नकळत प्रेमाचा वर्षाव करणें लाख पटींनीं चांगलें. दुसऱ्या व्यक्तीचा अशा प्रेमांत कांहीं संबंध नसल्यामुळें चिंतनापासून होणारें सुख अथवा दुःख चिंतन करणाऱ्या व्यक्तीपुरतेंच मर्यादित राहूं शकेल आणि इतर कोणालाहि तें चिंतन बाधणार नाहीं ! अनूचा स्वभावधर्म अरूच्या स्वभावधर्माहून पराकाष्ठेचा भिन्न असल्यामुळें त्याच्या या वासनारहित उदात्त प्रेमाचा बिचाऱ्या अनूला मात्र भयंकर ताप झाला ! एमीलिया व्हिवियानीचें दर्शन झाल्यावरोबर शेली तिच्यावर एकदम प्रेम करूं लागतो. हें वासनारहित प्रेम आहे अशी तो आपल्या पत्नीला ग्वाही देतो. 'प्लेटॉनिक लव्ह' करावयास कोणती हरकत आहे असाहि त्यानें युक्तिवाद केला असेल. पण एखाद्या सुंदर स्त्रीवर असें प्रेम करण्याऐवजीं एखाद्या सुंदर पुतळ्यावर त्यानें प्रेमाचा वर्षाव केला असता किंवा डांटेला ज्याप्रमाणें त्याची काल्पनिक प्रेयसी बियाट्रिस कधींच भेटली नव्हती त्याप्रमाणें शेलीला ही लावण्यवती भेटली नसती तर बरें झालें असतें असें त्याच्या पत्नीला

वाटतें. आणि तें स्वाभाविक आहे. चिंतनासाठीं प्रत्यक्ष स्त्रीच कशाला पाहिजे ? स्त्रीची काल्पनिक मूर्ति कां चालूं नये ? पण निर्गुण, निराकार मूर्तीचें ध्यान करण्यापेक्षां सगुण, साकार मूर्तीचेंच ध्यान करणें सुलभ जातें हें सत्य असल्यामुळें आपल्या चिंतनासाठीं अरूला अनूची सगुण मूर्ती निवडणें भाग पडलें असावें ! भक्ताच्या चिंतनाचा परमेश्वराला काय उपसर्ग पोंचत असेल तें आपल्याला सांगतां येत नाहीं. पण अरूच्या या वासनारहित सौंदर्यचिंतनाचा अनूला मात्र फारच उपसर्ग झाला हें आपल्याला चांगलें ठाऊक आहे !

## —आणि बायरनचा अवतार

अरू शेलीचा अवतार असला तर अनिरुद्ध बायरनचा अवतार आहे. त्याला बायरनसारखेंच बेछूट आयुष्य घालवावेंसें वाटतें; आणि बायरनप्रमाणेंच लग्न झाल्याबरोबर अनूवरील आपलें प्रेम नष्ट होऊं लागलें आहे असें त्याला वाटूं लागतें. भोगलोलुपता, अतृप्तता, वैचित्र्याची आवड, सौंदर्यासक्ति इत्यादि गोष्टी त्याच्या रक्तातच आहेत. अनावर भोगलालसेमुळें जो कठोरपणा किंवा क्रूरपणा उत्पन्न होतो तोहि त्याच्या ठिकाणीं भरपूर आहे. ज्या निष्ठुरपणें बायरन मिस् क्लेअरचा त्याग करतो व स्वतःपासून तिला झालेली मुलगीहि तिच्या ताब्यात देण्याचें नाकारतो त्याच निष्ठुरपणें अनिरुद्धहि अनूशीं ती घर सोडून जातांना वागतो.

भोगलोलुप पुरुषी प्रेमाचा हा नमुना माडखोलकरांच्या पुढच्या कांहीं कादंबऱ्यात थोड्या फार फरकानें पुन्हा आला आहे. 'दुहेरी जीवन' मधील मुकुंद, 'मुखवटे' मधील मोहन, 'डाकबंगला' या कादंबरींतील रतिलाल, इत्यादि 'स्त्रीसौंदर्याची शिकार करावयास' निघालेले माडखोलकरांचे पुरुष जवळ जवळ अनिरुद्धाचेच वारसदार आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. असल्या भोगलोलुप चंडोलाच्या तावडींत सांपडलेल्या स्त्रियाचें संरक्षण करण्यास विवाहसंस्था कितपत उपयोगी पडेल हा एक प्रश्नच आहे. विवाहाची बेडी पायांत अडकलेली असतांहि आपल्या निरर्गल वासनांच्या तृप्तीसाठीं प्रतिदिनीं नवीन

सौंदर्याची शिकार करावयास ते तयारच असतात. विवाहसंस्थेचें त्यांना कोणतेंहि बंधन नाहीं !

## प्रेमाचा उन्माद

स्त्रीपुरुषांमधील आकर्षणाची महती अनूनें वारंवार वर्णिलेली आहे. प्रेमाला ती 'उन्माद' म्हणत आहे. "जिथें प्रेम, जिथें मीलन तिथें उन्माद हा असावयाचाच...त्या उन्मादाचा अनुभव ज्यानें घेतला नाहीं, त्यानें प्रेमच कधीं केलें नाहीं." तिच्या मतें प्रणयाइतका उन्मादकारी मोह मानवी जीवनांत दुसरा कोणताहि असं शकणार नाहीं. पण प्रणय ही चीज मोठी विलक्षण असून तिच्यात विषाची दाहकता, सुधेचें माधुर्य आणि सुरेची मादकता या तीन परस्परविरोधी गुणांचा मिलाफ झालेला असतो. तें कांहीं असलें तरी, स्त्रीपुरुषामधील आकर्षण पराकाष्ठेचें लोभनीय असतें यांत तिला शंका वाटत नाहीं. "स्त्रीपुरुषामधलें आकर्षण कोणीही उत्पन्न केलें असलें, तरी त्याच्यामुळें मनाला आल्हाद होतो ना ? संसाराला सौंदर्य चढतें ना ? जीविताला पूर्णता येते ना ? मग त्या आकर्षणाविषयीं तुच्छतेनें बोलण्यांत काय अर्थ ?"

## स्त्रीचें प्रेम आणि पुरुषी प्रेम

प्रणयाचें आकर्षण अमर्याद असतें व त्याचा प्रभाव स्त्री व पुरुष या दोघावरहि सारखाच असतो हें खरें असलें तरी स्त्रीचें प्रेम व पुरुषी प्रेम यांचें स्वरूप मात्र मूलतः भिन्न असतें असें अनूनें आग्रहानें प्रतिपादन केलें आहे. तिचें म्हणणें असें कीं, स्त्री जेव्हा पुरुषावर प्रेम करते तेव्हां तें ती अत्यंत तन्मयतेनें व उत्कटतेनें करते, पुरुषाच्या मनाशीं व जीवनाशीं ती इतकी समरस होते कीं, त्याच्यावाचून तिला स्वतःचें स्वतंत्र अस्तित्वच मुळीं उरत नाहीं. "प्रेमासाठीं सर्वस्वाचा त्याग फक्त स्त्रीनंच करावा. ती जेव्हां प्रेम करते, तेव्हां प्रियकराशिवाय वेगळं अस्तित्वच तिला मुळीं उरत नाहीं.—तिच्या जीवनाचा ओघ त्याच्या जीवनांत मिसळून जातो, नाहींसा होतो." तात्पर्य, नदी समुद्राला मिळाल्यानंतर ज्याप्रमाणें तिला स्वतंत्र अस्तित्वच रहात नाहीं त्याचप्रमाणें स्त्रीचें जीवन पुरुषाच्या जीवनांत

पूर्णपणें विलीन होऊन जातें. पण पुरुषाचें प्रेम मात्र अशा प्रकारचें नसतें असें अनूचें म्हणणें आहे. पुरुषाचा स्वभाव स्वार्थी असल्यामुळें त्याचें प्रेमहि स्वार्थी असलें पाहिजे हें ओघानेंच आलें. पुरुष हा प्रेमाच्या बाबतींत नेहमींच अतृप्त राहतो. किंबहुना 'अतृप्तता' हा पुरुषजातीला मिळालेला शाप आहे असें तिचें म्हणणें आहे. तिच्या मतें प्रीतीच्या समाधींत प्रेमिकांच्या व्यक्तित्वाचा लय व्हावा. पण तो लय क्षणिक मात्र नसावा. अतृप्ततेच्या वेदनांनीं त्यांनीं तळमळूं नये. पुरुष प्रीतीच्या समाधींत सुद्धां स्त्रीशीं कधींच पूर्णपणें समरस होत नाहीं. त्याला आपलें स्वत:चें व्यक्तित्व वेगळें ठेवावेसें वाटतें, त्याच्या मनाची तृप्ति होत नाहीं व अतृप्ततेच्या वेदनांनीं तो सतत तळमळत राहतो अशी तिची तक्रार आहे. पुरुषी प्रेमाचें हें स्वरूप ती रॉबर्ट ब्राऊनिंगच्या 'Two in the Campagna' या कवितेच्या आधारें विशद करिते. "प्रीतीच्या उन्मादांत प्रेमी जनांना लाभणारं अद्वैताचं सुख, ब्राउनिंगनें म्हटल्याप्रमाणं, खरोखरीच इतकं क्षणिक, इतकं फसवं असतं का? प्रीतीच्या समाधींत प्रेमिकांच्या व्यक्तित्वाचा लय क्षणमात्रच व्हावा न् अतृप्ततेच्या वेदनांनीं त्याचं मन सदोदित तळमळत रहावं, इतकी माणसांची स्वत:च्या व्यक्तित्वाची चाड बलवत्तर आहे का?" तिचा आशय असा कीं, अतृप्ततेची कल्पना पुरुषांच्या स्वार्थी स्वभावाला शोभेशीच असून ब्राउनिंग पुरुष असल्यामुळें तो आपल्या जातीवरच गेला यांत कांहीं आश्चर्य नाहीं. रॉबर्ट ब्राउनिंगच्या जीवनाशीं एलिझबेथ जितकी तन्मय झाली होती तितका तो तिच्या जीवनाशीं समरस झाला नव्हता, व होणें शक्यहि नव्हतें असा तिच्या म्हणण्याचा रोख आहे. ज्या श्लोकांचा आधार घेऊन अनू ब्राउनिंगच्या अतृप्त 'पुरुषी' प्रेमाच्या कल्पनेवर टीका करीत आहे ते श्लोक मुळांत पुढीलप्रमाणें आहेत—

I would that you were all to me,
You that are just so much, no more.
Nor yours nor mine, nor slave nor free!
Where does the fault lie? what the core
O' the wound, since wound must be?

I would I could adopt your will,
See with your eyes, and set my heart
Beating by yours, and drink my fill
At your soul's springs--your part my part
In life, for good and ill.

No. I yearn upward, touch you close,
Then stand away. I kiss your cheek,
Catch your soul's warmth--I pluck the rose
And love it more than tongue can speak—
Then the good minute goes.

Just when I seemed about to learn !
Where is the thread now ? Off again ?
The old trick ! Only I discern--
Infinite passion, and the pain
Of finite hearts that yearn.

या श्लोकांत ब्राउनिंगची खरी तक्रार कोणती आहे ? प्रेमाच्या समाधींत प्रियेच्या व्यक्तित्वाशीं पुरुषाचा लय क्षणमात्रच होत असून नंतर अतृप्ततेची वेदना तेवढी उरते, आपलें व्यक्तित्व निराळें रहावें अशी त्याची धडपड असते ही अनू म्हणते त्याप्रमाणें त्याची तक्रार आहे काय ? मला तसें वाटत नाहीं. मला त्याचा आशय असा दिसतो कीं, प्रेमविषयाशीं सर्वस्वीं तद्रूप व्हावें, त्यांत अक्षरशः विलीन होऊन जावें अशी माणसाची तीव्र इच्छा असते. पण, हें शक्य होण्याच्या मार्गांत माणसाचीं बन्धनें आडवीं येतात. आपण कितीहि धडपडलों तरी आपलीं मनें अक्षरशः तादात्म्य पावणें शक्य नाहीं. आपलीं मनें अमर्याद इच्छा करीत असलीं तरी ती इच्छा देहाच्या शृंखलांमुळें संपूर्णपणें सफल होण्याची शक्यता नाहीं. शरीरें एकत्र आलीं तरी मनें पूर्णपणें एकत्र कशीं आणतां येणार अशी ब्राउनिंगची शंका आहे. तीं एकत्र आणावीं, त्यांचें तादात्म्य व्हावें अशी त्याची तळमळ आहे. पण जोंपर्यंत शरीरें भिन्न आहेत तोंपर्यंत ही तळमळ खऱ्या अर्थानें थांबणार नाहीं असें त्याला वाटतें.

We shall become the same, we shall be one
Spirit within two frames......

असें शेलीनें कितीहि जीव तोडून सांगितलें तरी दोन व्यक्तींचें पूर्ण तादात्म्य होणें ही गोष्ट अशक्य आहे. असें तादात्म्य व्हावें हीच ब्राउनिंगची खरी तळमळ आहे. पण आपण मानव सान्त ( finite ) असल्यामुळें शरीराचे बंध तुटल्याशिवाय आपणांस अनन्तांत ( infinite ) विलीन होतां येणें शक्य नाहीं, व असें असल्यामुळेंच प्रेमी जनांचें संपूर्ण तादात्म्य होऊं शकत नाहीं या विचारानेंच ब्राउनिंग खिन्न झालेला आहे. त्याची ही खिन्नता म्हणजे भोगलोलुपाची अतृप्तता आहे अशी समजूत करून घेण्याचें कांहींहि कारण नाहीं. प्रेमिकाच्या व्यक्तित्वाचा लय क्षणमात्रच होतो याचेंच त्याला वाईट वाटत आहे. तो लय निरवधि असावा असें त्याला मनापासून वाटत आहे. पण असा निरवधि लय बंधनांमुळें होऊं शकत नसल्यामुळें त्याचें मन तळमळत आहे. अतृप्तता असलीच तर ती वासनांची अतृप्तता नव्हे, प्रियेच्या जीवनाशीं संपूर्णपणें तादात्म्य पावावें या अमर्याद इच्छेची अतृप्तता आहे, आणि तादात्म्याच्या इच्छेची खरी पूर्ति न झाल्यामुळें तो म्हणतो--

Infinite passion, and the pain
Of finite hearts that yearn.

यावर भाष्य करीत असतां जे. एच. फाउलर यानें जे उद्गार काढले आहेत त्यांचा विचार करणें जरूर आहे. फाउलर म्हणतो-" He would fain lose his separate identity and become wholly absorbed in the beloved, but the finite bounds of our nature cannot be so transcended, we remain separate, the yearning is unfulfilled." शरीराच्या शृंखला आड येत असल्यामुळेंच मनें खऱ्या अर्थानें एक होऊं शकत नाहींत हीच कल्पना एम्. ई. कोलरिजच्या पुढील शब्दांत व्यक्त झालेली दिसेल—"How far away we are from each other. Two walls of flesh between me and the nearest person on the earth ! "तात्पर्य असें कीं, ब्राउ-

निंगच्या म्हणण्याचा अनूनें संपूर्ण विपर्यास केला असून त्याला विनाकारणच अन्याय केला आहे. ब्राउनिंगच्या जीवनाशीं संपूर्णपणें समरस झालेली एलिझबेथहि म्हणते--

--I love thee with the breath
Smiles, tears, of all my life!—and, if God choose,
I shall but love thee better after death.

दुसरें असें कीं, अतृप्ततेची कल्पना पुरुषांच्या स्वार्थी स्वभावाला शोभेशी असून पुरुष आपल्या जातीवर जाणारच हा विचार आग्रहानें मांडणाऱ्या अनूला भवभूतीच्या रामाची आठवण कां झाली नाहीं? नुकतीच तिनें अरूबरोबर भवभूतीविषयीं चर्चा केली होती अणा पुरावा आहे. म्हणून प्रियकराशिवाय स्त्रीला वेगळें अस्तित्व असूंच शकत नाहीं, पण पुरुष मात्र प्रेयसीशीं तादात्म्य पावूं शकत नाहींत ही तक्रार करण्यापूर्वी उत्तररामचरितातील 'अद्वैतं सुखदुःखयोरनुगतं सर्वास्ववस्थापि यद्, विश्रामो हृदयस्य यत्र जरसा यस्मिन्नहार्यो रसः।' या ओळींमध्यें रामानें स्त्रीपुरुषांतील प्रणयाचें जें उदात्त स्वरूप वर्णिलें आहे त्याचा अनूनें थोडा तरी विचार करावयास हवा होता. कदाचित् अनूच्या कानापर्यंत हा विचार गेला नसावा. तिनें फक्त 'मालतीमाधव' हें एकच नाटक वाचलें असावें.

## स्त्रीचें जीवन नदीसारखें कीं वेलीसारखें?

स्त्रीच्या जीवनाचा ओघ सर्वस्वीं पुरुषाच्या जीवनांत मिसळून जातो व त्याच्याशिवाय तिला निराळें जीवन उरत नाहीं. आणि हाच स्त्रीच्या व पुरुषाच्या प्रेमांतील महत्त्वाचा फरक आहे असें विवाहापूर्वी अनू आग्रहानें प्रतिपादन करते. पण प्रत्यक्ष व्यवहारांतील अनिरुद्धाच्या अतिरिक्त भोगलालसेचा तिरस्कार उत्पन्न झाल्यानंतर तिचे या बाबतींतील विचार किती बदलतात हें पाहण्यासारखें आहे. तिनें आपल्या सेवेंत अहोरात्र राबावें, आपण बाहेरून घरीं परतल्याबरोबर तिनें आपल्या स्वागतार्थ दारांत उभें राहिलें पाहिजे, एक क्षणहि दूर जातां कामा नये, किंबहुना तिला आपल्याशिवाय वेगळें अस्तित्वच उरता कामां नये अशी अनिरु-

द्धाची समजूत झालेली होती. प्रेमाच्या या विलक्षण प्रकारामुळें कोणतीहि स्त्री वैतागली तर त्यांत काहीं नवल नाहीं. अनूसुद्धा अशीच वैतागते आणि स्त्रीला पुरुषाशिवाय वेगळें अस्तित्व नसते हें अल्लड वयांत केलेलें प्रतिपादन स्वाभाविकच विसरून जाते व तीव्र निराशेच्या पोटीं विचारते, "स्त्री ही काय नदीसारखी कुणाशीं तरी सर्वस्वानें समरस होण्याकरितां कुणाच्या तरी जीवनांत स्वतःच्या जीवनाचा विलय करून घेण्याकरिता का जन्माला येत असते?........ आम्हा स्त्रियाचें जीवन हें नदीसारखें आहे कीं वेलीसारखें!" स्त्रीचें जीवन वेलीसारखें असावें असें आतां अनूला वाटूं लागलें आहे. वेल वृक्षाचा आधार घेत असली तरी त्यामुळें तिचें स्वतंत्र अस्तित्व मुळींच लोपत नाहीं. असेंच स्त्रीचें जीवन असावें. या प्रकारच्या जीवनांत स्त्रीच्या व्यक्तिविकासाला वाव राहून तिला पुरुषाचें निकट साहचर्यहि लाभतें असा तिचा अभिप्राय आहे. हें सारें बरोबर आहे. पण, मग, प्रेयसीच्या व्यक्तित्वांत आपलें व्यक्तित्व संपूर्णपणें विलीन करितां येत नाहीं म्हणून खिन्न होणाऱ्या ब्राउनिंगच्या प्रेमाला 'पुरुषी प्रेम' असें कसें संबोधतां येईल आणि पुरुषांच्या स्वार्थी स्वभावावर व अतृप्ततेवर कशी टीका करितां येणार?

## नवीन सामाजिक प्रश्न

या कादंबरींतून आणखी एक महत्त्वाचा सामाजिक प्रश्न निर्माण होत आहे. आतां अनेक कारणामुळें स्त्रिया व पुरुष याचा संबंध सार्वजनिक ठिकाणीं अधिकाधिक येत आहे व यापुढच्या काळांत तर तो वाढतच जाणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. अविवाहित पुरुषाचा अविवाहित स्त्रीशीं निकट परिचय होऊन त्याचें पर्यवसान विवाहात झालें तर त्यात दूषणीय असें काहींच नाहीं. पण विवाहित पुरुषांशीं अविवाहित स्त्रियांचा विविध कारणामुळें परिचय वाढत गेल्यास व अविवाहित अथवा विधवा स्त्रियाना विवाहित पुरुषाविषयीं विशेष प्रकारचें आकर्षण वाटूं लागल्यास जे प्रश्न उत्पन्न होण्याचा संभव आहे त्या प्रश्नाना यापुढें समाजाला तोंड द्यावें लागणार असें स्पष्ट दिसत आहे. विवाहित पुरुषहि जर एकाद्या अविवाहित स्त्रीकडे कोणत्याहि कारणांसाठीं आकृष्ट झाला व त्याच्या

पत्नीला त्याची झळ पोंचूं लागली तर तिनें अशा स्थितींत काय करावें? नवऱ्याच्या दुसरेपणाच्या लाडकीशीं प्रेमानें वागून एकत्र नांदावें, कीं तिच्याशीं व नवऱ्याशीं भांडून ( अथवा न भांडतां ) घराबाहेर पडावें? वगैरे अनेक प्रश्न डोक्यात काहूर करतात यांत शंकाच नाहीं. अशिक्षित, असंस्कृत व गुणहीन अशा पत्नीला विटल्यामुळें पुरुष बुद्धिमती व कलावती अशा सुसंस्कृत स्त्रीवर 'बौद्धिक' प्रेम करूं लागतो असें आपण नेहमीं ऐकतों. पण, प्रस्तुत कादंबरींत उलटा प्रकार झालेला आहे. अत्यंत बुद्धिमती व सुसंस्कृत अशा अनूच्या पाशांतून आपली सुटका करून घेऊन अनिरुद्ध मनूकडे आकृष्ट होतो. मनू ही अनूच्या मानानें शिक्षणांत व संस्कृतींत कितीतरी मागासलेली आहे हें अगदीं स्पष्ट आहे. मग अनिरुद्ध तिच्याकडे कां वळला? ही बौद्धिक प्रेमाची भूक खास नाहीं. कारण अनूच्या सहवासांत तें प्रेम त्याला मिळणें खास शक्य होतें. मग तो मनूकडे कां वळला? एकच कारण आहे. मनू सुंदर होती व अजून तरुण होती. तिचें सौंदर्य वारंवार होणाऱ्या प्रसूतीमुळें 'डागळलें' नव्हतें, तें अजून टवटवीत होतें. एवढें एकच कारण अनिरुद्धाच्या या ( कितव्या कोणास ठाऊक! ) नवीन प्रेमाच्या मुळाशीं आहे. पहिल्या स्त्रीपासून बौद्धिक सुख प्राप्त न झाल्यामुळेंच पुरुष दुसऱ्या एकाद्या बुद्धिमती स्त्रीशीं सहवास करूं पाहतो असे विचार मांडणाऱ्या लोकांना प्रस्तुत पुस्तकांतील प्रणयप्रकरण चिंत्य वाटेल असें वाटतें!

माडखोलकरांच्या पुढच्या कांहीं कादंबऱ्या पाहिल्या तर त्यांतील विवाहित पुरुष पत्नीखेरीज अन्य स्त्रियांकडे आकृष्ट होतात याचें कारण पत्नी असंस्कृत अथवा बुद्धिहीन असते हें मुळींच खरें नाहीं असें दिसून येईल. ' दुहेरी जीवन ' या कादंबरींतील सुलोचना सर्वगुणसंपन्न असूनहि मुकुंद तिची प्रतारणा करून इतर स्त्रियांच्या पाशांत सापडतो, 'मुखवटे' मधील रोजमुद्धां सौंदर्यवती व बुद्धिमती आहे; पण तिचा प्रियकर मोहन घरांत स्थिर राहूं शकत नाहीं. 'नवे संसार' या कादंबरींतील विद्याधर हा स्वभावतः सालस आहे, अनिरुद्धाप्रमाणें चंडोल नाहीं; त्याची पत्नी मीरा हीसुद्धां त्याच्याशीं समरस होण्याच्या लायकीची आहे; तरीसुद्धां तो मुक्ता नावाच्या स्त्रीकडे आकृष्ट होतो व तें आकर्षण मर्यादा सोडण्याच्याहि

बेतांत येतें. तात्पर्य, माडखोलकरांच्या कादंबऱ्यांतील अन्य स्त्रियावर आसक्त होणारे विवाहित पुरुष बुद्धिमती स्त्रियांच्या शोधांत नसून वैचित्र्याच्याच शोधांत आहेत असें दिसून येईल.

सामान्यत: असें दिसून येतें कीं, 'आपण बौद्धिक प्रेमासाठीं दुसऱ्या स्त्रीकडे आकृष्ट झालों' असें म्हणणारा विवाहित पुरुष दुसऱ्याची व स्वतः-चीहि फसवणूक करीत असतो. बौद्धिक प्रेमाचा हव्यास काहीं पुरुषांना असूं शकेल, नाहीं असें नाहीं. पण असें बौद्धिक प्रेम करूं पाहणारे विवाहित पुरुष म्हाताऱ्या स्त्रीकडे अथवा कुरूप स्त्रीकडे वळत नाहींत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. यावरून बौद्धिकत्वाच्या जोडीला सौंदर्यहि आवश्यक असतें हें दिसून येईल. हें झालें खास 'बौद्धिक' प्रेमिकाचें वर्णन. अनिरुद्धासारखे जे कोणी भ्रमरवृत्तीचे लंपट पुरुष असतात त्याना स्त्रीच्या बुद्धिमत्तेची फिकीरच नसते. ते केवळ आस्वादाच्या विविधतेच्या आणि वैचित्र्याच्या मागें असतात. त्यांना वरचेवर नावीन्य हवें असतें. हें वैचित्र्य आणि नावीन्य प्राप्त झालें म्हणजे त्यांना स्त्रीच्या बुद्धितेजाची फारशी गरज नसते. नवीन शोधलेली स्त्री बुद्धिमती असली तर चांगलेंच, पण तशी ती नसली तर कांहीं बिघडत नाहीं. अनिरुद्धाचें मन मनूकडे आकृष्ट झालें तें कांहीं ती बुद्धिमती होती म्हणून नव्हे. त्याला प्रेयसीमध्यें किती आणि कशा प्रकारची बुद्धि हवी होती ? बायरनच्या उद्‌गारांत याचें उत्तर सापडेल. बायरन म्हणतो, "My beau-ideal would be a woman with talent enough to understand and value mine, dut not sufficient to be able to shine herself." पत्नीची बुद्धिमत्ता ओळखता येईल व तिचें महत्त्व पटेल इतकी बुद्धीची देणगी स्त्रीमध्यें असली म्हणजे अनिरुद्धाच्या वर्गांतील, किंबहुना, सामान्यत: बहुतेक पुरुषांचें समाधान होतें. स्वतःपेक्षां अधिक तेजस्वी बुद्धिमत्ता स्त्रीच्या ठिकाणीं असली तर तें त्याला परवडत नाहीं. यामुळें बौद्धिक प्रेमाची सबब पुढें करून व पत्नीकडे दुर्लक्ष करून अन्य स्त्रीच्या प्रेमाकडे वळणाऱ्या विवाहित पुरुषाच्या आचरणांतील मर्म कळून येईल असें वाटतें.

आणखी एक निकडीचा प्रश्न विवाहित स्त्रीपुरुषांच्या आयुष्यांत उत्पन्न झालेला आहे. सध्याच तो प्रश्न बिकट होऊन बसला आहे. पण यापुढच्या

काळांत तो अधिकच बिकट होईल यात कोणतीच शंका नाहीं. विशेषतः ज्या विवाहित स्त्रिया सुशिक्षित आणि सुसंस्कृत असतात व ज्याचे पति इतर तरुण अविवाहित स्त्रियांच्या सहवासांत राजरोस येण्याची शक्यता असते त्याची मानसिक व्यथा वृद्धिंगत होण्याचेच योग दिसत आहेत. म्हणजे असें कीं, आपल्या नवऱ्याशीं 'प्रथमवयसाकाळीं' असलेली एखादी सुशिक्षित अथवा अर्धशिक्षित स्त्री सलगी वाढवूं इच्छीत आहे हें ध्यानांत येऊनहि तिला अडथळा कसा करावा हें बहुशः सुशिक्षित विवाहित स्त्रियांना समजत नाहीं. येवढया तेवढया कारणावरून नवऱ्याच्या परिचयांतील एखाद्या सुशिक्षित व सुसंस्कृत स्त्रीशीं भांडणें अथवा वाद-विवाद करून तिचें व नवऱ्याचें संघटन कमी करणें ही गोष्ट सुशिक्षणामुळें उत्पन्न झालेल्या उदारपणाला शोभून दिसत नाहीं असें त्यांना वाटतें. आणि हें बरेंचसें स्वाभाविकहि आहे. यामुळें दुसऱ्या बाईशीं नवऱ्याचा परिचय वाढत चालला आहे हें डोळ्यांना दिसत असतांहि आपला काक्षेखोरपणा दिसेल या भीतीनें त्या स्वस्थ बसतात. नवऱ्याला स्पष्टपणें एखाद्या धीट स्त्रीनें विचारलेंच तर आपल्या निर्मळपणाची ग्वाही कोणताहि पुरुष मोठ्या आत्मविश्वासानें देऊं शकत असल्यानें तिच्या त्या धीटपणाचा कांहीं उपयोग होत नाहीं. परिणाम असा होतो कीं, पूर्वी सोज्वळ भासणारा परिचय एकाएकीं बिथरतो व आपल्या हक्काचे विचार मग पहिलीच्या डोक्यांत येऊं लागतात. पण हें फार उशीरा होतें. नेमकें हेंच अनू आणि मनू यांच्या बाबतींत घडलें आहे हें अगदीं स्पष्ट आहे. स्त्रीच्या ठिकाणीं जें 'अंतर्ज्ञान' असतें असें म्हणतात त्याचाहि मग कांहीं उपयोग होऊ शकत नाहीं. कोणतेंहि ज्ञान वेळींच झालें तर उपयोगीं पडतें!

मागच्या पिढ्यातील अनेक प्रतिष्ठित गुलहौशी पुरुष 'अंगवस्त्रें' बाळगीत असत हें आपण जाणतों. गडकऱ्यांच्या भाषेंत बोलावयाचें झालें तर या बाबतींत 'थोराघरचे दाखले आहेत.' असें जर आहे तर आधुनिक सुशिक्षितांना नांवें ठेवण्याचा अथवा त्यांच्या चारित्र्याविषयीं शंका घेण्याचा कोणाला कसा अधिकार मिळतो अशी शंका एखादा घेईल. बाह्यतः तरी पूर्वीच्या लब्धप्रतिष्ठितानीं अंगवस्त्रें आणि उपांगवस्त्रे बाळगणें आणि सध्यांच्या सुशिक्षितांनीं पत्नीशिवाय दुसऱ्या एखाद्या अविवाहित ( अथवा क्वचित्

विवाहित ) स्त्रीशीं निकटतम परिचय ठेवणें या कृतींत फरक दिसत नाहीं हें खरें आहे. पण थोडा खोल विचार केला तर कांहीं निराळेंच सत्य प्रतीत होण्याचा संभव आहे असें वाटतें. अंगवस्त्रें बाळगणारे पूर्वीचे घरंदाज व 'अब्रूदार' लोक त्या गोष्टीकडे केवळ शारीरिक सुखाच्या भावनेनेंच पहात असत. शिवाय त्यांचे या बाबतींतील 'पराक्रम' बहुंशीं घराबाहेर चालत असत. घरच्या कुटुंबिनीला या अंगवस्त्रांचा सामान्यतः उपसर्ग पोंचत नसे, व अंगवस्त्रें पांघरणारे लोकहि बाहेरचीं प्रकरणें घरांत आणून कुटुंबाच्या स्वास्थ्यात बिघाड निर्माण करीत नसत. त्यांचा बाहेरच्या स्त्रियांशीं संबंध येई तो केवळ शरीरसुखासाठीं ! तेवढें झालें कीं, झाल्या गोष्टीवर ते चांगला जाडजूड पडदा टाकून मोकळे होत व यामुळें घर अबाधित रहात असे. त्या बाहेरच्या बायकांनाहि यापासून कोणताच मनस्ताप होत नसे. एकमेकांची मनोमन समजूत असल्यावर या गोष्टींचा प्रश्नच उद्‌भवण्याचें कारण नव्हतें. पण, आतां हें सारें बदललें आहे. विवाहितांच्या संसारांत शिरणाऱ्या सुशिक्षित स्त्रियांची भूमिका अत्यंत निराळी असते. अंगच्या चातुर्यामुळें व शिक्षणामुळें उत्पन्न होणाऱ्या धूर्ततेमुळें त्या विवाहित पुरुषाच्या मनाला व त्याच्या भावनांनाच प्रथम कबजांत घेऊन टाकतात. आणि मग, असे पुरुष केवळ शरीरानेंच नव्हे तर मनानेंहि आपल्या पहिल्या प्रेयसीपासून दुरावतात व शेवटीं तिचा तिरस्कार करण्यापर्यंत ते धृष्ट होतात. यामुळें, मागच्या पिढींतल्या पांढरपेशा स्त्रियांना, जीं दुःखें अज्ञात होतीं त्या दुःखांचा आजच्या कांहीं सुशिक्षित स्त्रियांना साक्षात् परिचय होऊन त्यांच्या मनाचा विलक्षण कोंडमारा होत आहे हें नाकबूल करण्यात कांहीं अर्थ नाहीं !

## भंगलेल्या देवळांतील सौंदर्य

या कादंबरींतील भाषा माडखोलकरांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें प्रौढ असली तरी 'मुक्तात्मा' या पहिल्या कादंबरींतील अनिवार संस्कृतप्राचुर्यामुळें उत्पन्न झालेली क्लिष्टता येथें अगदीं दिसणार नाहीं. प्रौढत्व, उदारता, आणि अर्थगौरव या तीनहि गुणांनीं या कादंबरीची भाषा युक्त आहे. हें सारें असूनहि भाषेचें लालित्य आणि आकर्षकत्व मुळींच कमी झालेलें

नाहीं. कोमल भावनांचा आविष्कार करावयास ज्या शैलीची आवश्यकता असते त्या शैलीचा या कादंबरींत प्रकर्ष झालेला आहे. अनूच्या हृदयाच्या व्यथांचा आविष्कार करणें हाच या कादंबरीचा प्रधान हेतु असल्यामुळें गडकरीछाप निसर्गवर्णनांना यांत फारसें स्थान नाहीं. अशीं वर्णनें करतां आलीं नसतीं असें नाहीं; पण माडखोलकरांनीं याबाबतींत चांगलाच संयम पाळला आहे. पृ. ६७ वरील रात्रीचें वर्णन, पृ. ७४ वरील व ८० वरील समुद्राचें वर्णन इत्यादि वर्णनें आकर्षक परंतु संयत आहेत. संयमाचें आणखी एक चांगलें उदाहरण पाहावयाचें असल्यास पति मृत झाल्यामुळें निराधार स्थितींत माहेरीं परत आलेल्या मनूचें पृष्ठ ३८–३९ वरील वर्णन पहावें. प्रेमिकांच्या उन्मादक शृंगाराचें वर्णन करीत असतांहि माडखोलकरांनीं चांगलाच संयम दाखविला आहे. औचित्य आणि अभिरुचि यांच्या मर्यादा निदान या कादंबरींत तरी त्यांनीं योग्य प्रकारें संभाळल्या आहेत व कोठेंहि औचित्यभंग केला नाहीं. पुढच्या कादंबऱ्यांत देखील या मर्यादा त्यांनीं संभाळल्या असत्या तर ? कलात्मक शैलीच्या जोडीला अनूचा उत्कृष्ट भावनाविष्कार हा या कादंबरीचा विशेष होय. पहिल्या प्रणयामुळें तिच्या मनाची झालेली चलबिचल व प्रणयपूर्तीचें स्वप्न सफळ झाल्याचा भास; अनिरुद्धाच्या उन्मादक प्रेमामुळें झालेली तिची बेभान व धुंद अवस्था आणि सर्वस्वाच्या सत्यानाशानें पिचून गेलेल्या तिच्या मनाची कारुण्यपूर्ण अवस्था, या तीनहि अवस्थांचें विश्लेषण मोठें हृद्य झालें आहे यांत शंका नाहीं. 'करुणस्य मूर्तिरथवा शरीरिणी विरहव्यथेव वनमेति जानकी' हें भवभूतीनें विरहिणी सीतेचें केलेलें वर्णन 'भग्न मूर्तीवर आंसवांचा अभिषेक करीत आयुष्य घालविणाऱ्या' अनूच्या बाबतींतहि सार्थ नाहीं काय ?

माडखोलकरांची भाषा सफाईदार व आकर्षक असली तरी एकंदरींत तिची प्रकृति ललित नसून प्रौढ व प्रगल्भच आहे. त्यांच्या उपमा–उत्प्रेक्षांत वैदग्ध्य असलें तरी पांडित्याकडे त्यांच्या भाषेचा विशेष कल दिसून येतो. गडकऱ्यांच्या भाषेची मोठीच छाप माडखोलकरांच्या भाषेवर सर्वत्र पडलेली आहे. प्रौढत्वाकडे त्यांच्या भाषेचा विशेष ओढा असल्या-मुळें कालिदासापेक्षां भवभूतीचें अनुकरण तिनें कळत अथवा नकळत

केलें आहे. अनिरुद्धाच्या पहिल्या स्पर्शानें अनूची जी अवस्था झाली तिचें वर्णन असें आहे—"......माझीं गात्रें जशीं रोमांचानीं फुलून गेलीं! त्या स्थितींत सुख नव्हतें आणि दुःखही नव्हतें. एक प्रकारची ग्लानि, एक प्रकारची मूर्छना मात्र होती." उत्तररामचरिताच्या पहिल्या अंकांतील 'विनिश्चेतुं शक्यो न सुखमिति वा दुःखमिति वा, प्रमोहो निद्रा वा किमु विषविसर्पः किमु मदः।' या श्लोकार्धांतील कल्पनेशीं अनूच्या अवस्थेचें वर्णन अवश्य ताडून पहावें. अनूनें प्रेमाची महती पुढीलप्रमाणें वर्णिली आहे—"हलाहल, अमृत आणि मदिरा या तिघा भावंडांचें परस्परविरुद्ध गुणधर्म मिसळून विधात्यानें प्रणय ही चीज निर्माण केली असावी. विषाची दाहकता, सुधेचें माधुर्य, आणि सुरेची मादकता या तिहींचा मिलाफ झाला आहे प्रणयांत." या उताऱ्याची गडकऱ्यांच्या 'पुण्यप्रभाव' नाटकांतील कालिंदीच्या उद्गारांशीं तुलना करावी. "मदिरेच्या बेफाम धुंदींत, अफूची गुंगी आणि भांगेची थरारणारी तल्लीनता मिसळून परमेश्वरानें प्रेमाचा प्याला निर्माण केला आहे." (अंक १ प्र. २) "गतकाळच्या स्मृति आणि भाविकाळच्या चिंता या जशा उत्कट आनंदाच्या उर्मींत विरून जाव्या......" इत्यादि कल्पना 'पुण्यप्रभावां'तील वसुंधरेच्या पुढील उद्गारांशीं ताडून पहावी. "चांदण्याच्या भरांत झाडाझुडपांखालीं दडून बसलेल्या या फिकट सावल्या-सुद्धा, सुखकाळच्या संभाषणांतल्या गतदुःखांच्या आठवणींप्रमाणें आनंदच देत आहेत." (अंक २ प्र. २)

## अनवधानाचा प्रमाद

एकदोन ठिकाणीं अनवधानामुळें माहितीच्या बाबतींत लेखकाच्या हातून कांहीं प्रमाद झाले आहेत. हे प्रमाद दुसऱ्या आवृत्तींतहि काढून टाकलेले नाहींत म्हणून त्यांचा जातां जातां उल्लेख करावासा वाटतो. दुसऱ्या आवृत्तींत पृ. २६ वर पुढील वाक्य आहे. "डेस्डिमोनानें अथेल्लोसाठीं इतके अपवाद सोसले, पण स्वतःच्या आंसवांनीं आणि रक्तानें न्हाण्याचाच प्रसंग तिच्यावर ओढवला ना?" 'ओथेलो' नाटकांत सदर प्रसंगीं पुढील 'स्टेज डायरेक्शन' आहे–He stifles her. यावरून तिच्यावर

तीक्ष्ण शस्त्राचा वार ओथेलोनें केलेला नव्हता हें उघड आहे. तिचा गळा दाबून ओथेलोनें तिचा खून केला आहे. अगदीं पहिल्याच पानावर 'सुकलें फूल न उमलें जरि तें अश्रूंनीं भिजलें' अशी एक ओळ गोविंदाग्रजांची म्हणून दिली आहे. 'सुकलें फूल न देत वास जरि अश्रूंनीं भिजलें' अशी मूळ ओळ आहे. पृ. ३ वर पुढील विधान आहे. "बोलून चालून नवपुष्पावरले भ्रमर ते! शकुंतलेला नाहीं दुष्यंतानें अपमान करून परत घालविली? दमयंतीला नाहीं नलराजानें गाढ झोपेंत दगा दिला? सीतेला नाहीं रामचंद्रानें न कळवतां रानांत सोडून दिली?—या साऱ्या पुण्यश्लोकांचेच वारसदार ते!" अनिरुद्ध, दुष्यंत व राम यांना एकाच मालिकेंत बसवून माडखोलकरांनीं श्वा, युवा व मघवा यांना एकाच सूत्रांत गोवणाऱ्या पाणिनीवरहि कडी केली आहे यांत शंका नाहीं. राम हा नवपुष्पावरला भ्रमर नव्हता व त्यानें केलेला सीतेचा त्याग व अनिरुद्धानें अनूचा केलेला त्याग या दोन त्यागांची तुलनासुद्धां करण्याचें कारण नाहीं!

# ३

## शाप

'एका सुशील युवकाची प्रेमकथा' असें स्वत: माडखोलकरांनीं जिचें वर्णन केलें आहे ती 'शाप' ही कादंबरी १९३६ च्या जुलैमध्यें प्रसिद्ध झाली. अतिरिक्त ध्येयवादामुळें ज्याचें जीवन इतर व्यावहारिक माणसांच्या दृष्टीनें वाया गेलेलें आहे अशा निशिकांताची व त्याच्यावर अतिरिक्त प्रेम करणाऱ्या सुहासची ही प्रेमकथा आहे. कठोर ध्येयवादामुळें निशिकांताचें जीवन शापित झालें आहे. 'हा उध्वस्त, हा ज्वलत्, जीवनक्रम एक शाप आहे मला' असें तो सुहासला म्हणतो. असला हा उध्वस्त जीवन-क्रम सोडून देणें त्याच्या आटोक्यांतलें राहिलेलें नाहीं आतां. मंत्रमूढ मनुष्याप्रमाणें तो त्या ध्येयवादाकडे खेचला जात आहे. सुहासच्या प्रेमाचें बंधनसुद्धां त्याला अडविण्यास असमर्थ आहे.

सुहासचें त्याच्यावर अमर्याद आणि एकनिष्ठ प्रेम आहे. परंतु आपल्या उध्वस्त आयुष्याची–त्या शापाची–झळ लागून तिच्या सुखी जीवनाचा सत्यनाश होऊं नये, आपल्या फटिंग, बेछूट आयुष्यक्रमामुळें तिच्या सुखांत माती कालविली जाऊं नये यासाठींच केवळ विलक्षण संयमानें मन मारून, उसनें अवसान आणून तो तिच्या निर्व्याज, एकनिष्ठ प्रेमाचा अव्हेर करतो. त्याचा दाहक ध्येयवाद, आणि त्या ध्येयापायीं समाजानें त्याची केलेली अवहेलना या गोष्टींचा सुहासला कोणत्याहि प्रकारें त्रास होऊं नये एवढीच त्याची तीव्र इच्छा आहे.

आपल्या ध्येयवादाचें समाजांतील प्रतिकूल शक्तींनीं कंबरडें मोडलें असें त्याला वाटतें. पराक्रमी व्यक्तींना आत्मसात् करण्याची, त्यांचा पराक्रम निष्प्रभ करण्याची व त्यांना स्वत:प्रमाणेंच निकृष्ट करून सोड-ण्याची अद्‌भुत किमया समाजाला लाभलेली असून समाज व्यक्तीवर कुर-घोडी करतो अशी त्याची तक्रार आहे. 'व्यक्तीला आत्मसात् करण्याची, तिचं वैशिष्ट्य खुरटवून तिला खची करण्याची समाजाची जी ही दारुण

शक्ति आहे ' त्या शक्तीविरुद्ध त्याला बंड करावयाचें आहे. त्याचा आशय असा कीं, व्यक्ति जशी समाजाला जबाबदार असली पाहिजे तसा समाजहि व्यक्तीच्या सर्वांगीण विकासाला वाव देणारा, उत्तेजन देणारा असला पाहिजे. आपल्या व्यक्तित्वाची समाजानें पायमल्ली केली, त्याची प्रगति सर्व बाजूनीं खुंटविली असें त्याचें म्हणणें आहे. आणि समाजानें केलेल्या या अन्यायामुळें तो आतां समाजाची पर्वा करावयास तयार नाहीं. तुरुं-गांतून सुटून आल्यानंतर, ' तुरुंगापेक्षां अधिक नियमबद्ध, अधिक अमा-नुष, अधिक भयाण अशा दुसऱ्या तुरुंगांत मी आपलं आयुष्य घालवीत आहे ' अशी तो जगाच्या वृत्तीवर टीका करीत आहे.

तुरुंगांतून बाहेर आल्यापासून त्याची गांधींच्या मार्गावरली श्रद्धा पार नाहींशी झाली आणि तो दहशतवादी संप्रदायांत शिरला. कायदेभंगाची चळवळ त्याच्या दृष्टीनें 'निव्वळ एक लाट ठरली व त्या चळवळींत त्याच्या-सारख्या ज्या विद्यार्थ्यांनीं हिरीरीनें उडी घेतली, त्यांच्या जीविताच्या नौका फुटल्या; त्याच्यासारख्या ' उतावळ्या, भावनावश तरुणाच्या आयुष्याचा जो विचका झाला, तो मात्र कायमचाच ' असें तो गांधी—आयर्विन करा-रामुळें बंद पडलेल्या कायदेभंगाच्या चळवळीचें वर्णन करीत आहे. गांधींच्या चळवळीवरील श्रद्धा उडाल्यावर तो बॉंबच्या प्रकरणांत पडतो आणि अत्याचारीपणाचा शिक्का तेव्हांपासून जो त्याच्या कपाळीं बसतो तो काय-मचाच. आणि यामुळेंच जग त्याला गुन्हेगार म्हणून वागवीत आहे. जगानें आपल्या व्यक्तित्वाची अवहेलना केली अशी जी त्याची तक्रार आहे त्या तक्रारीचें हें मूळ आहे. जगाच्या असल्या या वृत्तीमुळें त्याला आतां ' बेछूट ' आयुष्य घालवावेसें वाटूं लागलें आहे.

सुहासचा भाऊ विभाकर व निशिकांत याची दाट मैत्री असते. त्याच्या व सुहासच्या लग्नाला सुहासच्या आईची संमति सुखानें मिळण्याची फारशी आशा नसतांनासुद्धां विभाकरानें त्या दोघांच्या प्रेमसंबंधाला उत्तेजन दिलें. पण निशिकांताच्या ध्येयवादी आयुष्याला अकल्पितपणें कलाटणी मिळा-ल्यामुळें त्यांच्या विवाहाचा प्रश्न निकालांत निघाल्यासारखाच झाला. केवळ निशिकांतावरील एकनिष्ठ प्रेमामुळेंच सुहासनें श्रीकांतासारख्या धनसंपन्नाला नकार दिला हें विभाकराला चांगलें माहीत आहे. स्वतःच्या इच्छेविरुद्ध श्रीकां-

ताशीं लग्न करण्याचा प्रसंग तिच्यावर येऊं नये असें त्यालाहि वाटत आहे म्हणून निशिकांतानें केलेल्या देशसेवेच्या विविध प्रयोगाबद्दल तो पत्रांतून जरा कडकपणें लिहितो. निशिकातानें प्रयोगांत घालविलेलें पांच वर्षांचें आयुष्य विभाकरांच्या मतें निष्फळ ठरलें आहे. म्हणून सुहाससाठीं तरी त्यानें एक गोष्ट यापुढें करावी असा विभाकराचा त्याला आग्रह आहे. विभाकर त्याला लिहितो, " आतां हे सारे प्रयोग थांबवून तूं आपल्या भवितव्याला निश्चित स्वरूप देण्याच्या मार्गास लाग. " विलायतेस जाऊन डॉक्टरेट मिळवून त्यानें सुहासशीं लग्न करावें अशी विभाकराची सूचना आहे. या सूचनेला उत्तर देतांना निशिकांत उलट लिहितो, " माझा गेलीं पांच वर्षें चालत आलेला आयुष्यक्रम जर मला बदलणें शक्य नसेल, तर मी सुहासशींच काय, पण कोणत्याहि स्त्रीशीं लग्न करून तिच्या जीविताचें मातेरें करूं नये, हा तुझा सल्ला मला अगदीं मनापासून पटला. " सुहासच्या त्यागाचा भलताच फायदा घेणें ' अधमपणाचें ' होईल हें तो कबूल करतो. विभाकरानें सुचविलेल्या योजनेचा पूर्ण विचार करून आपलीं निश्चित मतें तो त्याला कळवीत आहे. अत्याचारी मार्गावर त्याचा आतां ' यत्किंचितहि विश्वास उरलेला नाहीं. ' किंबहुना बॉंबच्या प्रकरणांत तो कसा ओढला गेला याचेंच त्याला आतां नवल वाटत आहे. ' गांधींच्या चळवळीवरील माझा विश्वास जसा उडाला, तसाच याहि चळवळीवरील विश्वास आतां नष्ट झाला आहे. ' आतां त्याला एक ' नवीन प्रयोग ' करून पहावयाचा आहे. तो म्हणजे साम्यवाद. साम्यवादाच्या अवलंबनानेंच हिंदुस्थानापुढील सारे प्रश्न सुटतील अशी आतां त्याची खात्री पटली आहे. शिक्षण पुढें चालू ठेवावयास त्याची हरकत नाहीं. पण सुहासला स्वतःच्या प्रेमबंधनात अडकवून तिच्या जीविताचें व तिच्या निकट आतांच्या आकांक्षांचें मातेरें करावयाची त्याची इच्छा नाहीं. " सुहासचें मजवर प्रेम असेल, तिला समाजसेवेची आवड असेल पण माझें भवितव्य मला स्पष्ट दिसत असतां मी तिचें पाणिग्रहण करून तिला संकटांत कसा घालूं ! " सुहासविषयींच्या या निश्चयाचा उल्लेख करून तो म्हणतो, " मी...सध्यांच्या संक्रमणावस्थेचा प्रतिनिधि आहे. माझ्यासारख्या व्यक्तीचें आयुष्य प्रयोगांतच खर्ची पडावयाचें. "

परंतु, आपल्या शापित आयुष्याची झळ सुहासच्या सुखी जीवनाला लागून तें वैराण होऊं नये या इच्छेनें तिच्याशीं लग्न करावयाचें नाहीं असें त्यानें आपल्या मनाशीं ठरविलें असलें तरी तिच्याविषयींचें त्याचें आकर्षण मात्र कोणत्याहि प्रकारें कमी झालेलें नाहीं. त्या दोघांच्या अनेक दिवसांच्या निकट साहचर्यामुळें त्याच्या तिजविषयींच्या भावनांना 'प्रेम-स्वप्नाचें मदिर स्वरूप' प्राप्त झालें होतें. त्या प्रेमस्वप्नाच्या उन्मादांत त्यानें अनेक दिवस विहार केला होता. अशा स्थितींत, सर्व वासनांचा धैर्यानें निरोध करण्यात त्यानें बाह्यात्कारी जरी यश मिळविल्यासारखें दिसत असलें तरी त्याच्या अंतर्यामात मात्र सुहासविषयींच्या सार्‍या कोमल भावना पूर्वीप्रमाणेंच जागृत आहेत. आणि त्यानें मनोमन केलेल्या निश्चयाची मुळींच जाणीव नसल्यामुळें सुहास आपल्या सार्‍या प्रेमाचा त्याच्यावर एकतानतेनें वर्षाव करीत आहे. अशा प्रकारें एकमेकांवर पूर्णपणें अनुरक्त असलेलें हें प्रणयी युगल कांहीं तरी दैवदुर्विलासामुळें एकत्र येऊं शकत नाहीं. आपल्या ध्येयवादाचा सुहासला त्रास होऊं नये अशी त्याची तळमळ आहे; आणि त्याच्यासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग खुषीनें करावयास तयार असलेली सुहास त्याच्या या निश्चयाविषयीं अज्ञानांत आहे. म्हणून,

> कां होतो आपण परस्परां पारखे ?
> कोणत्या जन्मिचें येतें हें मधें आपल्या धुकें ?

असें विचारण्याची निशिकांतावर पाळी आली आहे.

त्याच्या मनांतील विचारांच्या गोंधळाची कांहींच जाणीव नसल्यामुळें हा आपल्याशीं असा कां वागतो, आपला विनाकारण अंत कां पहातो या शंकेनें तिचें चित्त व्याकुळ होतें. आपण याच्यासाठीं इतक्या गोष्टी आप्तेष्टांच्या मनाविरुद्ध जाऊन करीत असूनहि त्याचें वर्तन असें कां याचा उलगडा तिला होऊं शकत नाहीं. म्हणून कळवळून ती त्याला म्हणते, "तुम्हीं खरोखरी अंत पहातां आहांत माझा, निशिकांत !............ मला केव्हां केव्हा वाटतं, स्त्रीहृदय ही काय चीज आहे हें जन्मांत कधीं कळायचं नाहीं तुम्हां पुरुषांना !............गेल्या पांच वर्षांत ज्या कारणांमुळं तुम्ही आमच्या घरच्या मंडळींच्या मनांतून उतरलां, त्या

कारणांमुळं—नेमक्या त्याच कारणांमुळं प्रिय झाला आहांत तुम्ही मला जास्त!...........मी मानी असेन, कलाप्रिय असेन, तुमच्या तत्त्वज्ञानावर माझी तितकी श्रद्धा नसेल,—पण मी सुद्धां गेलीं दोन वर्षे महारमांगाच्या वस्तींत काम करतें आहे ना? इतकीं वर्षे आपण एकत्र घालविलीं; आणि तरीसुद्धां तुम्हांला माझं मन कळूं नये?—खरोखरी अतिशय कठोर, अतिशय क्रूर आहांत तुम्ही—" तिनें आपल्या भावनांना अशी वाट करून दिल्याबरोबर तिच्याशीं लग्न न करण्याचा केलेला निश्चय तो तिला सांगतो. हें तो तिला मन कठोर करून सांगतो खरा; पण त्याच्या दडपून टाकलेल्या साऱ्या मृदु भावना उफाळून येतात आणि तो दीन होऊन तिला अगदीं आर्त हाक मारतो; आणि तीहि गद्‌गदित होऊन म्हणते, " निशिकांत, तुम्ही कसेहि असा, कसेहि वागा.—पण मला दूर लोटूं नका आपल्यापासून—"

श्रीकांताचे वडील आणि विभाकरचे श्वशुर अप्पासाहेब एक नाणावलेले कायदेपंडित असतात. श्रीकांताशीं सुहासचें लग्न व्हावें अशी त्यांची धडपड असते. पण निशिकांतामुळें हें घडत नाहीं हें त्यांना माहित असते. म्हणून ते सुहासपुढें एक पेंच निर्माण करतात. कोठल्या तरी जहाल भाषणामुळें निशिकांतावर खटला भरण्याचा सरकारचा विचार आहे. सरकारचे कायद्याचे सल्लागार अप्पासाहेबांचे मोठे स्नेही असल्यामुळें ते त्यांच्याजवळ निशिकांताविषयीं रदबदली करावयास तयार आहेत. परंतु, पुन्हां असें भाषण न करण्याची हमी त्यांना निशिकांतापासून पाहिजे व एक मोबदलाहि यासाठीं पाहिजे. सुहासनें श्रीकांताशीं लग्न करणें हा तो मोबदला. आणि जर सुहास हें करावयास तयार झाली नाहीं तर राजद्रोहाच्या आरोपावरून निशिकांतावर खटला भरला जाईल असा ते दम देतात. निशिकांत आपला बेछूट आयुष्यक्रम बदलण्यास मुळींच तयार नाहीं असें सांगून विभाकरहि तिला वस्तुस्थितीची जाणीव करून देण्याची व्यर्थ धडपड करतो. पण, खटल्याचा निकाल काय वाटेल तो झाला तरी सुहास आपलें स्वातंत्र्य घालविण्यास मुळींच तयार नाहीं. ' स्वतःला लिलांवाला उभी करायला तयार नाहीं मी—! ' असें ती भावाला स्पष्टपणें बजावते.

अखेर निशिकांताला रहायलाच बोलावून साऱ्या गोष्टींचा सोक्षमोक्ष

करावा असें विभाकर ठरवतो. त्याप्रमाणें निशिकांत रहावयास येतो. परंतु, स्वतःचा आयुष्यक्रम बदलावयास तो तयार नाहीं. विभाकरला तो विनवून म्हणतो, " माझं असंच चालायचं आतां जन्मभर ! " सुहासहि आपला निश्चय बदलण्यास तयार नाहीं. जणुं काहीं दोघांनीं आपल्या आयुष्याचें मातेरें करून घ्यावयाचें ठरविलें आहे. रात्रीच्या शांततेंत तिच्या मनांत एक विचार येतो. बंगल्याच्या दुसऱ्या टोंकाला, तिच्या समोरच्याच खोलींत निशिकांत निजला होता. आपण स्वतःच त्याच्या खोलींत जाऊन त्याची विनवणी करावी असें तिच्या मनात येतें. यायोगानें त्याचें मन वळेल, व त्याचा निश्चय विरघळेल असें तिला वाटतें. पण रात्रींच्या एकांतांत त्याच्या खोलींत एकटीनें जाणें बरें नव्हे असें वाटून ती थबकते; पण यामुळें जिवाची तगमग मात्र वाढूं लागते. इतक्यांत आपल्याला दाराशीं कोणीतरी हांक मारीत असल्याचा भास तिला होतो. निशिकांताचा आवाज ती ओळखते. ज्याच्या खोलींत जाण्याचा मोह तिनें निग्रहानें आवरून धरला होता त्या तिच्या प्रियकराचाच तो आवाज होता. दार उघडावें कीं नाहीं ! ती गोंधळून गेली. पुन्हां तिला वाटलें कीं त्याच्या हांकेला उत्तर न देणें अधमपणाचें होईल; त्याच्या विशुद्ध चारित्र्याविषयीं, त्याच्या ' अनघ ' प्रेमाविषयीं शंका घेतल्यासारखें होईल. आणि लगेच ती दार उघडते. तो निशिकातच होता; पण त्याचे डोळे मिटलेले होते—तो झोपें-तच तेथें आला होता. त्याचें सुहासच्या खोलीकडे येणें 'हा त्याला त्यावेळीं पडत असलेल्या स्वप्नाचाच एक भाग होता.—जी गोष्ट जागृतावस्थेंत त्यानें कधींहि केली नसती ती त्याच्या तिच्यावरील निस्सीम प्रेमानें स्वप्नात करविली. ' आणि हें लक्षांत आल्याबरोबर सुहासच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. त्याला त्या अवस्थेंतून जागें करावें असें एकदा तिला वाटलें. पण, अशा विचित्र वेळीं आपल्या खोलीत येण्याचा अविचार घडल्याबद्दल त्याला मरणप्राय वेदना होतील या विचारानें ती त्याला जागा करीत नाहीं; आणि तिच्यापासून कठोरपणें दडवून ठेवलेल्या साऱ्या भावना तो झोपेंतच तिच्यापुढें व्यक्त करितो. ' अशरण ' होऊन तो झोपेंतच तिला म्हणतो, " त्या शापाची झळ तुला लागूं नये, म्हणून तुझ्या प्रेमाचा अव्हेर केला मी. पण सुहास, मी सर्वस्वीं तुझा आहे आणि तुझाच राहीन शेवटपर्यंत...

तुझ्याशीं लग्न न करण्याचा निश्चय करतांना माझ्या जिवाची फार तळमळ झाली...ज्यावेळीं मला स्त्रीप्रेमाची गरज वाटेल, माझ्या कंटकमय, रुक्ष जिण्याचा कंटाळा येईल, अनुकंपेच्या ओलाव्यासाठीं माझा जीव तळमळूं लागेल, त्यावेळीं मी धांव घेईन तुझ्याकडे.—तूं दुसऱ्याची झाली असलीस, तर गतस्मृतींच्या चिंतनांत अयुष्य घालवीन आपलं.—पण...मी...सर्वस्वीं तुझा आहे." आणि तो झोपेंतच तिचे हात आपल्या ओंठांवर दाबतो. तिच्या अंगांवर तर रोमांच उभे रहातातच, पण तो सुद्धां झोपेंतच म्हणतो, "तुझ्या हातांच्या स्पर्शानं किती सुख, किती गारवा वाटला मला." शेवटीं तो तिचे हात सोडतो व परत आपल्या खोलींत जातो. साऱ्या हालचाली झोपेंतच झाल्यामुळें त्याला त्यांची यत्किंचितहि जाणीव नव्हती.

त्याच्या स्वप्नभाषणानें त्याचें आपल्यावर किती खरें आणि किती गाढ प्रेम आहे हें तिला कळून आलें व आपल्या जीविताचें सार्थक झालें असें तिला वाटलें. "ज्या त्याच्या आपल्यावरील गाढ प्रेमाची तीव्रता, उत्कटता आणि असीमता आपल्याला कदाचित् लग्न होऊनहि कळली नसती, त्या त्याच्या दिव्य प्रेमाचा साक्षात्कार झाला आज आपल्याला" असें वाटून तसल्या त्या विलक्षण अवस्थेंतहि तिला कसलें तरी विचित्र समाधान वाटलें.

पण निशिकांताची स्थिति मात्र चमत्कारिक झाली यानंतर. सुहासविषयीं उत्पन्न झालेला जो उत्कट अभिलाष त्यानें विलक्षण निग्रहानें दडपून टाकला होता, तो अभिलाष लच्छी नांवाच्या घरच्या तरुण आणि रसरसलेल्या मोलकरणीचें अनावृत तारुण्य दृष्टीस पडतांच एकाएकी तीव्रतेनें उफाळतो. तिच्या डोळ्यांतील, गालांवरील आणि ओंठावरील लज्जेच्या 'गहिऱ्या' छटांनीं आणि तिच्या लाजऱ्या डोळ्यांतून आणि ओंटांतून ओसंडणाऱ्या उन्मादानें त्याचें भान नष्ट होतें. मोहाचा अतिरेक झाल्यामुळें तो तिला घट्ट आवळतो. तिच्या स्तनांच्या स्पर्शानें "अननुभूत अशा सुखाच्या आस्वादानें त्याची शुद्धबुद्ध हरपली आणि त्या उन्मादाच्या भरांत त्यानें तिच्या अनावृत उरोभागाचें चुंबन घेतलें." पण आपल्या हातून प्रमाद घडत आहे याची जाणीव होतांच तो तिला एकदम दूर लोटतो. आणि सुहासची आठवण होऊन तो गांगरून जातो.

आपल्या प्रमादाची जाणीव होऊन त्यानें तिला लगेच दूर लोटली खरी; पण, त्या मोहाची चव त्याच्या ओठानीं चाखली, त्या पापाच्या स्पर्शानें त्याचें शरीर डागळलें. सुहासशीं बोलतांना त्या पतनाची जाणीव सारखी मनाला बोचीत रहाणार, त्यापेक्षां मोकळेपणानें तिला सारें सांगितलेलें बरें असें ठरवून तो सुहासला सर्व प्रकार इत्थंभूत सांगून टाकतो. तिला वाईट वाटतें. पण त्याच्यावरील 'असीम' प्रेमामुळें ती त्याला दोष देत नाहीं. उलट, झाला प्रकार पुन्हा होऊं नये यासाठीं ती त्याला लग्न करण्याचीच सूचना करते. "पुन्हां तुम्हाला अशा प्रकारचा मोह होणार नाहीं कशावरून !...........असले प्रसंग पुनः पुन्हा येण्यापेक्षां आपण सुखी होऊं या दोघंहि—" असें ती त्याला कळवळून म्हणते.

पण त्याला तें अशक्य वाटतें. शेवटच्या आशेचा चक्काचूर होऊन ती आसवें ढाळूं लागते. त्या दोघाचें एकमेकावर कितीहि प्रेम असलें तरी त्यांच्या कपाळीं सहजीवनाचें सुख नाहीं. समाजाच्या दृष्टीनें आपण विजातीय असून रूढ समाजघटनेंत आपल्याला स्थान नाहीं असें त्याला वाटत आहे. समाजाला मान्य असलेल्या रूढ मार्गानें न जातां ध्येयवादी जीवनाचा त्यानें अंगीकार केला हेंच त्याचें पाप ! आणि त्या पापाचें प्रायश्चित्त त्याला अशा प्रकारें मिळालें आहे.

लच्छीला मिठी मारल्यामुळें त्याच्या खांद्याखालीं वस्तऱ्यानें झालेल्या आणि ओल्या असलेल्या जखमेला तिच्या छातीवरील रोगदूषित व्रणाचा स्पर्श होतो; आणि त्याला तिचा भयंकर रोग जडतो. या प्रकाराची हकिकत कळल्याबरोबर एके काळीं त्याच्यावर अमर्याद प्रेम करणाऱ्या विभाकराला त्याच्याविषयीं एकदम तिरस्कार वाटूं लागतो. एरवी निशिकांत आजारी पडला असता तर त्यानें त्याला तावडतोब आपल्या घरीं आणलें असतें. पण आतां मात्र भयंकर स्थितींत निशिकांताला त्याच्या खोलींत एकटाच ठेवून तो परत येतो. इतकेंच नव्हे तर, त्याच्या रोगाच्या भयंकर स्वरूपाची सुहासला स्पष्ट शब्दांत जाणीव करून देऊन तिला त्याच्याकडे जाण्याची तो बंदी करतो.

पण तिच्या त्याच्याविषयींच्या भावनांचा प्रभाव तिला असल्या परिस्थितींत स्वस्थ बसूं देणें शक्य नव्हतें. भावाच्या तीव्र विरोधाला न

जुमानतां ती अपरात्रीं निशिकांताकडे गेली व 'मी आज आलें ती तुमच्याजवळ कायमचीच रहायला आलें' असें तिनें निशिकांताला सांगितलें. आणि 'तिचा श्वास त्याच्या श्वासांत मिसळला, अश्रु त्याच्या अश्रूंत एकवटले.'

## विफल ध्येयवादाचें मायाजाल

'भंगलेल्या देवळां'तील अरू निरभिलाष प्रेमाच्या कल्पनेमागें लागून सौंदर्यचिंतनांतच सुख मिळविण्याची आकांक्षा बाळगतो. पण या विचित्र आकांक्षेपायीं तो अनूचा मात्र कमालीचा छळ करतो. तो केवळ आपल्या-पुरतेंच पहातो; अनूच्या मनाची स्थिति काय असेल याचा तो कधींहि विचार करीत नाहीं. अनूचा छळ झाला तो अरूच्या प्रेमविषयक विचित्र तत्त्व-ज्ञानानें झाला. पण, 'शाप' मधील सुहासचा छळ होतो तो निशि-कांताच्या ध्येयवादामुळें. त्याचा ध्येयवाद तिला बाधतो. तसें पाहिलें तर उपभोगाची लालसा न बाळगतां स्त्रीवर उत्कट प्रेम करण्याची अरूची कल्पना हाहि एक प्रकारचा ध्येयवादच नाहीं काय ? हें मान्य केलें तर अनू आणि सुहास या दोघींना त्यांच्या प्रियकरांच्या ध्येयवादानेंच वंचित केलें आहे असें दिसून येईल. ध्येयवादाच्या महत्त्वाविषयीं व आवश्यकतेविषयीं कसलाच वाद नाहीं. पण, ध्येयनिष्ठेला लागणाऱ्या मनाच्या कठोरपणाची व करारी निश्चयाची जोड ज्यांना लाभलेली नसते असे कच्च्या दिलाचे लोक फसव्या ध्येयवादाच्या कल्पनेनें क्षणैक भारून जातात व आपल्या परिसरांतील निकट व्यक्तींना उपद्रव देतात एवढीच तक्रार आहे. 'भंगलेल्या देवळां'तील अरू अनूला वारंवार स्पर्श कशासाठीं करतो ? त्या स्पर्शामुळें त्याला कांहीं होत नसलें तरी तिच्या शरीरावर रोमांच उभे रहातात आणि ती बेचैन होते. भावनांचा उद्रेक अनावर झाल्यावर स्वाभाविकच ती त्याला लग्नाविषयीं विचारते. पण त्याचा 'ध्येयवाद' त्याला तिच्याशीं लग्न करण्याची परवानगी देत नाहीं ! या कादंबरींतील निशिकांत ध्येयवादी असल्याबद्दल कांहींच तक्रार नाहीं. पण, त्या ध्येय-वादापायीं त्यानें सुहासचा जो विनाकारण छळ चालविला आहे त्याबद्दल

मात्र तक्रार आहे. कठोर ध्येयवादी जीवनामुळें व बेछूट वर्तनामुळें सुहासच्या सुखी जीवनाला झळ लागूं नये या कल्पनेनें तो तिच्याशीं लग्न करावयास तयार होत नाहीं. पण तिच्या सहवासांत मात्र तो राहूं इच्छितो. अत्यंत कठोरपणें तिचा सहवास तो सोडूं शकत नाहीं. त्याच्या मनाचा असला निश्चय होणें शक्य नाहीं. ध्येयनिष्ठेमुळें वृत्तीला जो कणखरपणा यावा लागतो तो त्याच्या ठिकाणीं नाहीं हें सिद्ध करावयास पुरावे शोधण्याची गरज नाहीं. सुहासचें आपल्यावर अगदीं एकनिष्ठ आणि अमर्याद प्रेम आहे हें त्याला चांगलें माहीत आहे. त्याच्यासाठीं आतांपर्यंत तिनें कितीतरी स्वार्थत्याग केला आहे व यापुढेंहि कोणताहि त्याग त्याच्यासाठीं करावयास ती एका पायावर तयार आहे. त्याला बरें वाटावें म्हणून ती महारवाड्यांतहि सामाजिक कार्यासाठीं जाते. श्रीकांतासारख्या सधन माणसाशीं लग्न करण्याचा मोह तिच्या मनांत देखील येत नाहीं; आणि निर्धन व बेछूट अशा निशिकांतावर ती नातलगांचा तीव्र विरोध पत्करून कायावाचामनेंकरून निस्सीम प्रेम करते. तिच्या या प्रेमाची सारी कल्पना निशिकांताला आहे. अशा स्थितींत, तिचा मोह आपल्या ध्येयवादाच्या व ध्येयपूर्तीच्या आड येईल अशी त्याला भीति वाटत होती तर त्यानें कठोरपणें तिचा सहवासच टाळावयास नको होता काय? आणि असा काय त्याचा ध्येयवाद वाया चालला होता कीं, सुहाससारख्या समजूतदार व एकनिष्ठ प्रेम करणाऱ्या सुसंस्कृत स्त्रीच्या निकट सांनिध्यामुळें त्या ध्येयवादाच्या मार्गांत कांटे पेरले गेले असते? बरें, आपल्या निर्धन, बेछूट जीवनाच्या संपर्कानें तिचें सुखी जीवन व्यथित होईल अशी जर त्याला भीति वाटत होती तर तिच्याशीं लग्न न करण्याच्या निश्चयानेंच तिच्या जीवनाची आपण अधिक भयंकर नासाडी करीत आहों हें त्याला दिसावयास नको होतें काय? अनेक वेळां अगदीं कळवळून ती त्याला लग्न करण्याची विनंति करते आणि तो पुन्हा तिला नकार देतो. वास्तविक तिच्याशीं त्यानें लग्न केलें असतें तर त्याच्या बेछूट जीवनाला कांहीं स्थैर्य प्राप्त झालें असतें व त्याच्या हातून ध्येयपूर्तीची थोडीतरी खटपट झाली असती. गंमत अशी कीं, आपल्या बेछूट ध्येयवादी जीवनाची तिला झळ लागूं नये या इच्छेनें तिच्या प्रेमाचा अनादर करणारा निशिकांत स्वप्नसंचा-

रांत तिच्या खोलींत गेला असतांना तिला म्हणतो, " ज्यावेळीं मला स्त्री-प्रेमाची गरज वाटेल, माझ्या कंटकमय, रूक्ष जिण्याचा कंटाळा येईल, अनुकंपेच्या ओलाव्यासाठीं माझा जीव तळमळूं लागेल, त्यावेळीं मी धांव घेईन तुझ्याकडे." (पृ. ६९) म्हणजे त्याला स्त्रीप्रेमाची खरी गरज उत्पन्न होईपर्यंत तिनें त्याच्या आगमनाची वाट पहात ताटकळत बसावयाचें असाच याचा अर्थ नाहीं का! हा विलक्षण ध्येयवाद आहे यांत शंकाच नाहीं!

बरें, त्याचा ध्येयवाद खरोखरीच जळजळीत असता व त्या ध्येयाच्या पूर्तीसाठीं प्रत्यक्ष कृति करण्याच्या बेतांत तो असता, तर स्त्रीप्रेमाच्या मोहानें त्याच्या कार्यांत विघ्नें उत्पन्न झालीं असतीं हें कबूल. पण, सुहासच्या अमर्याद आणि समजूतदार प्रेमाचा पुनः पुन्हां अव्हेर करणाऱ्या निशिकांताच्या ध्येयवादाचें प्रत्यक्ष स्वरूप कोणतें आहे तेंच समजावयास साधन नाहीं. मागें तो कायदेभंगाच्या चळवळींत सापडला होता व बॉंबच्या प्रकरणांतहि सामील होता असा पुरावा सांपडतो. पण गांधी-इर्विन करारामुळें तो तुरुंगांतून सुटून आल्यानंतर गांधीवादावरील जशी त्याची श्रद्धा उडून जाते त्याचप्रमाणें दहशतवादी मार्गावरीलहि त्याची श्रद्धा नष्ट होते अशी त्याची स्वतःचीच कबुली आहे. " गांधींच्या चळवळीवरील माझा विश्वास जसा उडाला तसा याहि ( म्हणजे दहशतवादी ) चळवळीवरील विश्वास आतां नष्ट झाला आहे " (पृ. ३२ ) असें तोच सांगत आहे. मग त्याच्या आतांच्या ध्येयवादाचें नक्की स्वरूप कोणतें ? दहशतवादामुळें प्रतिक्षणीं उद्भवणारे धोके आतां त्याच्या मार्गांत राहिलेले नाहींत. आतां त्याला 'रशियाच्या बंधमोचनाच्या कामीं यशस्वी झालेल्या साम्यवादा'चा प्रयोग करून पहावयाचा आहे. या साम्यवादाच्या प्रयोगांत सुहाससारख्या सुसंस्कृत आणि एकनिष्ठ प्रेम करणाऱ्या स्त्रीचा त्याला प्रत्यक्ष उपसर्ग कोणता पोंचला असता ? तिनें त्याच्या निर्धनत्वाचा व बेछूट जीवनाचा केव्हांच राजीखुषीनें स्वीकार केला होता. अशा स्थितींत स्वतःच्या ध्येयवादाची सबब करून तिच्या अतिरिक्त प्रेमाचा अव्हेर कर-करण्याचें त्याला कोणतें कारण होतें तेंच समजत नाहीं. दुसरें असें कीं, साम्यवादाचा प्रयोग तरी तो करून पहातो काय ? या बाबतींत तो प्रत्यक्ष

काय करतो याचा कसलाहि पुरावा आपल्याला उपलब्ध नाहीं. तात्पर्य असें कीं, कसलीच कृति त्याच्या हातून घडत नाहीं. मग, सुहासच्या सांनिध्यामुळें त्याच्या मार्गांत कोणतें विघ्न उत्पन्न झालें असतें? निष्क्रिय ध्येयवादाच्या मार्गांत स्त्रीच्या प्रेमामुळें कसला व्यत्यय येणार!

आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. सुहासच्या प्रेमाचा तो अव्हेर करतो हें खरें आहे. पण कठोर ध्येयवादी पुरुषाला मोहावरहि विजय मिळवावा लागतो. निशिकांत तर पराकाष्ठेचा मोहवश आहे. सुहासविषयींच्या वासना बाह्यात्कारी जरी त्यानें दडपून टाकलेल्या असल्या तरी त्याचें मन त्या वासनांनीं ओतप्रोत भरलेलें आहे. आणि वासनांचा निरोध (repression) केल्यामुळें उद्‌भवणारी विकृतिहि (abnormality) त्याच्या ठायीं स्पष्टपणें दिसून येत आहे. रात्रीं तो झोपेंत तिच्या खोलींत चालत जातो व तिच्याशीं झोपेंतच बोलतो. दिवसा ज्या गोष्टी तो तिच्यापासून दडवून ठेवतो त्याच गोष्टी तो झोपेंत तिला सांगतो व आपल्या दुबळ्या मनाचें प्रदर्शन करतो. 'स्वप्नसंचार' (somnambulence) व 'स्वप्नभाषण' (somniloquence) या गोष्टीं शक्य असल्या तरी त्या कांहीं सुदृढ मनाच्या खास द्योतक नाहींत. हा मनोदौर्बल्याचा किंबहुना मानसिक विकृतीचाच एक प्रकार आहे असें मानसशास्त्र सांगतें. निशिकांताच्या बाबतींत तर हा प्रकार जरा अतिरेकालाच गेलेला आहे असें दिसतें. झोपेंत चालणें व बोलणें यांच्या जोडीला स्पर्शज्ञान जागृत असणें हा विकृतीचा अतिरेक आहे असें शास्त्र सांगतें. निशिकांतानें या तीनहि गोष्टींचें प्रात्यक्षिक दाखविलें आहे. तो झोपेंत अगदीं न चुकतां सुहासच्या खोलीच्या दाराशीं जातो, तिला हांक मारतो, तिला आपल्या सार्‍या भावना सांगतो, तिचे हात आपल्या ओठावर दाबतो आणि तिचा स्पर्श झाल्याबरोबर तो झोपेंतच तिला म्हणतो, "तुझ्या हातांच्या स्पर्शानें किती सुख, किती गारवा वाटला मला! मघांपासून चाललेली माझ्या शरीराची आग, माझ्या जिवाची तगमग एका क्षणांत थांबली!" निशिकांतानें झोपेंत केलेल्या सार्‍या गोष्टी होऊं शकतील. या प्रकारच्या अनेक विचित्र गोष्टी शास्त्रज्ञांनीं नमूद करून ठेविलेल्या आहेत. (लेडी मॅकबेथचें उदाहरणहि सर्वश्रुत आहे.) पण, या गोष्टी निरोगी मनाच्या

द्योतक नसून मानसिक विकृतीच्या द्योतक आहेत. उन्माद ( hysteria ) अथवा 'एपिलेप्सी' यांच्याप्रमाणेंच या गोष्टी होत. मनोविकृतीचा ( Morbidity किंवा Nervous diathesis ) पुरावा असलेल्या स्वप्नसंचार व स्वप्नभाषण इत्यादि गोष्टी करणाऱ्या आपल्या नायकाच्या ठायीं कठोर ध्येयनिष्ठेमुळें येणारा कणखरपणा मुळींच नसला तर त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें काय आहे ?

स्वप्नसंचार व स्वप्नभाषण हा निशिकांताच्या वासनानिरोधाचा एक परिणाम सांगितला. हा निदान घातक तरी झाला नाहीं. पण या वासनानिरोधाच्याच पोटीं पुढें लच्छी मोलकरणीला तो मिठी मारतो. याचा मात्र फार घातक परिणाम होतो व त्याला उपदंशासारखा भयंकर रोग जडतो. फसव्या आणि खोट्या ध्येयवादाच्या वेडगळ कल्पनांनीं भारल्यामुळें जो अनैसर्गिक वासनानिरोध तो विनाकारणच करतो त्याचे हे भीषण दुष्परिणाम अपरिहार्यच आहेत! त्याला एकट्यालाच हे दुष्परिणाम भोगावे लागले असते तरी फार बरें झालें असतें. पण त्याच्या डागळलेल्या जीवनाच्या संपर्कानें सुहासच्या निर्मळ जीवनाचीहि नासाडी नक्की होणार याची वाट काय? हें तर झालेंच, पण तिच्या अनिवार मनोव्यथांनाहि त्याचा हा विफल ध्येयवादच कारणीभूत झाला नाहीं काय? एवंच, त्याच्या या निष्क्रिय व विकृत ध्येयवादाचा शारीरिक आणि मानसिक अशा दोन्ही दृष्टींनीं बिचाऱ्या सुहासला जहरी उपद्रव पोंचतो. ती हें सारें आपल्या इच्छेनें सहन करते हा तिचा मोठेपणा आहे !

वंचक ध्येयवादामुळें ध्येयवादी व्यक्तीच्या निकट सांनिध्यात असलेल्या निरपराध व्यक्तीच्या आयुष्याची झालेली ही होळी पाहून स्वाभाविकच इब्सनच्या 'वाइल्ड डक्' ( Wild Duck ) या प्रसिद्ध नाटकात असलेल्या ध्येयवादावर केलेल्या प्रखर टीकेची आठवण झाल्यावाचून रहात नाहीं. सदर नाटकांतील रेलिंग हा डॉक्टर म्हणतो, "...don't use that foreign word : ideals. We have the excellent native word : lies." पुढें तो म्हणतो, "Rob the average man of his life-illusion, and you rob him of his happiness at the same stroke." ध्येयवादाला life-illusion म्हणूनच तो थांबत नाहीं. नाटक

संपतांना तो याहिपेक्षां कटु शब्दांत फसव्या आणि खोट्या ध्येयवादाची पुढीलप्रमाणें निर्भर्त्सना करतो– " Oh, life would be quite tolerable, after all, if only we could be rid of the confounded duns that keep on pestering us in our poverty with the claim of the ideal." रसरसलेल्या, जातिवंत आणि कठोर ध्येयवादाची आपल्याला थट्टा करावयाची नसून फसव्या, निष्क्रिय व विकृत ध्येयवादाच्या मायाजालांत गुरफटलेल्या व्यक्तींच्या सहवासामुळें सुहाससारख्या निर्मळ व्यक्तींच्या जीवनाची जी विनाकारणच नासाडी होते तिच्यावरच आक्षेप घ्यावयाचा आहे हें कोणीहि विसरतां कामा नये!

## उन्मादक सौंदर्याचा अनावर कैफ

सुहासविषयीं आपल्या नायकाला जबरदस्त शारीरिक आकर्षण वाटत आहे. स्त्रीच्या सौंदर्यामुळें मोहासक्त होणें हें त्याच्या स्वभावातच आहे. त्याच्या खोलींत देहाती तरुणीचें एक चित्र टांगलेलें होतें. 'तिचें तें कमरेपर्यंत उघडें असलेलें नाधेमूद शरीर, उरोजाची उन्नतता दर्शविणारें लाल स्तनबंधन आणि लज्जेनें आकुंचित झालेले मादक डोळे!' असलें हें उन्मादक चित्र पाहिल्यावर सुहास त्याला उपरोधिकपणें विचारते, " हें चित्र कसली स्फूर्ति देतें तुम्हांला?" यावर तो उत्तर करतो, " तें चित्र उत्कृष्ट कलाकृति म्हणून लावलं आहे तिथं मी,— उत्तानतेचं प्रदर्शन म्हणून नव्हे." उत्कृष्ट कलाकृति म्हणून अत्यंत उन्मादक चित्र निवडण्यातच त्याच्या मनाचा कल दिसून येत नाहीं काय? असल्या मोहविवश मनुष्याला स्त्रीच्या बाबतींत कठोर संयम कसा दाखवितां येणार? आणि बळेंच जर त्यानें आपल्या वासना मारून टाकल्या तर मानसिक विकृति निर्माण होणें अगदीं अपरिहार्य आहे. किंवा दडपलेल्या वासना केव्हां तरी उसळी मारून वर येणारच. याला कांहीं इलाज नाहीं. हा मनुष्य मोहाच्या आहारीं अगदीं सहज जाऊं शकेल यांत कसलीच शंका नाहीं. त्याला लच्छी भेटली नसती तर दुसरी एकादी वच्छी भेटली असती. पण मोहवश होण्याइतपत दुबळेपणा त्याच्या ठायीं भरपूर आहे. नंतर त्याला पश्चात्ताप होईल ही गोष्ट निराळी! पण, मोहाच्या क्षणीं मन आवरून

धरण्यासाठीं वृत्तीचा जो कठोरपणा ध्येयनिष्ठ पुरुषांच्या ठिकाणीं असावा लागतो असें आपण ऐकतों त्याचा लेशहि निशिकांताच्या ठिकाणीं नाहीं. आणि यामुळेंच लच्छीच्या अर्धविवृत शरीराचा त्याला एवढा भयंकर मोह पडला व त्या मोहाला तत्क्षणीं बळी पडून त्याच्या बेछूट ध्येयवादानें तिच्या उन्मादक तारुण्याला आलिंगन दिलें! त्याच्या मनाची त्या क्षणीं झालेली धुंद अवस्था माडखोलकरांच्या ठिकाणींहि संक्रांत झाल्यासारखी दिसत आहे. 'त्या प्रसंगाचें' माडखोलकरांनीं केलेलें हें बेभान, धुंद आणि मदिर वर्णन पहाण्यासारखें आहे. "तिच्या डोळयांतील मादकतेची धुंदी त्याच्या डोळयांवर चढली ...... जणुं कांहीं तिच्या त्या यौवनमत्त शरीरांतून उठणाऱ्या आसक्तीच्या अनिवार उर्मींत त्याचें व्यक्तित्व विलीन झालें! तिच्या पुष्ट वक्षःस्थलाची धडधड त्याच्या सोत्कंठ हृदयाला सारखी जाणवत होती ...... क्षणार्धांत तिच्या भोंवतालचा त्याचा करपाश घट्ट झाला; व तिच्या उरोजाचीं टचटचीत अग्रें गुलाबाच्या दाटर कळयांप्रमाणें त्याच्या अंगाला बोंचून आत दबलीं.— रसरशीत ताजें नारिंग जसें स्पर्शाला मऊ पण अंतर्यामीं टणक असतें, तसे तिचे ते उभार उरोज वाटले त्याला!—आणि त्याच्या बोंचक स्पर्शानें त्याच्या अंगावर रोमांच थरारून उठले" ( पृ. ८० ). हें रसभरित उत्तान वर्णन प्रथमच माडखोलकरांच्या लेखणींतून या ठिकाणीं उतरलें आहे. पुढें 'काता,' 'दुहेरी जीवन,' 'नागकन्या' आणि 'डाकबंगला' या कादंबऱ्यांतून अनावृत अथवा अर्धविवृत स्त्रीदेहाचीं जीं उन्मादक आणि गहिरीं वर्णनें येणार आहेत त्यांची ही पूर्वतयारी आहे असें समजावयास हरकत नाहीं. 'काता' कादंबरींतील विजयेच्या अनावृत शरीराचें वर्णन, 'दुहेरी जीवन' मधील नायकानें ॲगाथा विल्बरफोर्स या बाईसमवेत केलेल्या जलक्रीडेचें वर्णन, 'नागकन्या' कादंबरींतील चांदण्यांतील नग्न अवस्थेंतील जलक्रीडेचें वर्णन आणि 'डाकबंगला' या कादंबरींतील अर्धविवस्त्र अवस्थेंत पोहणाऱ्या कांचनगौरीचें वर्णन इत्यादि पराकाष्ठेचीं उत्तान, कामुक आणि वाचकाच्या हीन वासना चाळविणारीं जीं भडक वर्णनें माडखोलकरांनीं पुढें केलेलीं आहेत त्यांचा पहिला घडा 'शाप' या कादंबरींत त्यांनीं गिरविला आहे. अजून तो घडा घटलेला नाहीं. तो पूर्ण घटल्यावर ते

या बाबतींत कोणतें कौशल्य व्यक्त करूं शकतील याची थोडीशी चुणूक ‘ शाप ’ मधील वरील भरदार वर्णनात पहावयास सांपडेल !

## व्यक्तिनिष्ठ समाजवाद

नायक निशिकांत गांधीवाद व बाँबवाद यांचा त्याग करून साम्यवादाचा प्रयोग करून पहाणार आहे. पण त्याचा हा साम्यवाद समाजनिष्ठ नसून पूर्ण व्यक्तिनिष्ठ असला पाहिजे असें त्याच्या कलाविषयक मतांवरून स्पष्ट दिसून येत आहे. ‘ स्वतःच्या समाधानासाठीं ’ आपण चित्रें काढतो असें म्हणून कलेचें उद्दिष्ट तो पुढीलप्रमाणें सांगतो, “ खरा कलाविकास हा आत्मप्रतीतीसाठीं असतो. ............कलाविलासाचा सारा आनंद आत्मविकासात आहे.......मला केव्हां केव्हां असं वाटतं कीं, साम्यवाद्यांनीं कितीहि गप्पा मारल्या, तरी कलेला कांहीं त्यांना आपल्या तंत्रानं राबवून घेतां येणार नाहीं......कला ही **व्यक्तिनिष्ठच रहाणार सदैव**........ तीं बेछूट न् **आत्मनिष्ठच रहाणार** नेहमीं. ” ( पृ.९६-९७. जाड टाइप माझा ) ही विलक्षण व्यक्तिनिष्ठा ( Individualism ) आणि साम्यवादांत अभिप्रेत असलेली समाजनिष्ठतेची मूलभूत कल्पना यांमधील भयंकर विरोध लक्षांत घेतला असतां आपल्या नायकाचा समाजवाद खोटा आहे, आणि त्याला समाजवादाचीं मूलभूत तत्त्वेंहि मान्य नाहींत असा निष्कर्ष काढल्यास त्यांत कांहींच चूक होणार नाहीं. व्यक्ति विरुद्ध समाज या झगड्यात समाज व्यक्तीवर कुरघोडी करून तिचें व्यक्तित्व मारून टाकतो ही त्याची तक्रारहि आत्यंतिक व्यक्तिनिष्ठेचीच द्योतक नाहीं काय ? ‘ व्यक्तीला आत्मसात् करण्याची, तिचं वैशिष्ट्य खुरटवून तिला खच्ची करून टाकण्याची समाजाची ही दारुण शक्ति आहे.’ तिच्याविरुद्ध त्याला बंड करावयाचें आहे. व्यक्तिनिष्ठेचें हें तत्त्वज्ञान नायकाला मान्य असल्याबद्दल आपल्याला तक्रार करण्याचें कारण नाहीं. पण, एकाच वेळीं आत्यंतिक व्यक्तिनिष्ठा व समाजवाद हीं दोन्हीं तत्त्वें त्याला कशीं मान्य करतां येतील हें एक विलक्षण कोडें आहे हें कबूल केलेंच पाहिजे. आत्यंतिक व्यक्तिनिष्ठा तत्त्व म्हणून मान्य करणारा मनुष्य समाजवादी असूं शकणार नाहीं; आणि समाजवादी मनुष्य

पराकाष्ठेचा व्यक्तिनिष्ठ असूं शकणार नाहीं. आणि जर असा विचित्र समन्वय एकाच माणसाच्या ठायीं ( आपल्या नायकाप्रमाणें ) आढळला तर त्याची व्यक्तिनिष्ठा हीच खरी असून त्याचा समाजवाद नकली किंवा बेगडी समजावयास मुळींच हरकत नाहीं खरोखर! कल्चर्ड मोत्यांप्रमाणें हा 'कल्चर्ड समाजवाद' समजावा. आणि यामुळेंच आपल्या नायकाच्या समाजवादाचें मीं 'व्यक्तिनिष्ठ समाजवाद' असें वर्णन केलें आहे. वास्तविक बर्नार्ड शॉच्या भाषेंत बोलावयाचें झालें तर, निशिकांत हा 'Unsocial socialist' आहे असेंच म्हणावें लागेल. असल्या विरोधी गोष्टींचा समन्वय करण्याच्या या लालसेनें ध्येय आणि सुहास या दोहोंचीहि प्रतारणा करण्याचा विपरीत प्रसंग त्याच्यावर आला नाहीं काय ?

## सुहासचें आकर्षक व्यक्तित्व

सुहासचें व्यक्तित्व मात्र अत्यंत आकर्षक आणि प्रभावी आहे. सर्व गोष्टी प्रतिकूल असतांहि, मोहाचें आकर्षण उत्पन्न होण्यासारखी परिस्थिति असतांहि ती अत्यंत करारीपणानें आणि निष्ठेनें बेछूट जीवन घालविणाऱ्या निशिकांतावर खरेंखुरें प्रेम करीत आहे. 'प्रेमाच्या सफलतेच्या त्या एका क्षणासाठीं' तिनें अक्षरशः सर्व परींनीं लोभनीय अशा आपल्या आयुष्याची जाणूनबुजून नासाडी करून घेतली हें तर आपण पहातच आहोंत. मनाच्या अत्यंत विकल स्थितींत लच्छीच्या सौंदर्यानें त्याच्यावर घातलेल्या मोहनीचा परिणाम कळल्यानंतरहि ती त्याचा द्वेष करीत नाहीं. उलट, पुन्हा असा मोह पडूं नये यासाठीं ती त्याच्याशीं लग्न करावयासहि तयार आहे. तोच तें मान्य करीत नाहीं. अखेर त्याला भयंकर सांसर्गिक रोग जडला असून या कारणासाठींच आपला भाऊ त्याच्याकडे जाण्याची आपल्याला बंदी करीत आहे हें कळताच तिचें सारें सुप्त सामर्थ्य उफाळून येतें. अशा स्थितींत त्याला एकट्याला सोडून आल्याबद्दल ती भावाला कटु शब्दांनीं बोलते. त्या रोगाची हकीकत कळल्यापासून विभाकराचा निशिकांताविषयींचा आदर पार मावळला आहे. पण, सुहासच्या प्रेमाची खरी कसोटी लागण्याची हीच वेळ आहे. आणि त्या कसोटींत ती उतरते सुद्धां. 'जगांत काय मोह कधीं कुणाला आजवर पडलेला नाहीं !—

जगांतली शेंकडा नव्वद माणसें हीं केवळ त्यांचें शील बिघडण्यासारखी परिस्थिति त्यांच्या भोंवतीं नसते म्हणूनच सुशील राहिलेलीं असतात ' असें स्पष्ट शब्दांत ती बोलते. निशिकांताला क्षणैक मोह पडला असला असला तरी त्याचें आपल्यावरील प्रेम हिणकस नाहीं अशी तिची खात्री आहे. त्याच्या उत्कट प्रेमावर तिचा विश्वास आहे. ' प्रेम आणि मोह या अगदीं दोन भिन्न गोष्टी आहेत. प्रेमाचा संबंध हृदयाशीं असतो, तर मोहाचा शरीराशीं असतो ' असें म्हणून ती निशिकांताची बाजू घेऊन भावाशीं भांडते; आणि तळमळणाऱ्या निशिकांताला आपल्या सांनिध्याची यावेळीं फार गरज आहे हें ध्यानांत आल्याबरोबर भावाच्या रोषाची किंवा इतर कशाचीहि पर्वा न करितां ती तत्क्षणीं अपरात्रींच निशिकांताकडे जाते. तिच्या अढळ प्रेमानें अशा भीषण स्थितींतहि तिला त्याच्याकडे नेलें. ' तूं सोडून नाहीं ना जाणार मला ? ' असें निशिकांतानें कळवळून विचार-ल्यावर ती म्हणते, " नाहीं.—मी आज आलें, ती तुमच्याजवळ कायम-चीच रहायला आलें. "

४

# कांता

'मुक्तात्मा' या कादंबरींतील दहशतवादी क्रांतिकारकांच्या प्राथमिक अवस्थेंतील राजकारणाचा आपण मागें परिचय करून घेतलाच आहे. त्या कादंबरींतील समाजवादी नायक चंद्रशेखर समाजवादाचें प्रत्यक्ष कार्य कोणतें करितो हेंहि आपण पाहिलें आहे. मजुरांच्या वस्तींत स्टडीसर्कल आठवड्यांतून तीन वेळां चालविणें व वीरेंद्र या फरारी क्रांतिकारकाला गुप्तपणें हिंदुस्थानांत आणविण्याचा मनसुबा करणें आणि अखेर एतद्विषयक एक महत्त्वाचें पत्र गहाळपणानें टेबलावर उघडें टाकल्यामुळें तुरुंगांत जाणें हें त्या कादंबरींतील दहशतवादी राजकारणाचें प्रत्यक्ष स्वरूप आहे. या 'सक्रिय' राजकारणाच्या जोडीला हिंदी राजकारणांतील तत्कालीन अनेक महत्त्वाच्या प्रश्नांवर चंद्रशेखराचीं सोपपत्तिक व्याख्यानें असल्यामुळें शास्त्र (theory) व विनियोग (practice) या दोन्ही दृष्टींनीं तत्कालीन समाजवादी राजकारणाचा परिचय आपणांस करून घेतां आला. 'मुक्तात्मा' कादंबरी प्रसिद्ध झाल्यानंतर बरोबर सहा वर्षांनीं प्रस्तुत '**कांता**' ही कादंबरी १९३९ मध्यें प्रसिद्ध झाली. 'भंगलेलें देऊळ' या कादंबरींत माडखोलकरांनीं राजकारणाला दुरूनसुद्धां स्पर्श केला नव्हता. 'शाप' मध्यें नायकाच्या समाजवादी मताचे ओझरते उल्लेख आले आहेत. यापेक्षां विशेष कांहीं राजकारण त्याहि कादंबरींत नाहीं. पण 'कांता' प्रसिद्ध झाली तेव्हां 'शंभर टक्के राजकीय कादंबरी' असें तिचें कोणी वर्णन केलें; तर, ही कादंबरी केवळ बुद्धिजीवी वाचकांसाठीं असून यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या माडखोलकरांच्या तीन कादंबऱ्यांपेक्षां ही कादंबरी अधिक सरस आहे असें मत कोणीतरी सांगितलें. तेव्हां, संपूर्णपणें राजकीय असलेल्या या कादंबरींतील राजकारणाची तपासणी जरा कसोशीनेंच करावयास पाहिजे. येथें आपल्याला 'सनदशीर' राजकारण करणाऱ्या राजकारणी पुरुषांची तात्त्विक व्याख्यानें ज्याप्रमाणें ऐकावयास सांपडतील त्याचप्रमाणें दहशतवादी क्रांतिकारकांच्या गुप्त बैठकींतील हृदय-

भेदक चर्चाहि ऐकावयास सांपडतील; इतकेंच नव्हे तर, दहशतवादी राजकारणांतील प्रत्यक्ष कृतीचा भागहि आपणांस पहावयास सांपडेल. तत्कालीन दहशतवादी राजकारणाचा व कौन्सिलांतील सनदशीर राजकारणाचा ऐतिहासिक दृष्टया अभ्यास करूं इच्छिणाऱ्या चिकित्सक वाचकास ही कादंबरी महत्त्वाची वाटावयास पाहिजे.

## कांतेचा कोंडमारा

माडखोलकरांनीं नायिकेचें नांव कादंबरीला दिलें असल्यामुळें तिला प्राधान्य मिळावें असा त्यांचा हेतु असावा. परंतु, कादंबरीला नांव देण्यासारखें महत्त्व प्रत्यक्ष कादंबरींत कांतेला मुळींच मिळालेलें नाहीं. कादंबरीचा शेवट कांतेच्या शोकपूर्ण अंतांत होतो यामुळें कदाचित् तिचें नांव कादंबरीला देण्याचा मोह माडखोलकरांना झाला असावा. परिणामाच्या दृष्टीनें पाहिलें तरीहि शोकमय अंत झाल्यामुळें कांतेची करुण मूर्ति डोळ्यांसमोरून दूर होत नाहीं हें खरें असलें तरी कांतेपेक्षां सर महादेव ठाकूरच वाचकाच्या मनावर अधिक परिणाम करतात हें अमान्य करता येणें शक्य नाहीं. असें असतां कांतेलाच प्राधान्य देण्याचा श्री. माडखोलकराचा उद्देश उघड आहे. कादंबरी ‘शंभर टक्के राजकीय’ असल्यामुळें आणि तिच्यामध्यें बुद्धिजीवी वाचकालाही गुदमरून टाकणाऱ्या प्रचारकी थाटाच्या व्याख्यानांनीं भाऊगर्दी केल्यामुळें कादंबरी हातांत धरण्यासाठी प्रथम कांहींतरी जबरदस्त आकर्षण निर्माण करणें माडखोलकरांना भागच पडलें असलें पाहिजे. आणि ‘कांता’ या नावामुळें तें आकर्षण निःसंशय उत्पन्न झालें आहे !

हें अधिक विशद करण्यासाठीं, कांतेला प्राधान्य मिळावें हा लेखकाचा उद्देश उघड असल्यामुळें तिचीच चर्चा प्रथम करूं. कांतेचा शेवट शोकपूर्ण करण्यांत लेखकाचा एक हेतु असा दिसतो कीं, तिच्या ‘रम्य पण उदास’ जीवनाची अशी दुखःमय परिणति दाखविल्यानें एरवीं ज्या व्यक्तीला प्राधान्य मिळण्याची शक्यता नव्हती तिला तें प्राधान्य मिळावें आणि यामुळें कादंबरीला तिचें नाव देण्यात विशेष प्रमाद घडूं नये. शेवटच्या प्रकरणामुळें वाचकाच्या मनावर होणाऱ्या विलक्षण परिणामानें

ही गोष्ट पुष्कळच साध्य झाली आहे हें मान्य करणें प्राप्त आहे. पण कांतेच्या त्या शोकपूर्ण अन्तामुळें झालेल्या परिणामानें भारावलेल्या मनांतील पहिली खळबळ शांत झाल्यावर असें म्हणण्याचा मोह होतो कीं, कांतेला प्राधान्य मिळालें तें तिच्या स्वतःच्या वैशिष्ट्यामुळें नव्हे, तर लेखकाला तें द्यावेसें वाटलें म्हणून !

सर महादेव ठाकूर या माजी गव्हर्नरसाहेबांच्या पुतण्याची ( प्रियदर्शनाची ) कांता ही पत्नी. ती बी. ए. होती आणि स्त्रियांच्या साऱ्या चळवळींत भाग घेत होती असें माडखोलकरांनीं पृ. २७ वर सांगून टाकलें आहे. ती सुंदर होती हें न सागतांही कळण्यासारखें आहे. ( कादंबरींतल्या नायिका सुंदर नसतील तर वाचकाला त्यांच्याविषयीं आसक्ति कशी वाटावी ? ) सौंदर्याच्या जोडीला कलासक्तिहि तिच्या ठायीं होती. ती दिलरुबा उत्कृष्ट वाजवीत असे व त्याच्या साथीवर श्रोत्याला मुग्ध करण्याइतपत गातहि असे. पण ती नुसतीच सुंदर नव्हती तर त्या सौंदर्यांत 'कांहींतरी विशेष, कांहींतरी अनिर्वचनीय' होतें. "त्या सौंदर्यांत मनाला मोहित करण्यापेक्षां स्वतःविषयीं आदर उत्पन्न करण्याची शक्ति जास्त नव्हती का ?......तिच्या सौंदर्यापेक्षां बुद्धिमत्तेचेंच आकर्षण अधिक घडत असे" ( पृ. २७ ). वृत्तीनें ती गंभीर होती. पण त्या गांभीर्यांत कारुण्याची छटा प्रथमपासून मिश्रित झालेली दाखविल्यामुळें तिचें जीवन रम्य असूनहि उदास झालें आहे.

अशी ही नायिका स्वतःच्या पतीच्या ध्येयांत वारंवार विघ्नें आणीत आहे. त्यामुळें प्रियदर्शनाला 'स्त्री ही पुरुषाच्या जीवनांतील त्याच्या साहसी वृत्तीला पायबंद घालणारी प्रतिबंधक शक्ति' आहे असें वाटूं लागतें व त्या उभयतांतील आवरणाचा पडदा कांहीं केल्या नष्ट होऊ शकत नाहीं.

'स्त्रीचं जीवन भावनामय असतं' असे उद्‌गार कांता प्रियदर्शनाजवळ काढते; पण तिचें आयुष्य मात्र निराळी साक्ष देत आहे. प्रियदर्शनानें सत्याग्रहाच्या चळवळींत भाग घेऊं नये अशी तिची अंतर्यामींची इच्छा असते; आणि केवळ निरुपाय म्हणून ती पतीच्या इच्छेपुढें मान तुकविते. तिची दृष्टि 'संसारापलिकडे, कुटुंबाच्या स्वास्थ्याच्या आणि घराण्याच्या प्रतिष्ठेच्या पलिकडे जाऊं नये' याविषयीं प्रियदर्शनाला आत्यंतिक

खेद होतो आणि त्याला स्त्रीचें प्रेम म्हणजे ' निसर्गाचे पुरुषाला कुठल्या तरी एका रूढ परिस्थितीला जखडून ठेवण्याचे मृदुसूक्ष्म पाश आहेत असें वाटूं लागतें. कांतेचें हें जीवन भावनावशतेचें द्योतक आहे काय? उलट, कठोर व्यावहारिक बुद्धीनें आपल्या पतीला त्याच्या ध्येयापासून परावृत्त करण्याचा विलक्षण प्रयत्न ती करते हें सहज दिसून येईल! भावनावश स्त्रीचें प्रतीक पाहावयाचें असेल तर श्यामासुंदरीकडे बोट दाखवावें लागेल. तिचें जीवन खरेंखुरें भावनामय आहे. व्यवहारांत आपल्या कृत्याचे काय परिणाम होतील याची मुळींच तमा न धरितां मनांत आल्याबरोबर अत्याचाराचें कृत्य करणारी श्यामासुंदरी भावनामय आहे हें पटतें. पण कांता खास भावनामय नाहीं. नुसतें कारुण्य आणि औदासीन्य म्हणजे भावनामयत्व खास नव्हे. अत्यंत दुबळी आणि उदासीन माणसेंही कित्येक वेळां भावनामयत्वाचा त्याग करून पूर्ण व्यवहारी बुद्धीनें वागतांना दिसून येतातच ना?

काता खरोखरच भावनामय असती तर प्रियदर्शनाच्या सत्याग्रहाच्या कल्पनेला किंवा उमाकांताच्या अत्याचारी कल्पनांना तिनें पायबंद घातलाच नसता. तिनें तसा पायबंद वेळोवेळीं घातला; इतकेंच नव्हे तर त्यांच्या कृत्यांच्या भीषण परिणामाची कल्पना मनांत येऊन तिचा थरकांपहि होत असे. आणि असें असलें तरी पतीच्या विचारांना ती संमति देते ती केवळ स्वतःच्या मनाविरुद्ध! प्रियदर्शनाच्या विचाराशीं तिला समरस होतां आलें नाहीं तरी ती आपलें ' मन मारून ' सर्व गोष्टी पाहते यांत भावनामयतेपेक्षां तिचें दौर्बल्यच अधिक डोळेफाड दिसूं लागतें. ' आपल्या सुशिक्षित मुलींचं इथंच चुकतं सारं! स्वतःचं मन मारून टाकायला त्या तयार नसतात, म्हणूनच सुखाचे संसार होत नाहींत त्यांचे!... निसर्गाचीच मुळीं अशी योजना दिसते कीं, संसाराचा भार वाहतांना जी कुरकूर करील, स्वतःच्या अस्तित्वाचा न् व्यक्तित्वाचा बळी जी आनंदानं देणार नाहीं. ती स्त्री नव्हे;—माता आणि कांता होण्याचा तिला हक्क नाहीं!' (पृ. ६९). कांतेचें हें तत्त्वज्ञान ती भावनामय नसून व्यवहारी वृत्तीनें वागणारी होती हेंच सिद्ध करीत नाहीं काय? कांता म्हणजे पराकाष्ठेच्या मनोदौर्बल्याचा एक आदर्श समजावयास

प्रत्यवाय नाहीं ! 'बी. ए. झालेली आणि स्त्रियांच्या सर्व चळवळींत भाग घेणारी' ही विदुषी कोणते उद्गार काढते पहा—"पुरुष ज्यावेळीं एकाद्या हट्टाला पेटतात, तेव्हां स्त्रीचे समजुतीचे किंवा विनवणीचे शब्द निरुपयोगी ठरत असतात त्यांना आळा घालायला!...साहसी पुरुषांच्या आयुष्यांत स्त्री ही केवळ शोभेची वस्तु आणि उपभोगाचा विषय असतो एक." (पृ. ३०) स्त्रियांच्या वास्तविक योग्यतेविषयीं विपरीत कल्पना उराशीं बाळगणारा एखादा पुरुष ज्या पद्धतीनें स्त्रियांची किंमत कमी करण्याचा प्रयत्न करील त्याच पद्धतीनें कांता स्वतःच्या तोंडानें आपली दुर्बलता व्यक्त करीत आहे. दौर्बल्याचा आदर्श तो हाच ! पुरुषांचीं मनें आवरणें हें स्त्रियांच्या आटोक्याबाहेरचें काम आहे हें अनेक प्रसंगीं मान्य करून परिस्थितीला पाठ देण्याखेरीज गत्यंतर न उरल्यामुळें येणारीं दुःखें धीरानें सोसावयास ती तयार होते. परिस्थितीपुढें असहाय होऊन मान वाकविण्यास ती तयार झाली यांत तिची सहनशीलता व्यक्त होत असली तरी निरुपायाच्या व निराशेच्या पोटीं उत्पन्न झालेली ही सक्तीची सहनशीलता आहे हें विसरून चालावयाचें नाहीं ! "भाऊजींना ताळ्यावर आणायला बाई जशा असमर्थ ठरल्या, तसंच माझंही झालं आहे या बाबतींत. पुरुष एकदां हट्टाला पेटले, म्हणजे संसाराची राखरांगोळी झाल्याशिवाय त्यांचे डोळे उघडत नाहींत." (पृ. ६५)—हे कांतेचे उद्गार ती परिस्थितीला मुकाट्यानें शरण गेली होती हें उद्घोष करून सांगत नाहींत काय ? आपल्या पतीच्या महत्त्वाकांक्षांशीं ती कधींच समरस होऊं शकली नाहीं. इतकेंच नाहीं तर त्या महत्त्वाकांक्षांचें सारखें भय वाटत असतें तिला ! 'कठिण कठिण कठिण किती पुरुषहृदय बाई' हे जुनेंच पद ती गद्यांत एकसारखी घोकत राहते. "पुरुषांचीं मनं आवरणं किती कठिण असतं हें लग्न झाल्यावर कळेल तुला—" (पृ. ६७) असा पुरुषांच्या मनाविषयींचा बागुलबुवा ती उर्मिलेच्यापुढे उभा करिते. एकदा सांगितलें तर उर्मिलेला कदाचित् पुरुषांच्या मनाची खरी कल्पना येणार नाहीं अशी शंका येऊन ती पुन्हा एकवार म्हणते— "पुरुषांचं मन आणि महत्त्वाकांक्षा या किती विलक्षण चिजा आहेत तें लग्न झाल्याशिवाय कळणार नाहीं तुला !—तीरावरल्या झाडांचीं पानं प्रवाहांत पडल्यानं त्याचा वेग कधीं कमी झाला आहे का ?"

( पृ. ६९ ) कादंबरी संपेपर्यंत उर्मिलेचें लग्न झालेलें दिसत नाहीं; पण पुरुषांच्या मनाच्या काठिण्याविषयीं कांतेनें तिच्यापुढें उभ्या केलेल्या या बागुलबुवामुळें तिचें मन खास हादरलें असलें पाहिजे व कदाचित् तिनें आजन्म कुंवार राहण्याची प्रतिज्ञा केली असली पाहिजे !

कांतेच्या सौंदर्यांत पार्थिवतेचा अंश फार कमी होता हें कादंबरीकारानें अनेक वेळां स्पष्टपणें सांगितलें आहे. तिच्या सौंदयापेक्षां तिच्या बुद्धिमत्तेचाच प्रभाव अधिक पडत असे. तिचें जीवन भावनामय नसून मुख्यतः बौद्धिक होतें हें यावरून चागलें प्रतीत होतें. "तिच्या स्वभावांतला तो मानीपणा आणि बौद्धिकता पाहिल्यानंतर प्रियदर्शन दिपून जात असे. "प्रणयाच्या ऊर्मींत विलीन झाल्यावरसुद्धा तिला आपल्या व्यक्तित्वाचा विसर पडल्याचा त्याला कधीं अनुभव आला नव्हता" ( पृ. १११ ); आणि यामुळेंच प्रियदर्शनाच्या महत्त्वाकांक्षांचें सौरस्य कळून ती त्यांच्याशीं कधींही समरस होऊ शकली नाहीं. पतीच्या महत्त्वाकाक्षांशीं समरस होण्याच्या बाबतींत तिचें बौद्धिक जीवन आणि व्यक्तित्व सतत प्रत्यवाय उत्पन्न करीत आहेत. याचा थोडक्यात अर्थ असा कीं, कांतेचें जीवन भावनामय नसून स्वतःच्या व्यक्तित्वाचा परिपोष करण्याची लालसा धरणारें आणि मुख्यतः बौद्धिक होतें. परंतु आपल्या व्यक्तित्वाचा विकास व्हावा अशी अनिवार लालसा असूनहि तें व्यक्तित्व तिला कधींहि प्रकट मात्र करता आलें नाहीं. तिचें बौद्धिक जीवन पतीच्या कणरी निश्चयापुढें धुक्याप्रमाणें वितळत गेलें आणि मानसिक दौर्बल्याच्या जोडीला शारीरिक दौर्बल्याची भर पडल्यामुळें तिचा अंत असा उदास आणि करुण झाला !

कांतेचें हें उदासरम्य जीवन वाचकाच्या मनाचा ठाव घेत असलें तरी तिच्या पराकाष्ठेच्या दौर्बल्यामुळें तें खिन्नहि होतें; आणि तिच्या व्यक्तित्वाचा व बौद्धिकतेचा चाललेला निष्ठुर कोंडमारा पाहून माडखोलकरांना आधुनिक सुशिक्षित स्त्रीचा नमुना ( type ) वाचकाच्या पुढें मांडावयाचा होता कीं काय अशी दृढ शंका येऊं लागते. सुशिक्षित आणि 'स्त्रियांच्या चळवळींत भाग घेणारी' कांता स्वतःच्या दौर्बल्याचें असलें प्रदर्शन करीत असतांना पाहून शिक्षणामुळें बौद्धिकतेचा व व्यक्तित्वाचा विकास स्त्रिया करूं शकतील हें खरें वाटत नाहीं.

दहशतवादाच्या पार्श्वभूमीवर कांतेचें हें करुण चित्र केवढा विलक्षण विरोध निर्माण करतें ! राजकारणातील विविध विषयावरील पांडित्यपूर्ण प्रवचनांनीं व दहशतवादी क्रांतिकारकांच्या मठींत चाललेल्या पिस्तुलांच्या हृदयभेदक चर्चांनीं गुदमरून गेलेल्या निःशस्त्र वाचकाला कांतेच्या सहवासांत निःसंशय विरंगुळा मिळतो !

## सर महादेव ठाकुरांचें तेजस्वी व्यक्तित्व

कांतेच्या दुबळ्या व उदास जीवनावर पडदा टाकून सागरव्हिलामध्यें शिरल्याबरोबर अत्यंत विरोधी चित्रें दिसूं लागतात. सर महादेव ठाकूर हे माजी गव्हर्नर व गृहमंत्री आणि त्यांच्या खान्याच्या टेबलाभोंवतीं बसून खाद्य पदार्थांवर ताव मारणारीं आणि भरल्या पोटावर गांधी-आयर्विन पत्रव्यव-हारापासून तों जगांतील सर्व प्रकारच्या राजकारणावर अधिकारवाणीनें आणि वक्तृत्वपूर्ण रीतीनें व्याख्यानें देणारीं अनेक प्रतिष्ठित पात्रें आपणांस पहावयास मिळतात. पण काव्याचमच्यांच्या कर्णकटु निनादांतून आणि वक्तृत्वकलानिपुण पंडितांच्या व्याख्यानाच्या माऱ्यांतूनहि सर महादेव यांचें विलक्षण तेजस्वी व्यक्तित्व पूर्णपणें उमटून दिसतें. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, वाचकाच्या मनावर खरा परिणाम कादंबरींतील कोणती व्यक्ति करीत असेल तर ती व्यक्ति म्हणजे सर महादेव ! अमर्याद वैभव आणि तितकीच अमर्याद सत्ता उपभोगिलेल्या सर महादेवांच्यासारख्या अत्यंत मानी व तेजस्वी पुरुषाला स्वतःच्या घराण्याचें नांव घालविलेलें पाह-ण्याचें दुर्दैव सहन करावें लागतें. स्वतःच्या मुलाच्या चडोल वृत्तीची कल्पना पूर्णपणें असल्यामुळें घराण्याचें नांव पुतण्या तरी उजळ करील या वेड्या आशेनें व्याकुळ झालेल्या सर महादेवाना पुतण्याकडून दारुण निराशेचा धक्का मिळावयाचा होता. माजी गव्हर्नराचा पुतण्या कायदेभंगाच्या चळ-वळींत सामील होणें ही घटना खरोखरच विचित्र आहे यात शंका नाहीं. प्रियदर्शनाविषयीं मनांत बाळगलेल्या नानाविध आकांक्षांचा चुराडा डोळ्या-देखत झालेला पाहूनहि अत्यंत धीरानें आलेल्या परिस्थितीशीं न कुरकुरतां टक्कर देणाऱ्या सरसाहेबांविषयीं कुतूहलमिश्रित आदरच वाटतो. अगदीं

शेवटपर्यंत त्यांचा करारी स्वभाव अभंग राहिला. "स्वतःच्या आवडत्या पुतण्याला शिक्षा ठोठावून मी माझी कठोर कर्तव्यबुद्धि लोकांच्या निदर्शनाला आणून दिली असती" (पृ. १०४) या त्याच्या प्रियदर्शनाविषयींच्या उद्गारांनीं आणि शेवटीं प्रियदर्शन तुरुंगांत गेल्यावर त्याला 'अ' वर्ग मिळावा म्हणून प्रियंवदा बॅ. नायडूंकडे खटपट करायास गेली असें कळल्याबरोबर त्यांच्या मानी स्वभावाला झालेल्या विषारी दशामुळें त्यांच्या स्वभावाचें खरें वैशिष्ट्य परिपूर्णतेनें प्रतीत होतें.

## 'राजकीय कुटुंबां'तील राजकारण

कांता आणि सर महादेव ठाकूर या दोन प्रमुख व्यक्तींची ओळख करून घेतल्यावर आता थोडेसें राजकारण केलें पाहिजे. राजकारण हा कादंबरीचा हेतु असल्यामुळें कादंबरींतील सर्वच व्यक्तींचें जीवन राजकारणमय झालें आहे. राजकारणाच्या कोणत्या ना कोणत्या तरी प्रकाराशीं कादंबरीतील प्रत्येक व्यक्ति संबद्ध आहे. राजकारणात प्रत्यक्ष भाग न घेणाऱ्या व्यक्ति राजकारणी प्रवचनें झोडून 'शंभर टक्के राजकीय कादंबरी' हें विधान अक्षरशः खरें करतात. असेंहि म्हणतां येईल कीं, निव्वळ राजकारणाच्या जडजंबाल चर्चेनें कादंबरी अगदींच 'सत्तावनी क्रांतियुद्धा'-प्रमाणें हृदयविदारक होऊं नये येवढ्यासाठीं कांता, विजया, श्यामासुंदरी इत्यादि स्त्रियांची योजना लेखकानें केली असावी. आणि या चतुर योजनेमुळेंच कादंबरी शेवटपर्यंत वाचण्याइतका धीर वाचकामध्यें उरतो. या मार्मिक योजनेच्या जोडीलाच सागरव्हिलामधील वैभवशाली व उन्मादक वातावरण आणि माणसातील libido जागृत करणारीं स्त्रीदेहाचीं रस, भाव आणि कला यांनीं दुथडी भरून वाहणारीं वर्णनें असल्यामुळें प्रचारकी वाङ्मय लिहिणाऱ्यांचा पितामह जो जी. बी. एस्. त्यालाहि न साधलेली गोष्ट माडखोलकरांनीं साधून दाखविली आणि आपली राजकीय व्याख्यानबाजी सामान्य आणि त्याचप्रमाणें बुद्धिजीवी वाचकांच्याहि गळीं उतरविण्याचा कलापूर्ण प्रयत्न केला असें म्हणावयास हरकत नाहीं!

'कांतें'तील राजकारणाचें स्वरूप कळण्यासाठीं प्रथम सर महादेवांच्या 'राजकीय कुटुंबा'ची माहिती करून घेतली पाहिजे. पृ. १५ वर या

'राजकीय कुटुंबा'ची ओळख लेखकानें करून दिली आहे. बॅ. हेमंतकुमार गुप्ता हे ॲडव्होकेट जनरल ( पृ. २५७ ) असून त्याची पत्नी हिमगौरी कौन्सिलची सरकारनें नेमलेली सभासद होती, व कौन्सिलांत नेमणूक झाल्याबरोबर पुरवणी अंदाजपत्रकावर तिनें 'ठसकेदार' भाषण केलें होतें. प्रियवंदा देशमुख ही नागपुरातील निमसरकारी चळवळींत प्रामुख्यानें भाग घेणारी, जुन्या, संपन्न घराण्यांतील तरुण विधवा होती. या विदुषीसुद्धां कौन्सिलच्या गॅलरींत, लॉबींत किंवा लायब्ररींत नेहमीं दृष्टीस पडत व प्रसंगविशेषीं त्या सर महादेवाचें दौत्यहि करीत. यादवराव कदम हे डी. एस्. पी. च्या जागेपर्यंत चढलेले पोलिस अधिकारी होते. सरसाहेबांचे चिरंजीव राधमोहन बॅरिस्टर असून मजूर सभासद म्हणून सरकारनें कौन्सिलांत त्यांची नेमणूक केली होती. आणि या सर्व झकपक पोषाख केलेल्या बड्या लोकात सरसाहेबाचा खादीधारी पुतण्या प्रियदर्शन मोठा विचित्र विरोध निर्माण 'करून राहिला' होता. १९२९ मध्यें त्यानें वकिलीला सुरवात केली असावी असें दिसतें.

या राजकीय कुटुंबांत चाललेलें राजकारण अभ्यासू वाचकाला अपुरें वाटूं नये म्हणून स्वामीजी आणि पंडितजी या दोन ( अनुक्रमें ) जटिल व कुटिल आचार्यांची योजना करून आणि त्याच्याकडून अपुरे राहिलेले राजकारणाचे वस्तुपाठ पुरे करवून कादंबरी 'शंभर टक्के राजकीय' बनविण्यात आली आहे !

पण हें सर्व झालें 'सनदशीर' राजकारणाविषयीं ! सनदशीर राजकारण करणाऱ्या पर्यंकपंडितांच्या प्रवचनांनीं कादंबरीचा बराचसा भाग व्यापिला असला तरी श्री. माडखोलकराना या 'राजकीय कुटुंबात' फारसें करमत नसलें पाहिजे. त्यांचा सर्व ओढा कृष्णकांतांच्या 'मिष्टान्नभांडाराकडे' दिसतो. या खानावळींत श्यामासुंदरी ही बंगाली तरुणी आणि तिच्या भोंवतीं बसलेले तरुण पिस्तुलाचा चाप दाबल्याबरोबर पिकलें कवठ झाडावरून खालीं पडावें त्याप्रमाणें हिंदुस्थानचें स्वातंत्र्य अलगद हातात पडेल या प्रामाणिक समजुतीनें पिस्तुलविज्ञानाची शास्त्रीय आणि उद्बोधक चर्चा करीत बसतात. दहशतवाद्याच्या या मठींत श्यामासुंदरी, डी. एस. पी. यादवरावांचा मुलगा जयसिंग, कांतेचा भाऊ उमाकांत, चारुचंद्र नावाचा

एक बंगाली तरुण, आणि इतर दोन चिल्लर लोक येवढे सभासद नेहमीं जमतात आणि जयंत चितळे या भयंकर दहशतवाद्यापासून प्राप्त करून घेतलेल्या स्फूर्तीच्या स्फुलिंगांनीं पारतंत्र्याच्या कुंद वातावरणांत गारठून गेलेल्या आपल्या युयुत्सु वृत्तीला चेतना देण्याचा प्रयत्न करीत असतात !

दहशतवाद्यांची बलाढ्य इंग्रज सरकारलाहि भीति वाटते. मग, सुरी—चाकू हींच हत्यारें माहीत असलेल्या आणि दिवाळींतल्या पिस्तुलागोळिकडे किंवा सिनेमांत पाहिलेल्या पिस्तुलागोळिकडे पिस्तुलविज्ञानाची माहिती मुळींच नसलेल्या शस्त्रहीन सामान्य वाचकाला कृष्णकांताचें 'मिष्टान्न—भांडार' अलीबाबा आणि चाळीस चोराच्या गुहेप्रमाणें थरकांप उडविणारें वाटल्यास नवल नाहीं ! म्हणून प्रथम सरसाहेबांच्या राजकीय कुटुंबांत अनाहूत जाऊन तेथील खमंग टोस्ट चघळूं-आणि मग मसालेदार कॉफीचा एखादा घोट घेऊन चपराशानें आणलेल्या काचपात्रात हात धुवूं. येवढें झाल्यावर तबकांतला विडा तोंडांत टाकूं व 'हळूच वेताच्या खुर्चीवर रेलून' 'अथातो राज्यशास्त्रजिज्ञासा' असें म्हणून कान टवकारून त्या राजकारणशौंडांची भरघोस प्रवचनें ऐकूं !

एक गोष्ट प्रामुख्यानें नजरेस येते ती अशी—'राजकीय कुटुंबा'त एक प्रियदर्शन सोडून दिला तर बाकीचे सारे गांधीवादाची प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष टवाळी करणारे आहेत. सर महादेवांना 'बायकापुढें सोशॅलिझमवर व्याख्यान' ही कल्पना फार अनिष्ट वाटते. (पृ. १७) जबाबदार माणसानीं 'जिभा मोकाट सोडून' जहाल भाषा वापरूं नये असें त्यांच्या सनदशीर मनाला वाटत असतें. प्रियदर्शनानें कॉंग्रेसच्या चळवळीपासून प्रयत्नपूर्वक दूर राहावें अशी त्याची मनापासून इच्छा आहे. पण तरुण पिढी स्वतःपेक्षां अधिक जहाल निपजणारच याचीहि कल्पना त्यांच्या मनाला होती. "तूं कॉंग्रेसला मिळालास याबद्दल मला म्हणायचें नाहीं कांहीं. आमच्या पिढीपेक्षां तुमचीं मतं अधिक जहाल असावींत हें साहजिकच आहे." (पृ. १८) खरें म्हणायचें तर राजकीय कुटुंबांत सर महादेवच सर्वांत अधिक विचारपूर्वक व तोलून बोलत असतात. गांधींच्या मार्गानें जाण्यांत देशाचं कल्याण नाहीं असा त्यांचा विश्वास आहे. प्रांतिक स्वायत्ततेच्या काळांतील पहिल्या मंत्रिमंडळांत प्रियदर्शन असावा

असें त्यांना मनापासून वाटत असल्यामुळें ते त्याचें मन वळविण्याची शिकस्त करीत असतात. या सर्व गोष्टींमुळें त्यांचीं व्याख्यानें जबाबदारीची जाणीव ठेवून केलेलीं दिसतात. गांधीवादावर टीका करीत असता ते गांधींचीहि टवाळी उडवितात. पण त्यामध्येंहि फटकळपणापेक्षां विचारी धूर्तपणाच अधिक दिसतो. "गांधींची ती धार्मिकता तुम्हांआम्हाला तिरस्करणीय आणि दांभिक वाटते. पण बहुजनसमाज त्या धार्मिकतेमुळेंच त्यांच्याकडे इतक्या प्रबळतेनें ओढला गेला आहे," असें ते मि. मूरहेड यांना बजावून सांगतात. 'राजकारणांतील सत्य हें किती चंचल आणि सापेक्ष असतें' हें सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं केलेली गांधींच्या सत्याची मीमांसा (पृ. १५७) चिन्तनीय आहे. "सत्य सत्य म्हणजे तरी काय! सत्य सापेक्ष असतें हें तर झालेंच. पण, राजकारणांत ही त्याची सापेक्षता तत्त्वें, पक्ष आणि परिस्थिति यांच्यामुळें इतकी कांहीं वाढते कीं, शेवटीं एका माणसाचें सत्य हें दुसऱ्या माणसाच्या दृष्टीनें असत्य ठरल्याशिवाय रहात नाहीं." सरसाहेब 'राजकीय चारित्र्य' आणि 'खाजगी जीवन' यांत दोन ध्रुवांइतकें अंतर मानतात. त्यांना म. गांधींच्या खाजगी जीवनाविषयीं आदर आहे. फक्त त्यांचें राजकीय चारित्र्य त्यांना पसंत नाहीं. अंगीकृत कार्याविषयीं अविचलित निष्ठा, सार्वजनिक बाबतींत चोख वर्तन आणि लोकांची प्रतारणा न करण्याची वृत्ति या तीन गुणानाच ते राजकीय चारित्र्य समजतात आणि 'लोकांची प्रतारणा करण्याच्या बाबतींत मात्र त्यांनीं (म. गांधींनी) युरोपातल्या निर्ढावलेल्या मुत्सद्यांवरहि ताण' केल्यामुळें सरसाहेबांना म. गांधींचें राजकीय चारित्र्य मान्य नाहीं. पण त्याचबरोबर 'गांधींचें खाजगी जीवन अत्यंत शुद्ध आहे' याविषयीं त्यांना मुळींच शंका वाटत नाहीं. दहशतवाद्यांच्या मठींत वावरणारा जयसिंग आणि सर महादेव या निरनिराळ्या कार्यक्षेत्रांत वावरणाऱ्या दोन व्यक्तींच्या म. गांधींच्या व्यक्तित्वाविषयींच्या कल्पनांमधील भयंकर विरोध लक्षात घेतला असतां सर महादेव व्यावहारिक आणि समतोल मनाचे धूर्त राजकारणी पुरुष आहेत हें कळून चुकतें. जयसिंगकृत ही मीमांसा पहा.—"तुमच्या त्या महात्म्याची रहाणी नू तत्त्वज्ञान याचा विचार जों जों करावा, तों तों मानवी विकृतीचा तो एक अजब नमुना आहे असं वाटायला लागतं मनाला! एकीकडे स्वतःला

दरिद्रनारायण म्हणवून घेऊन उघड्या अंगानं हिंडायचं न् दुसरीकडे कोट्याधीशांच्या तंत्रानं राजकारणाचीं सूत्रं हलवायचीं!......एकीकडे ब्रह्मचर्यावर प्रवचनं झोडायचीं न् दुसरीकडे तरुण शिष्यिणींकडून शरीरसेवा करून घ्यायची...........!" (पृ. ५५) आतां सर महादेव काय म्हणतात पहा. "गांधींचं खाजगी जीवन अत्यंत शुद्ध आहे. याबद्दल मला शंका नाहीं. तसेंच हातीं घेतलेल्या कार्याविषयीं त्यांची निष्ठाहि अमर्याद असते." (पृ. १५८) याच ठिकाणीं सर महादेवाची थोर व्यक्तींच्या खाजगी जीवनाविषयींची उदार विचारसरणी पहा. "अलौकिक व्यक्तींच्या चारित्र्यामागून नीतितत्त्वें धावत जातात असें म्हटलें तर तें चूक होणार नाहीं. ज्याचें बुद्धिसामर्थ्य अचाट असतें, त्याच्या बौद्धिक आणि मानसिक गरजाही अचाट असतात......त्याच्या खाजगी वर्तनाचा उपसर्ग जोंपर्यंत सार्वजनिक कार्यांना होत नाहीं, तोंपर्यंत लोकाना त्याची दखल घेण्याचें कारण नाहीं." (पृ. १५८)

सरसाहेबाचे विद्वान चिरंजीव बॅ. राधामोहन म. गांधींना 'रासपुतीन' समजतात. "हिंदुस्थानांतल्या गब्बरातल्या गब्बर भांडवलवाल्यांशीं असलेला त्यांचा स्नेहसंबंध, लैंगिक चर्चेविषयींचा त्यांचा हव्यास, स्त्रीसहवासाविषयींची त्याची आसक्ति आणि आपल्या प्रत्येक कृतीला धार्मिक स्वरूप देऊन स्वतःचें माहात्म्य पद्धतशीर रीतीनें वाढविण्याचा त्याचा प्रयत्न पाहिला, म्हणजे त्यांना रासपुतीन म्हणावयाला हरकत नाहीं वाटत फारशी." (पृ. ९९) इंग्लंडांत सात वर्षें राहून गुण उधळलेल्या (पृ. २२) आणि अपरात्रीं पिऊन धिंगाणा घालणाऱ्या (पृ. ६४) आणि डान्सिंग हॉलमधून बॅ. गुप्तांसमवेत दोन ॲंग्लो इंडियन पोरींना बरोबर घेऊन बाहेर पडल्यावर दारूच्या धुंदींत पानपट्टीच्या दुकानासमोर गडबड केल्यामुळें पोलिसांनीं पकडून गेटावर नेलेल्या या सर्वसंगपरित्यागी महाशयानीं म. गांधींच्या चारित्र्याची चर्चा करावी या गोष्टीला हसावें कीं त्याच्या बेजबाबदार मूर्खपणाची कींव करावी तेंच कळत नाहीं! जो प्रकार राधामोहनचा तोच बॅ. गुप्तांचा. या प्रचंड राजकारणी पुरुषाला त्याची पत्नी कशी 'टोमणावते' (हा खास माडखोलकरांचा शब्द आहे!) तें पाहण्यासारखें आहे—

"आणि मी इथून टळल्यावर तुम्ही न् राधामोहन सदरमधल्या ॲंग्लो

इंडियन पोरींना घेऊन रात्रभर धुमाकूळ घाला ! गोरेवाड्याचा बंगला आहेच शृंगारून ठेवलेला तुमच्यासाठीं ! " ( पृ. १८६ ) म. गांधींच्या चारित्र्याची चर्चा करण्याच्या बाबतींत या चंडोलांना त्यांच्या श्रेष्ठ दानतीमुळें खास अधिकार प्राप्त झाला आहे यांत शंका नाहीं !

सरसाहेबांच्या राजकीय कुटुंबांतील राजकारणाचें हें असें स्वरूप आहे. गांधीवादावर चर्चा करण्याचा आव आणून शेवटीं म. गांधींच्या व्यक्तित्वाचीच नीरस चर्चा करणाऱ्या राजकारणांतल्या पेंढाऱ्यांना ' गांधींना स्त्रीसहवास आवडतो ' हा मंत्र जपण्यापलीकडे आणखी काय बौद्धिक पराक्रम करतां येणार ?

गांधीवादावरील या व्याख्यानांच्या जोडीला कोणतींच निश्चित मतें नसलेल्या पंडितजींची व्याख्यानें आहेतच ! व्याख्यानांचे विषयहि विविध व वैचित्र्यपूर्ण आहेत.—कामगारांची दु:स्थिति, सुटाबुटांत मिरवणारा आधुनिक तरुण, स्वातंत्र्याचा खरा अर्थ, गांधी व समाजवाद, जवाहरलाल व सोशॅलिस्ट रिपब्लिक, महाराष्ट्र राजकारणांत कां मागें पडला, हिंदू समाजाच्या अधोगतीचें कारण, इंग्रजांची महत्त्वाकांक्षा, जागतिक दृष्टि, इत्यादि विषयांवर पंडितजींचीं विद्वत्ताप्रचुर व्याख्यानें ऐकण्याचें भाग्य ज्याला लाभलें तो धन्य, तो पुण्य !

या व्याख्यानांच्या विषयांसंबंधीं फारशी चर्चा करण्याची आवश्यकता नाहीं. एरवीं पंडितजींचीं हीं व्याख्यानें हृदय हातानें घट्ट दाबून धरून ऐकावयास हरकत नाहीं. पण अत्यंत अस्थानीं आणि अवेळीं व्याख्यानें कोणी बडबडायला लागला कीं, त्याच्या अंगावर चावरा कुत्रा सोडावासा वाटतो. प्रियदर्शनाला अटक झाल्यानंतर कांतेचें समाधान करून तिचा पाहुणचार घेण्यासाठीं आलेल्या हा पंडित घरांत पाऊल टाकल्यापासून कांतेच्या समोर वरील जाड विषयांवर चार पानें व्याख्यान नरडें दुखेपर्यंत बडबडतो ही गोष्ट संतापजनक आहे खरोखर ! आगगाडीचा भयंकर अपघात झाल्यावर सुदैवानें शीरसलामत वाचलेल्या उतारूंसमोर एकसारखी एंजिनाच्या घातुकपणावर शास्त्रीय व्याख्यान अपघाताच्याच ठिकाणीं देणाऱ्या एंजिनविशारदावर जीं स्तुतिसुमनें उधळलीं जातील त्याच सुमनांनीं या पंडिताची श्रुतिस्मृतिपुराणोक्त पूजा बांधावयाचा अनावर मोह होतो !

## सशस्त्र क्रांतीचें राजकारण

सरतेशेवटीं दहशतवाद्यांच्या मठींत प्रवेश करावयाचा आहे. सशस्त्र क्रांतीनेंच फक्त स्वातंत्र्य मिळेल ही प्रामाणिक आशा उराशीं बाळगून एकत्र जमलेले अर्धा डझन वीरात्मे चोरून आणलेल्या पिस्तुलाचे बार करून गांधींच्या मूर्ख अहिंसावादानें विनाकारण दुरावलेलें हिंदवी स्वातंत्र्य खेचून आणावयास उद्युक्त झाले आहेत. आणि शेवटीं श्यामासुंदरी, जयसिंग व चारुचंद्र या तिघानीं एका साहेबाचा पिस्तुलानें खून करावयाचा बेत केला असतां नेम चुकल्यामुळें साहेब तर मरत नाहींच, पण उलट त्याचीच गोळी श्यामासुंदरीला लागून ती मरते व तिचे दोघे मित्र पकडले जातात—आणि त्यामुळें या 'पतित देशाला' स्वातंत्र्य अद्यापि मिळूं शकलें नाहीं! ती गोळी त्या साहेबाला लागली असती तर १९३० च्या एप्रिलमध्येंच हिंदुस्थान कायमचा स्वतंत्र झाला असता आणि गांधींच्या अहिंसेच्या कटकटींतून भारतमाता मुक्त झाली असती!

कादंबरींतील एकंदर राजकारणाचें सूक्ष्म अवलोकन केलें असतां माडखोलकरांना कांहीं तरी निमित्तानें गांधींची व गांधीवादाची टवाळी करावयाची अनिवार लालसा असली पाहिजे हें स्पष्ट दिसून येतें. त्यांना जर निःपक्षपाती चर्चा करावयाची असती तर त्यांनीं गांधीवादाची तरफदारी करणारें एखादें जाणतें व्याख्यानबाज पात्र निर्माण केलें असतें. पण तसें कांहींच झालें नाहीं, आणि गांधीवादाचा प्रतिनिधि म्हणून निर्माण केलेला प्रियदर्शन बाकीच्या व्याख्यानपंचाननांच्या मानानें 'कोण्या झाडाचा पाला' वाटतो! बिचारा बोलतोहि अगदीं थोडें. त्यामुळें तोफांच्या गडगडाटांत तडतडयांच्या आवाजाप्रमाणें त्याचें गांधीवादाचें समर्थन लोपून जातें.

श्री. माडखोलकरांना नुसतें गांधीवादांतील वैयर्थ्य दाखवावयाचें नसून दहशतवाद्यांच्या जहाल क्रांतिकारक तत्त्वांचें महत्त्व वाचकाला पटवावयाचें आहे. कृष्णकांताच्या मिष्टान्नभांडारांत जमलेल्या व्यक्ति हेच त्याचे खरे जिवलग! जयंत चितळे या दहशतवाद्याच्या गुरुमाउलीनें १८ मार्च १९३० रोजीं जयसिंगाला पाठविलेल्या दहापानी पत्रावरून हें उघड होतें.

कादंबरीचें एकंदरींत सर्वच वातावरण 'सशस्त्र क्रांति' या शब्दानें दुमदुमून गेलें आहे. सशस्त्र क्रांतीनें मिळालें तरच स्वातंत्र्य मिळूं शकेल हें युयुत्सु तत्त्व खरोखरच माडखोलकराना पटवावयाचें असेल तर त्यांचा हेतु त्यांना कल्पनाहि नसेल इतका अयशस्वी झाला आहे. पिस्तुलवाद्याची स्टँगमनला गोळी घालून स्वातंत्र्याची मुहूर्तमेढ रोवण्याची कल्पना फसते आणि स्टँगमनचीच गोळी लागून श्यामासुंदरी मरते व श्यामासुंदरीचें दहन करून तिचे दोघे साथीदार रात्रीं जे निजतात ते अगदीं सकाळीं नऊ वाजतां प्रत्यक्ष स्टँगमन त्यांच्या उशाशीं येऊन उभा राहीपर्यंत! पिस्तुलवाद अयशस्वी होतो व कटांत प्रत्यक्ष सामील असलेल्या थोड्याशा लोकांपलीकडे तें तत्त्वज्ञान फैलावूं शकतच नाहीं हें स्वत: माडखोलकरांनींच सिद्ध केलें आहे. कारण उमाकान्तानें पिस्तुलाची चोरी केल्यावर तो कटाला नालायक आहे या कल्पनेनें जयसिंग त्याला सर्व गुपित सांगत नाहीं, व शेवटीं कट फक्त या तिघांतच शिल्लक राहतो. क्रांतिकारकांच्या भोंवतीं एक विशिष्ट तेजोवलय निर्माण करण्याचा प्रयत्न आरंभीं करण्यांत आला आहे. पण पुढें हें वलय नष्ट होऊन साध्या मानवाकृति त्या ठिकाणीं राहिलेल्या दिसून येतात. जयंत चितळेच्या प्रेमाचा अव्हेर करणारी आणि त्याला मर्यादेपलीकडे जाऊं न देणारी श्यामासुंदरी महिन्या सवामहिन्यांतच स्वतःवर लादून घेतलेलें बंधन झुगारून देऊन जयसिंगाच्या सहवासांत प्रणयमूर्च्छना अनुभविते आणि 'त्या अवस्थेचा आस्वाद आणि उन्माद यांनीं तिचें शरीर आणि मन जणुं काहीं भारून टाकलें' जातें.

हा प्रकार झाला जयसिंग आणि श्यामासुंदरी यांच्यासारख्या निश्चयी आणि करारी दहशतवाद्यांचा! उमाकांत हा उघडउघड अर्धवट दहशतवादी! डी. एस. पी. कदमांच्या खाजगी खोलींत शिरून त्याच्या टेबलाच्या खणांतील पिस्तुल तो चोरीत असतां त्याची प्रेयसी विजया त्याला पाहते आणि तिला एकदम मूर्च्छा येते. सदर उमाकांत तिला त्या स्थितींत उचलून तिच्या खोलींत नेतो आणि तसल्या त्या भयंकर स्थितींत सुद्धां हा तेजस्वी व जहाल क्रांतिकारक अतृप्त मनानें, आणि शरीरशास्त्राच्या विद्यार्थ्याप्रमाणेंच जणुं काय, त्या मूर्च्छित स्त्रीच्या वस्त्रविरहित, विलोभनीय व कामवासना जागृत करणाऱ्या अवयवाकडे चिकित्सक जिज्ञासु बुद्धीनें

पहात राहतो! आणि हा म्हणे पिस्तुलाचा बार करणार आणि साहेबाला समुद्रापलिकडे पिटाळून लावणार!

अत्याचारी क्रांतिकारक तत्त्वज्ञानाचें वैयर्थ्य स्वतः श्यामासुंदरीच स्पष्ट करीत आहे. तिचे हे कारुण्यपूर्ण उद्गार पहा—"मामावर देशोघडीला लागून हलवायाचें दुकान काढण्याची पाळी आली; भाई ऐन तारुण्यांत फासावर गेला; व आई त्याच्या वियोगानं झिजून पिचून मेली.—आमच्या साऱ्या कुटुंबाची अगदीं वाताहत होऊन गेली या क्रांतिवादामुळं!—माझ्यांत आतां आवडत्या माणसाचं मरण पाहण्याची शक्ति उरलेली नाहीं." (पृ. ४१)

## श्री. माडखोलकरांचें कलावैभव

श्री. माडखोलकरांच्या कलात्मकतेचें कौतुक करितांना त्यांच्या व्याख्यानांकडे दुर्लक्ष करावेंसें वाटतें. पृष्ठ २१ वरील वर्णन यासाठीं वाचावें. पृष्ठ २७ वरील कांतेचें वर्णन असेंच रेखीव आहे. पृष्ठ १७५ वरील खालील वाक्यें पाहा—"चांदण्याचा शुभ्र प्रकाश त्या ताटव्यावर पडला होता आणि त्या प्रकाशात अर्धवट उमललेल्या कळ्या हळुवारपणें हंसत होत्या. त्याचें तें लाजरें, मधुर हास्य पाहून तिच्या मनाला कसलीशी सूक्ष्म वेदना झाली आणि तिच्या हृदयांतल्या गुदमरलेल्या अबोध भावना गाऊं लागल्या." कांतेच्या शोकमय अंताचें वर्णन असेंच अत्यंत हळुवारपणें केलें आहे. माझ्या मतें कलेंतील सूचकतेची परमावधि या ठिकाणीं झाली आहे.

परंतु माडखोलकरांच्या कलाविलासाचें खरें क्षेत्र निराळेंच आहे. स्त्रियांच्या सौंदर्याचें व निरनिराळ्या अवयवांचें उन्मादक वर्णन केल्याबद्दल पुष्कळांनीं त्यांच्यावर कडक टीका केली आहे. ('वाङ्मयशोभा,' जून १९३९. पृ. ५६) परंतु या टीकेचा मुळींच उपयोग नाहीं! माडखोलकरांचें तें वैशिष्ट्य आहे—तो त्यांचा स्वभाव आहे. एकवेळ कादंबरी लिहिणें ते सोडून देतील पण या स्वभावाचा व वैशिष्ट्याचा त्याग ते कधींहि करणार नाहींत. त्यांची उरोजप्रियता अनावर आहे. कोणाला काय प्रिय असावें हें ज्याचा तो ठरवील. व्यक्तीच्या मनाचा हा प्रश्न आहे. यामुळें उन्नत वक्षःस्थलाचीं व उरोजांचीं वर्णनें माडखोलकरांनीं करूं नयेत

असा कोणी उपदेश करण्याचें कारण नाहीं. पण त्या बाबतींत औचित्यभंग न होईल येवढी खबरदारी माडखोलकरांनीं अवश्य घ्यावी. कारण, औचित्यभंग हटकून रसभंग करतो हें त्यांच्यासारख्या चतुर कलाभिज्ञाला एखाद्यानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. "अनौचित्याद्दते नान्यद्रसभङ्गस्य कारणम्" हें ध्वन्यालोककारानींच सांगावयास हवे असें नाहीं. 'कांता' कादंबरींत पृष्ठ ७४ वर या प्रकारच्या औचित्यभंगाचें स्पष्ट लक्षांत येण्यासारखें उदाहरण आहे. मागें त्याची थोडीशी चर्चा केली आहे. मूर्च्छित पडलेल्या स्वत:च्या प्रेयसीकडे ज्या पद्धतीनें आणि कामुकतेनें उमाकांत पाहतो ती पद्धति आणि कामुकता खास औचित्यभंगाला कारण होतात.—"मानेपासून उरोजापर्यंत क्रमाक्रमानें उन्नत होत गेलेलें गोरेपान वक्षःस्थल, बॉडिस घातलेलें नसल्यामुळें गुंड्या सुटलेल्या सैल ब्लाउजमधून दिसणारे रेखीव उरोज, नीविबंधापर्यंत निमुळता होत गेलेला नितळ कटिप्रदेश, विसकटलेल्या पातळाच्या निळसर रंगामुळें खुलून दिसणाऱ्या गोंडस जंघा!—" कां, कादंबरीकार, थांबलात कां? संस्कृत कवींचा आधार घेऊन वर्णन परिपूर्ण करतां येणार नाहीं का? वर्णन ठीक आहे हें! पण कोणत्या परिस्थितींत किती शृंगार करावा याला कांहीं मर्यादा असते कीं नाहीं!

विजया मूर्च्छित पडल्यामुळें तिचें वस्त्र विसकटलें तर त्यांत अस्वाभाविक कांहींच नाहीं. याबाबतींत मी अन्यत्र जें लिहिलें आहे तें येथें उद्धृत करणें अस्थानीं होणार नाहीं असें वाटतें. "ती सुंदर असेल व तिचे विवृत अवयव पराकाष्ठेचे उन्मादक असतील या दोन्ही गोष्टी एकदम मान्य. पण ती बेशुद्ध पडली असतां तिला शुद्धीवर आणण्याची प्रथम खटपट करण्याऐवजीं मशारनिल्हे क्रांतिकारक तिच्या विलोभनीय अवयवांकडे सूक्ष्मपणें पहात बसतो. या ठिकाणीं स्त्रीच्या विवृत अवयवांचें उन्मादक वर्णन करणें अभिरुचीच्या दृष्टीनें योग्य आहे काय? असें वर्णन औचित्यभंगाला कारणीभूत होणार नाहीं काय? पण लेखकाला याची थोडीसुद्धां फिकीर नसावी असा दाट संशय येतो............या ठिकाणीं संदर्भानुसार, तिच्या अर्धनग्न शरीराचें इतकें गहिरें वर्णन करण्याची थोडी तरी जरूरी होती काय? पण स्त्रीदेहाची उत्तान आणि कामुक वर्णनें करण्याचा थोडासा प्रसंग उद्भवल्याबरोबर 'औचित्य' वगैरे साऱ्या

गोष्टी चुटकीसरशी विसरल्या जातात याचा हा बलवत्तर पुरावा आहे. "*
'शाप' कादंबरींतील लच्छीच्या अनावृत तारुण्याचें आणि 'गुलाबाच्या दाठर कळ्यांप्रमाणें' असलेल्या तिच्या उरोजांच्या 'टचटचीत' अग्रांचें, व 'रसरशीत' ताज्या नारिंगाप्रमाणें 'स्पर्शाला मऊ' पण 'अंतर्यामीं टणक' असलेल्या तिच्या 'उभार' उरोजांचें गहिरें वर्णन करून माड-खोलकरांनीं या बाबतींत पहिला घडा गिरविला होता हें वाचकाच्या ध्यानांत असेलच. प्रस्तुत कादंबरींत उत्तान वर्णनाच्या जोडीला औचित्य-भंग कसा करावा व हीन अभिरुचि कलात्मक रीतीनें कशी प्रकट करावी हा पुढचा घडा ते गिरवीत आहेत. आणि, या उन्मादक कलेंतील त्यांचें यश 'प्रतिपच्चन्द्रलेखेव' वृद्धिंगत होत गेलेलें आपल्याला पुढच्या कांहीं कादंबऱ्यांत दिसून येणारच आहे. म्हणून त्याची येथें चर्चा नको!

## राजकीय व्याख्यानें

राजकीय व्याख्यानांचा व विविध विषयांवरील चर्चांचा अक्षरशः कहर झाला आहे या कादंबरींत. 'मुक्तात्मा' कादंबरींतहि चंद्रशेखरचीं कांहीं व्याख्यानें आहेत. पण, प्रस्तुत कादंबरींतील व्याख्यानाच्या मानानें तीं बरींच संयत आहेत हें कबूल केलें पाहिजे. कादंबरींत प्रसंगोपात्त कांहीं महत्त्वाच्या विषयावर चर्चा असल्या तर त्यामुळें रागावण्याचें कांहीं कारण नाहीं. पण अशा चर्चा घटनांतून निर्माण झालेल्या असाव्यात, म्हणजेच, त्या समयोचित व समयप्रेरित असाव्यात. केवळ व्याख्यानांसाठीं व्याख्यानें किंवा चर्चांसाठीं चर्चा असा प्रकार वरचेवर होऊं लागला तर तें दूषणीय ठरेल. विशेषतः, खास स्वतःचीं मतें वाचकांना कळविण्यासाठीं अथवा त्यांच्या माथीं मारण्यासाठीं लेखक जेव्हां एकाद्या पात्राचा उपयोग करून घेतो तेव्हां तीं व्याख्यानें आक्षेपार्ह ठरतात. नाटकापेक्षां कादंबरींत व्याख्यानांना अधिक अवसर असतो हें मान्य. पण, या व्याख्यानांमुळें कादंबरीला वादविवादमंडळाचें अथवा चक्रीकीर्तनाचें स्वरूप येऊं नये इतकी तरी कादंबरीकारानें खबरदारी घ्यावयास पाहिजे. कादंबरीच्या साच्यांत

---

* 'साहित्याचा ध्रुवतारा,' पृ. ११०.

ओतलेला राजकीय मतप्रचार कला, तंत्र, किंवा त्या मतप्रचाराची परिणामकारकता या दृष्टीनें कितपत यशस्वी होऊं शकेल हें मराठी वाङ्मयांत अजून ठरावयाचें आहे. कादंबरींत मतप्रचार असावा किंवा नसावा हा प्रश्न त्या कादंबरींत विवेचिलेल्या गेलेल्या प्रचारकी मतांचा वाचकांवर चिरस्थायी परिणाम झालेला दिसून आला तर सुटेल असें कांहींना वाटतें. पण चिरस्थायी परिणाम झाला किंवा नाहीं हें ठरविण्याचें साधन कोणतें? तें कांहीं असलें तरी वृत्तपत्रांत आलेले सभाचे आणि चर्चांचे साग्रसंगीत वृत्तान्त किंवा असेंब्लींतील विविध वादविवादांचे रिपोर्ट म्हणजे काहीं कादंबरी वाङ्मय नव्हे! कादंबरींत व्याख्यानें असलेलीं चालतील. पण, त्या व्याख्यानामुळें कादंबरीला एखाद्या रिपोर्टाचें व कादंबरीकाराला रिपोर्टराचें स्वरूप येता कामा नये ही अट आहे. नुसतेच चर्चांचे रिपोर्ट कादंबरींत दडपून देण्याऐवजीं राजकीय बाबतींतील स्वतःचे सिद्धान्त तर्कशुद्ध रीतीनें मांडण्यासाठीं लेखकानें 'आधुनिक भारता' सारखा एखादा ग्रंथ लिहून राजकारणावर जें काय पांडित्य आपल्याला प्रदर्शित करावयाचें तें बेलाशक करावें. पण हें करण्याची बौद्धिक कुवत ज्यांच्याठिकाणीं नाहीं असे 'कच्च्या दिला'चे लोक स्वतःला मान्य असलेले व पारखून न घेतलेले वेडेवाकडे सिद्धान्त आपल्या कादंबरींतील पात्रांच्या द्वारें बेधडक मांडतात व पात्रांना पुढें करून आपण त्या मताविषयींच्या सार्‍या जबाबदारींतून सहीसलामत सुटून जातात. गांधीवादावर व स्वतः गांधीजींवर माडखोलकरांचीं अनेक पात्रें काळवेळ न पाहतां तुटून पडतात. यांतलीं कांहीं पात्रें तर अगदींच मामुली, बाष्कळ, किंबहुना नालायक असल्यामुळें त्यांनीं केलेल्या गांधीवादाच्या अथवा गांधीजींच्या व्यक्तित्वाच्या हेटाळणीकडे सभ्य माणसांना लक्ष देण्याचें कारण नाहीं. पण, प्रतिष्ठित आणि जाणत्या पात्रांच्या द्वारें हें काम जेव्हां माडखोलकर करूं लागतात तेव्हा त्यांनीं केलेल्या विधानाची व वापरलेल्या युक्तिवादाची कडक हजेरी कोणी घेतली तर त्यांत कांहींच चूक होणार नाहीं. वास्तविक, जी गोष्ट पराकाष्ठेची विवाद्य आहे तिची चर्चा करावयास अथवा त्यावर साधक बाधक मत देण्यास कादंबरींतील पात्रें फारच थोड्या मर्यादेंत उपयुक्त ठरतात. निश्चित

सिद्धान्तांचें प्रणयन करावयाचें असेल तर निराळाच प्रबंध लिहिणें आवश्यक असतें. शॉ नाहीं का प्रदीर्घ प्रस्तावना लिहून आपले सिद्धान्त मांडीत ! अशा प्रणीत केलेल्या सर्व सिद्धान्तांची संपूर्ण जबाबदारी मांडणाऱ्यावरच पडते. पण, कादंबरींत ती जबाबदारी त्या त्या पात्रावर ढकलून कादंबरीकाराला फडकें झटकतां येतें. आपले वैयक्तिक दूषित पूर्वग्रह व्यक्त करण्यासाठीं माडखोलकरांनीं अनेक पात्रांचा दुरुपयोग करून घेतला आहे अशी त्यांच्याविरुद्ध तक्रार करावयास भरपूर जागा आहे. त्यांच्या निरनिराळ्या कादंबऱ्यांत आलेल्या राजकीय चर्चांमध्यें त्यांचीं स्वतःचीं मतें इतक्या स्पष्टपणें दिसत आहेत कीं, त्याबद्दलची सारी जबाबदारी त्यांच्या शिरावर टाकावयास कसलीच हरकत नाहीं. माडखोलकरांमध्यें कांहीं प्रामाणिकपणा असता तर आपल्या पात्रांआड दडून स्वतःस मान्य नसलेल्या राजकीय मतप्रणालींवर अथवा एखाद्या राजकीय पुढाऱ्यावर त्यांनीं निरर्गल टीका केलीच नसती. पण त्यांच्या बुद्धीचा व तर्कशक्तीचा आंवाका येथपर्यंतच असल्यामुळें एखादा राजकीय प्रबंध लिहावयास सांगून त्यांच्या ज्ञानाच्या मर्यादा उघड करून दाखविण्यांत कांहींच मतलब नाहीं. समाजवादाचा पुरस्कार अजागळ पात्रांच्या द्वारें करीत असतां निरनिराळ्या कादंबऱ्यांतून वरचेवर गांधीवादाची वा गांधींची त्यांनीं जी बेछूट निंदा केलेली आहे तिची या कादंबरींत केवळ सुरवात आहे. 'मुखवटे,' 'नवे संसार' व 'प्रमद्वरा' या राजकीय कादंबऱ्यांच्या विवेचनाच्या वेळीं प्रस्तुत विषयाची आणखी चर्चा करावयाची असल्यामुळें येथें यापेक्षां अधिक कांहीं न लिहिणेंच बरें !

५

# दुहेरी जीवन

'कांता' कादंबरींत सशस्त्र क्रांतीच्या राजकारणाचा ऊहापोह केल्यानंतर त्या कादंबरींतील विविध राजकीय चर्चांचा खुद्द माडखोलकरांनाच किंचित् कंटाळा आल्याप्रमाणें झालें असावें. आणि यामुळें रुचिपालट म्हणून प्रत्यक्ष राजकारणापासून अथवा राजकीय वादविवादांपासून अलिप्त असलेली 'दुहेरी जीवन' ही कादंबरी १९३९ च्या डिसेंबर महिन्यांत, म्हणजे 'कांता' लिहिल्यानंतर दहाच महिन्यांनीं, त्यांनीं लिहिली. येथें समाजवाद नाहीं, दहशतवाद नाहीं, गांधीवादाची टवाळी नाहीं, सामाजिक प्रश्नांवर चर्चा नाहीं, प्लेटॉनिक लव्ह नाहीं अथवा ध्येयवादहि नाहीं. 'भंगलेलें देऊळ' या कादंबरींतील अनिरुद्ध मात्र आतां आपल्याला मुकुंदाच्या वेषांत पुन्हां आढळेल व अनू सुलोचनेच्या वेषांत आढळेल. पात्रें जवळ जवळ तींच आहेत. नाटक फक्त बदललें आहे. पण, पात्रांना आतां चांगला सराव झाल्यामुळें तीं आपल्या कलेंत अधिक दर्दी झालेलीं दिसतील. 'भंगलेल्या देवळां'तील अनू अनिरुद्धाच्या उन्मादक प्रेमानें बेहोष झाली असल्यामुळें, स्वतःच्या विचारांवर व विकारांवर तिचा मुळींच ताबा राहिला नसल्यामुळें त्याच्या मोहप्राय आयुष्यांतील अनेक निंद्य प्रसंग स्वतःच्या वडिलांकडून कळले असतांहि त्या साऱ्या गोष्टींकडे ती दुर्लक्ष करते. इतकेंच नव्हे तर त्याचा अपराध सौम्य करण्यांचा प्रयत्न करते; किंबहुना, त्याच्या हातून घडलेल्या प्रमादांचा पाठपुरावाहि करिते हें आपण मागें पाहिलेंच आहे—"शिक्षणाचा प्रसार जसजसा होत जाईल आणि लग्नाचें वय जसजसें वाढत जाईल, तसतशी **अविवाहित** मुलांमुलींच्या ठिकाणीं ही निरागसता कमीच आढळणार...... अनाघ्रात पुष्पांची अपेक्षा करण्याचें तें युग संपलें आतां." (पृ. ९८. जाड टाइप माझा.) अनूनें या ठिकाणीं अनिरुद्धाच्या **विवाहपूर्व** आयुष्यांतील प्रमादांकडे डोळेझांक करावयाचें ठरविलें आहे हें स्पष्ट आहे. विवाहोत्तर जीवनांत अनिरुद्ध जे स्वैराचार करितो त्याबद्दल एका शब्दानेंहि तिनें

पसंती दर्शविल्याचा पुरावा नाहीं. उलट, शक्य होईल तितक्या निष्ठुरपणें ती त्याच्या वर्तनावर टीकाच करीत आहे. सामाजिक परिस्थिति आमूलाग्र बदललेली असल्यामुळें आचारविचारांच्या बाबतींत पूर्वीइतका कडक सोंवळेपणा यापुढें राहूंच शकणार नाहीं हें मान्य करून, अनूनें अनिरुद्धाच्या विवाहपूर्व दुर्वर्तनाकडे दुर्लक्ष कां करावयाचें ठरविलें हें आपण समजूं शकतो. इतका विचारांचा उदारपणा नवीन लोक दाखवतील यांत शंका नाहीं. पण जुन्या लोकांपैकींहि कांहीं लोक हें करावयास तयार होतीलसें वाटतें.

परंतु ' दुहेरी जीवन ' या कादंबरींतील साराच मामला निराळा आहे. 'अनिरुद्धाची सुधारून वाढविलेली आवृत्ति' असें ज्याचें यथार्थ वर्णन करितां येईल असा या कादंबरीचा नायक मुकुंद सुलोचनेसारख्या सुशिक्षित व सुसंस्कृत स्त्रीबरोबर विवाह झाल्यानंतर जें ' दशकुमारचरित ' नव्यानें करून दाखवितो त्याची तरफदारी स्वतः सुलोचनाच करीत आहे. या ठिकाणीं मुकुंदाच्या विवाहपूर्व आयुष्यांतील प्रमादांचा प्रश्नच उद्भवत नाहीं. त्याच्या हातून जें कांहीं अद्‌भुत चरित्र घडलें आहे तें सारें विवाहोत्तर आहे. पतीच्या विवाहोत्तर स्वैराचाराला नाखुषीनें बळेंच मान्यता देण्याचा प्रसंग स्त्रियांवर अनेक वेळां येतो हें आपणांस ठाऊक आहे. अशी मान्यता त्यांनीं दिली नाहीं तर त्यांचें जीवन आहे त्यापेक्षां अधिकच भीषण होतें असा नेहमींचा अनुभव आहे. पण, अशा प्रकारचें जीवन घालविणाऱ्या स्त्रिया आपल्या नशिबाला दोष देऊन आपलें वैराग आयुष्य कसेंतरी घालवीत असतात याबद्दल कोणाहि सहृदय माणसाला केव्हांहि सहानुभूतीच वाटली पाहिजे. आणि याच कारणामुळें अनूविषयीं आपणास सहानुभूति वाटली तर त्यांत अस्वाभाविक असें काहींच नाहीं. सुलोचनेच्या दुर्दैवी जीवनाविषयींहि सहानुभूति वाटावयास हरकत नव्हती. पण, मुकुंदाच्या विवाहोत्तर स्वैराचाराची प्रत्यक्ष माहिती मिळूनहि ती त्या स्वैराचाराबद्दल त्याला दोष तर देत नाहींच. उलट, अगदीं निःसंदिग्ध शब्दांत त्याची तरफदारी करते आणि त्याचा अपराध सौम्य दिसावा, किंबहुना क्षम्य ठरावा अशीहि खटपट करते. हा साराच प्रकार सामान्य माणसाच्या आकलनाच्या पलिकडचा आहे यांत शंका नाहीं. आणि म्हणूनच

मुकुंद ही ज्याप्रमाणें अनिरुद्धाची सुधारून वाढविलेली आवृत्ति आहे त्याचप्रमाणें सुलोचना ही अनूची सुधारून वाढविलेली आवृत्ति आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. अनिरुद्धाला ज्या गोष्टी करण्याचा धीर नव्हता त्या मुकुंदानें लीलेनें करून दाखविल्या आहेत. आणि स्वैराचाराचें समर्थन करण्याचा जो धीर अनूला झाला नव्हता तो सुलोचनेला झाला आहे असें दिसून येईल.

चालू युगमानाचा महिमाच असा आहे कीं, सुशिक्षितांच्या संसारांत कोणत्या ना कोणत्या तरी कारणानें वैवाहिक असंतोष थोड्याफार प्रमाणांत रहाणारच. सुशिक्षित आणि पुढारलेल्या समाजांत स्त्रीपुरुषांची सलगी अनेक कारणामुळें दिवसेंदिवस वाढतच चाललेली दिसून येईल. विवाहित पुरुषाचा अविवाहित स्त्रियांशीं अनेक प्रसंगीं निकट सहवास होत असतो हें स्पष्ट दिसत आहे. निकट सहवासाचे परिणाम विवाहित स्त्रीलाच जास्त भोंवतात हेंहि अगदीं खरें. बाऱ्या भ्रमरवृत्ति असलेला विवाहित पुरुष सहवासवशात् दुसऱ्या एखाद्या अविवाहित तरुण स्त्रीकडे आकृष्ट होऊं शकतो. याला प्रेम म्हणा किंवा मोह ह्मणा अथवा वासना म्हणा. वस्तुस्थिति अशी आहे खरी. आणि यामुळेंच, अलिकडच्या बऱ्याच मराठी कादंबऱ्या या वैवाहिक असंतोषावर व पुरुषाच्या दुसऱ्या अथवा तिसऱ्या प्रेमावर आधारलेल्या आहेत असें दिसून येईल. सुशिक्षितांच्या संसारांत नव्यानें उद्भवणाऱ्या या निकडीच्या प्रश्नांकडे डोळेझाक करणें हें घातक आहे यांत शंका नाहीं. किंबहुना, जाणत्या लेखकानें या प्रश्नांचा सर्वांगीण विचार करून व्यावहारिक दृष्टीनें उपयुक्त अशीं जर उत्तरें दिलीं तर तीं हवींच आहेत. नवऱ्याच्या बहुरंगी, बहुढंगी, चवचाल प्रेमामुळें सुशिक्षित विवाहित स्त्रीला ज्या मानसिक यातना भोगाव्या लागतात त्या अपरिहार्य समजून त्यांकडे दुर्लक्ष करणें व पुरुषाच्या प्रत्येक नवीन 'प्रेमा'चें रसभरित वर्णन करण्यांत समाधान मानणें या दोन गोष्टींत कादंबरीकारानें आतांपर्यंत आपलें मन गुतवून ठेवलेलें आहे असें दिसतें. या प्रश्नाचें विश्लेषण करून त्यांपासून उत्पन्न होणाऱ्या अडचणींवर कांहीं तोडगा सुचविण्याचें धाडस कादंबरीकाराला अजून करवत नाहीं हें कबूल केलें पाहिजे. तोडगा नाहीं सुचविला तरी चालेल. पण, सुशिक्षित पुरुषाच्या हातून विवाहानंतरहि

जो अनाचार घडतो त्याचें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष समर्थन तरी कोणी करूं नये. आधुनिक सुशिक्षितांच्या मेळाव्यांत उत्पन्न होणाऱ्या वैवाहिक असंतोषाचें केवळ तिऱ्हाइतपणें वर्णन करण्यात माडखोलकरांना समाधान वाटत नसावें असें निदान ' दुहेरी जीवन ' या कादंबरीपुरतें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं. वैवाहिक असंतोषाचें अकारण अवडंबर माजवून येन केन प्रकारेण त्याला वाचा फोडणारे लोक जगांत नसतात असें नाहीं. पण, अशा प्रकारें खोट्याच असंतोषाचें निमित्त पुढें करून आपल्या रंगेल, विलासी किंबहुना व्यभिचारी वृत्तीवर जोंपर्यंत ते पांघरूण घालीत नाहींत व आपल्या वृत्तीचें शास्त्रीय समर्थन करीत नाहींत तोंपर्यंत त्यांच्या अनावर भोगलोलुपतेकडे दुर्लक्ष करावयास हरकत नाहीं. परंतु, कादंबरींतील पात्रें ज्यावेळीं आपल्या अथवा इतरांच्या व्यभिचाराचें नुसतेंच प्रदर्शन न करितां त्याचें प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष समर्थन करण्यांत बुद्धि वेंचतात त्यावेळीं त्या पात्रांचा निर्माता जो कादंबरीकार तो स्वःचे विचार त्या पात्रांच्या तोंडून वदवीत आहे कीं काय असा संशय आल्यावाचून रहात नाहीं. आणि याच दृष्टीनें ' दुहेरी जीवन ' या कादंबरींतील वैवाहिक असंतोषाचें स्वरूप आपणास आता पहावयाचें आहे.

प्रस्तुत कादंबरींतील सुशिक्षित व सुसंस्कृत नायक मुकुंद विवाहापूर्वी व सुलोचनेशीं विवाह झाल्यानंतर किती प्रकारचे रंग उधळतो याचें मोठें रसपूर्ण वर्णन माडखोलकरांनीं केलें आहे. विवाहापूर्वी तो एका पारशी ' फ्लॅपर ' च्या मागें लागतो व नाना रंगढंग करून ती ' पद्मपत्रमिवाम्भसा ' पूर्णपणें अलिप्त राहून त्याच्याशीं लग्न करण्याचें नाकारते. हें मुकुंदाचें पहिलें प्रेम. पहिल्या प्रेमाची महति " तरुण वेर्टरचीं दुःखें " वेशीवर टांगणाऱ्या प्रतिभासंपन्न लेखकापासून तों तहत माधव मनोहरांपर्यंत सर्वांनीं मुक्तहस्तानें वर्णिली आहे हें कोणास ठाऊक नाहीं ? मुकुंदहि पहिल्या प्रेमाच्या नाशानें तळमळत असतां हेलन फर्नांडीस या ' सक्तीनें कौमार्य पतकरलेल्या ' तरुणीशीं सलगी वाढवूं लागला—अथवा ती सलगी आपोआप वाढत गेली. " तिला आणि मला न कळत आमचा हा स्नेह इतक्या जलद वाढत गेला कीं, रोज एकमेकांना भेटल्याशिवाय चैन पडेनासं झालं आम्हाला " ( पृ. ६५ ). पहिलें वहिलें प्रेम अचानक खंडित

झाल्यामुळें 'स्त्रीसुलभ' (मला वाटतें, माडखोलकरांनीं हा शब्द susceptible या इंग्रजी शब्दाला पर्याय म्हणून वापरला असावा.) मुकुंदाला पुन्हा एकदा प्रेमपाशांत पडणें आवश्यक वाटलें यांत काय विलक्षण आहे ? खरोखरच, कांहींहि नाहीं ! कोणताहि 'नॉर्मल' मानव असेंच करील. परंतु, हाय ! हेलनचें लग्न एका बुढ्ढ्या दंतवैद्याशीं होतें—अन् श्री. मुकुंद पुन्हां एकदा निराश होतात. त्याच्या निराशेबद्दलहि कांहीं तक्रार करण्याचें कारण नाहीं.

पण या निराशेच्या पोटीं मुकुंदामधील सुप्त डॉन् जुअन् जागा होण्याच्या पंथाला लागतो. डॉन् जुअन्ची ही प्राथमिक अवस्था पहा– "मी मनांत आणलें असतें, तर तिच्या लग्नानंतरहि आमचा प्रेमसंबंध–पण माझें मन आजच्या इतकें निर्ढावलें नव्हतें त्या वेळीं !"

याला श्री. मुकुंद 'भावजीवन' असें अभिधान देतात. मुकुंद नंतर सुलोचनेशीं विवाह करितो व ती त्याची कायदेशीर प्रणयिनी बनते. पण गंमत ही कीं, सुलोचनेच्या सहवासांत मुकुंद जें जीवन घालवितो त्याला तो 'भावजीवन' म्हणावयास तयार नाहीं. "सुलोचने, तुझ्या बुद्धिप्रधान व्यक्तित्वानें माझा सगळा संसार, माझें अलिकडलें सगळें जीवन व्यापलें आहे, यांत शंकाच नाहीं. पण माझ्या भावजीवनांत मात्र स्थान नाहीं तुला !" (पृ. ६१)

## 'भावजीवन'

मुकुंदाचें हें 'भावजीवन' म्हणजे काय गौडबंगाल आहे तें आतां पाहिलें पाहिजे. या भावजीवनाच्या मंथनातून श्री. माडखोलकरांच्या प्रेमविषयक तत्त्वज्ञानाचीं कांहीं रत्नेंहि गवसलीं जाण्याचा संभव आहे. हेलन फर्नांडिसच्या बाबतींत वंचना झाल्यानंतर मुकुंदाच्या कक्षेंत सुलोचना येते. तिची 'बौध्दिकता' त्याला आकर्षक वाटते व त्यामुळेंच त्याचें लक्ष तिच्याकडे जातें. कांतेप्रमाणेंच ही सुलोचना बौध्दिक तेजानें तळपणारी, गंभीर, मितभाषी व शालीन स्त्री आहे. सुलोचनेविषयींचें त्याचें आकर्षण वाढत गेलें तें संगीताच्या अभिरुचीमुळें. 'वायुलीनच्या आर्ततापूर्ण सुरांनीं' मुकुंदानें मानी सुलोचनेच्या हृदयांत प्रवेश करून घेतला.

कोणाला वाटेल, वैवाहिक जीवन यशस्वी व्हावयास सामान्यत: ज्या गुणांची अपेक्षा असते त्यांपैकीं बरेचसे गुण सुलोचनेच्या ठायीं असताना तिच्या सहवासांत त्याला ' भावजीवन ' कीं काय म्हणतात तें अनुभवाव-यास मिळालें असावें. नाहीं, याला ' भावजीवन ' म्हणत नाहींत ! याला ' प्रेम ' म्हणत नाहींत ! मुकुंदाचा हा सवाल ऐका– " पण या साऱ्या आकर्षणाला प्रेम म्हणतां येईल का ?......तिच्यामुळें मला स्वतःचा विसर कधींहि झाला नाहीं.... अर्थात् मी प्रणय म्हणूं शकत नाहीं त्याला. " पण पतीला प्रणयोन्मत्त करणें जरी सुलोचनेला कधींच जमलें नाहीं तरी " माझे जीवन यशस्वी व्हावयाला, नेतृत्वाला पोषक अशा माझ्या गुणांचा विकास व्हावयाला तिचें तें संयत आणि समंजस सहजीवनच खरोखरी कारण झालेलें नाहीं कां ? " अशी स्पष्ट कबुली देणें त्याला भाग पडतेंच.

मग प्रश्न असा कीं, सुलोचनेसारखी पत्नी प्राप्त होऊनहि मुकुंद तिला उघड उघड फसवून घराबाहेर ' भावजीवन ' प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न कां करितो ? आणि या प्रश्नाचें उत्तर देण्यांत माडखोलकर स्वतःला गुंतवून बसले आहेत. सुलोचनेविषयीं स्वतःला जें कांहीं वाटतें त्याला मुकुंदरावांच्या मतें ' प्रेम ' ही संज्ञा प्राप्त होऊं शकत नाहीं. खरें प्रेम तें कीं, जें माणसाला उन्मत्त बनवितें व मर्यादेपलिकडे जावयास लावितें. ज्यामुळें अंगावर अविरत रोमांचाच्या लहरी उठूं शकत नाहींत तें कसलें प्रेम ? ज्यामुळें मनाची अवस्था वादळांत सापडलेल्या नौकेसारखी होत नाहीं तें प्रेम नव्हेच ! ज्यामुळें मनुष्य गोड स्वप्नमय ग्लानीत गुंगून जाऊं शकत नाहीं तें प्रेम या पदवीला पात्रच नाहीं. सुलोचनेनें असलें प्रेम मुकुंदाला कधींच दिलें नाहीं. आणि येणेंपरी ' भावजीवन ' लब्ध न झाल्यामुळें बिचारा नाइलाजास्तव ज्यायोगें ग्लानि येईल, गुंगी येईल, अंमल चढल्यासारखें होईल, धुंद झाल्यासारखें होईल, उन्माद चढल्यासारखें वाटेल, वादळांत सांपडलेल्या नौकेप्रमाणें वाटेल अशा खऱ्या, जातिवंत, रसरसलेल्या प्रेमाच्या मागें धाव घेण्याचें ठरवितो.

हें सारें मान्य. पण शंका अशी कीं, सुलोचनेचें जीवन मुख्यत: बौद्धिक आहे, तिच्यांत भावनांचा थयथयाट नसून एक प्रकारची गंभीर शांतता आहे हें चांगलें माहीत असून मुकुंदानें असल्या धीरप्रशांत प्रेयसीवर आरं-

मींच प्रेमाचा वर्षाव करून लग्नहि कां व कसें केलें? एकदा दिलेलें वचन पाळून कर्तव्य पार पाडण्याचा कांहीं हा प्रश्न नव्हता. बरें, तिच्यामुळें स्वतःच्या गुणांचा विकास झाला व ती स्वतःच्या नेतृत्वाला कारण झाली अशी तोच कबुली देतो. पण कोणत्याहि कारणामुळें असो, तो सुलो-चनेसारख्या बुद्धिप्रधान व सात्त्विक स्त्रीची प्रतारणा करून व्यभिचारी आयुष्य घालविण्यास उद्युक्त होतो व स्वतःचें पतित जीवन तिच्यापासून मोठ्या कसोशीनें लपवून ठेवितो. कौन्सिलमधील भाषणें तयार करण्याच्या कामीं स्वतःच्या पत्नीला मदत करणाऱ्या व बौद्धिक तेजाबरोबर कलेची आसक्ति बाळगणाऱ्या स्त्रीची प्रतारणा करणाऱ्या मनुष्याला कोणतें प्रेम हवें होतें हें समजणें फारसें कठीण नाहीं. सुलोचनेमुळें म्हणे त्याला मर्यादेच्या पलीकडे जातां येत नव्हतें, तिचें प्रेम म्हणे त्याला उन्मत्त करीत नव्हतें, तिचें प्रेम म्हणे त्याला धुंद करीत नव्हतें. शांपेन प्याल्याप्रमाणें मादक धुंदी ज्यामुळें उत्पन्न होईल तेंच खरें प्रेम अशी त्याची खऱ्या प्रेमाची व्याख्या आहे. सुस्वरूप व गुणी पत्नीच्या प्रेमांत कैफ आणणारा उन्माद नसल्या-मुळें गांवभवानीच्या फर्मास लावणीच्या साथींत पाघळणाऱ्या प्रेमांत धुंदी उत्पन्न करून घेण्याची लालसा बाळगणाऱ्या दौलतजाद्यात व मुकुंदरावा-सारख्या सुसंस्कृत अभिजात मनुष्यात फारसा फरक आहे असें वाटून घेण्याचें काहीच कारण नाहीं.

जर सुलोचनेंत कधींहि नष्ट न होणारे दुर्गुण असते, उच्च संस्कृतींत न शोभणारा रासवटपणा तिच्या अंगीं असता, पतीच्या जीवनाशीं समरस होण्याचें व त्याच्या गुणांची रसिकतेनें वाहवा करण्याचें सामर्थ्य तिच्यात मुळींच नसतें, रूपानें ती हीन असती, कलेशीं तिचें जन्मतः वैर असतें, किंवा ती स्वतःच चवचाल असती तर अन्य स्त्रीच्या मागें लागल्याबद्दल मुकुंदास फार थोडा दोष लागला असता. परंतु त्याची स्वतःची कबुली स्पष्ट आहे. सुलोचनेवरील त्याचें मन उडण्याचें कारण तिच्यामध्यें कैफ उत्पन्न करण्याचें सामर्थ्य नव्हतें हेंच एक होय. दुसरें कांहीं नाहीं. हीं अंमल, निशा, कैफ वगैरे प्रकरणें खरोखरीच गूढ आहेत यांत शंका नाहीं. बदफैली पुरुषानें आपल्या बदफैलीपणावर झांकण घालण्यासाठीं उपयोगांत आणलेली ही एक वल्गति आहे.

वस्तुस्थिति अशी आहे कीं, मुकुंदानें कितीहि प्रयत्न केला असता तरी जगांतील कोणत्याहि स्त्रीशीं तो फार काळ इमानी राहूंच शकला नसता. त्याच्या स्वभावाची घडणच अशी आहे. बिचाऱ्याचा त्याला खरोखरच काहीं इलाज नाहीं! कोणत्याहि उन्मादक स्त्रीपासून उत्पन्न झालेला कैफ त्याला फार वेळ धुंद करूं शकलाच नसता. द्राक्षासवाकडून शांपेनकडे वळणाऱ्या जीवाला असेंहि एखाद्यावेळीं दिसून येण्याचा संभव आहे कीं, ज्या कैफाची आवश्यकता आहे तो शांपेनमधून सुद्धां निर्माण होऊं शकत नाहीं. म्हणून शेवटीं आवलेल्या ताडीकडे जरूर तो कैफ उत्पन्न होण्यासाठीं धाव घेणें आवश्यक ठरलें तर तसें करावयास काय प्रत्यवाय असावा? कांहींच नसावा खरोखर! कैफ उत्पन्न झाला म्हणजे झालें. साधनांकडे पहाण्याचें काय कारण? असें कांहीं लोक जगात असतात कीं त्यांना परा-काष्ठेच्या सौंदर्यानें निथळणाऱ्या गुणवती स्त्रीच्या सहवासांनहि फार काळ गोडी वाटत नाहीं· त्यांना वैचित्र्य हवें असतें. या वैचित्र्याच्या लालसेनें ते एखाद्या सामान्य स्त्रीकडेसुद्धां आकृष्ट होतील—त्या स्त्रीच्या सहवासाचा कंटाळा आला कीं आणखी कुठें तरी जातील. त्यांच्या या रुचिवैचित्र्याला कांहीं विशेष आधार असतो असे मुळींच नाहीं. असे जे लोक असतात, त्यांच्याच कोटींतील मुकुंद आहे.

या चवचाल वृत्तीचें अप्रत्यक्ष समर्थन स्वतः मुकुंद पुढीलप्रमाणें करीत आहे— "निरनिराळया राजकारणी पुरुषाचा रोजचा जीवनक्रम मी बार-काईनें पहात होतो. त्यांचा सारा दिवस वेगवेगळ्या परिषदांच्या कामांतून वाटाघाटींत जावयाचा. पण रात्र झाली म्हणजे नृत्य, द्यूत, मदिरा आणि मदिराक्षी यांच्याशिवाय दुसरें काहीं सुचत नसे बहुतेकांना!" (पृ. ९७) आंतरराष्ट्रीय कीर्तीचे कर्तबगार लोक ज्यांप्रमाणें वागतात त्याप्रमाणें वाग-ण्याची लालसा बाळगणारा हा नरपुंगव जिनीव्हाच्या नृत्यमंदिरांत 'अनावृत अंगकांतीनें विद्युद्दीपांच्या प्रभेला लाजवितील' अशा लावण्यखनींच्या संगतींत थोरांच्या पावलावर पाऊल टाकून रात्र घालवितो. त्यानंतर ॲगाथा विल्बरफोर्स नामक एका पत्रपंडितेबरोबर तो खूप सलगी वाढवितो. तिच्या-बरोबर तो पॅरिसच्या जलमंदिरात विहार करावयास जातो. तेथें तो काय काय गमती करतो पहा— "त्या तलावाच्या पाण्यांत चारुतर दिसणाऱ्या

तिच्या गौर तन्वंगावर नजर ठरत नव्हती माझी! पाण्याखालीं ज्यावेळीं आम्ही बुडी मारली तेव्हां त्या संधीचा फायदा घेऊन तिला जवळ ओढली मीं आणि क्षणैक त्या उन्मादक स्थितींत राहून वर येता येतां विलग झालों आम्हीं!" (पृ. १०२) याला म्हणावें जलक्रीडा!

हें सारें आम्ही एकवेळ क्षम्य समजूं. पौरुषाचा अतिरेक झालेला हा पुरुष आहे असें समजून त्याला माफ करूं. कारण, या रंगेल कृत्यांत माणुसकीचा अभाव तरी दिसून येण्याचें कारण नाहीं. पण, सुसंस्कृततेला काळिमा फासणारें नीच कृत्य मुकुंद यानंतर करतो. तो नुसताच रंगेल व विलासी तरुण नसून सभ्यतेचा अभ्रा अडकविलेला समाजकंटक आहे हें सहज सिद्ध करिता येईल इतकें त्याचें हें कृत्य घाणेरडें आहे. कोणत्याहि सबबीवर त्याच्या नीच कृत्याचें समर्थन करतां यावयाचें नाहीं.

क्षमा देशपांडे नामक एका विधवा डॉक्टरणीशीं मुकुंदाचा परिचय होतो. ही स्त्री 'काळीसावळी, लांबट चेहऱ्याची आणि पाणीदार डोळ्यांची' (पृ. ११२) आहे. हेलन फर्नांडीसच्या बाबतींत मागें झालें होतें त्याचप्रमाणें याहि वेळीं झालें–"क्षमाचें आणि माझें साहचर्य झपाट्यानें वाढत गेलें" (पृ. ११७) आणि "क्षमाला दिवसांतून एकदां तरी भेटल्याशिवाय माझ्या मनाला उल्हास वाटत नसे हें समजून चुकलें होतें मला" (पृ. ११९). सदर क्षमा देशपांडेबरोबर मुकुंद जोडीनें भटकूं लागला. आणि नवरा क्लबांत जात असतो अशी बिचाऱ्या सुलोचनेची समजूत.

## पुन्हां एकदा प्रेमाची व्याख्या

मुकुंदाचें व क्षमेचें साहचर्य अगदीं झपाट्यानें वाढत गेलें. कारण काय, तर म्हणे दोघांचीं कार्यक्षेत्रें एकत्र होतीं, विचाराचे विषयहि एक होते आणि म्हणून मनेंहि एकरूप झालीं होतीं. पण या एकरूपतेला 'प्रेम' ही संज्ञा द्यावयास मात्र आपले डॉन् जुअन तयार नाहींत हें चिंत्य आहे. "पण ही एकरूपता, हें तादात्म्य म्हणजे प्रेम नव्हे असें मी बजावून सांगितलें माझ्या मनाला" (पृ. ११९). सुलोचनेमुळें मर्यादेपलीकडे जातां येत नव्हतें, उन्माद येत नव्हता, कैफ चढत नव्हता या (रास्त!) कारणांमुळें सुलोचनेविषयीं वाटणाऱ्या आकर्षणाला 'प्रेम' म्हणावयास मुकुंद

तयार नव्हता. आतां क्षमा देशपांडेविषयीं वाटणाऱ्या आकर्षणालाहि तो प्रेम म्हणावयास तयार नाहीं. खरोखर प्रेम हें अजब कोडें आहे यांत शंका नाहीं ! हा रसिकश्रेष्ठ लवकरच क्षमेशीं भरपूर शारीरिक सलगी वाढवितो. तो तिच्या अंगचटी जाण्याचा प्रयत्न करतो. तेव्हां तीच त्याला त्याच्या विवाहितपणाची तीव्र जाणीव करून देते. त्यावर मुकुंद म्हणतो,

"क्षमा, मला तुझ्याशिवाय राहणं अशक्य आहे आतां......तुझं साहचर्य कायमचं लाभण्यासाठीं वाटेल ती किंमत द्यायला तयार आहे मी" (पृ. १२१). 'कायमचं साहचर्य' या शब्दांचा अर्थ या रसिकराजांना कळत नाहीं. पण क्षमेला मात्र तो तावडतोब कळतो. 'कायमचं साहचर्य' म्हणजे त्याच्या पहिल्या संसाराचा विध्वंस हें तिला समजतें. पण यावर मुकुंदाचें उत्तर ठरलेंच होतें–"तिला (पत्नीला) सोडण्याची माझी इच्छा नाहीं न् तूहि हवी आहेस मला. सुलू माझ्या आयुष्यांतून निघून गेल्याशिवाय तू लाभणार नाहींस मला असं समजू का मीं !" बिचारी क्षमा या रोखठोक सवालावर काय बोलणार ? तरी ती म्हणतेच–"त्यांना (सुलोचनेला) अंधारात ठेवण्याच बेत आहे तुमचा ?" खऱ्या जातिवंत, अभिजात प्रेमाचे पुजारी यावर (प्रामाणिकपणें व निर्भयपणें) उत्तरतात– "काय हरकत आहे ? आपण सावधगिरीनें वागलों तर कांहींहि कळणार नाहीं तिला." (पृ. १२२) आहे यावर कांहीं म्हणणें कोणाचें ? 'सावधगिरीनें' वागून शेवटीं हे परमहंस नानाप्रकारच्या गुलजार थापा मारीत कडेलोट करतात अगदीं. तो रात्रीं तिच्याकडे झोपतो व दुसऱ्या दिवशीं बायकोला वाटेल त्या थापा मारतो. त्या उत्तरानें तिचें समाधान झालें कीं नाहीं याचीहि तो फिकिर करीत नाहीं. क्षमा देशपांडे वारंवार त्याला सूचना देत असते– "हा मोह एक दिवस घात करणार आहे आपल्या दोघांचा." या सूचनेवर मुकुंद म्हणतो–" घात काय करणार ? तसाच प्रसंग आला तर मी सरळ मोकळा होईन तुझ्याशीं लग्न करून" (पृ. १२४). हा 'तसाच प्रसंग' लवकरच प्राप्त होतो–क्षमा गरोदर राहते; व त्या भीषण स्थितीची तिनें जाणीव करून देतांच हा मुक्तात्मा अगदीं निर्विकार राहून तिला गर्भपाताचा सोपा अन् सरळ सल्ला देतो. 'रीसरेक्शन्' मधील नायक ज्याप्रमाणें कॅटुशावर बलात्कार केल्यानंतर तिच्या हातावर पैसे ठेवतो त्याप्र-

माणें हा 'आंतरराष्ट्रीय' कर्तबगार पुढाऱ्यांच्या पावलावर पाऊल ठेऊन चालणारा डॉन् जुअन् क्षमेच्या हातावर पाच हजारांचा चेक ठेवतो. ती त्याला त्याच्या वचनाची आठवण करून देते व लग्न करण्याची त्याला गळ घालते. अभिजात प्रेमाचा माग काढीत भटकणारा हा ध्येयात्मा तिला शांतपणें म्हणतो– "त्यावेळीं भावनेच्या भरांत मी कांहींहि बोललों, तरी त्याप्रमाणें आज वागण्याची हिंमत नाहीं माझी!" (पृ. १४५)

## दुराचाराचें साक्षात् समर्थन

येवढा भीषण प्रकार झाल्यानंतरहि हा गृहस्थ पराकाष्ठेच्या निर्लज्जपणाचा अंगीकार करून स्वतःच्या तत्त्वज्ञानाचें कसें समर्थन करीत आहे पहा— "क्षमा, मी तुझ्याशीं लग्न करण्याचें नाकारून तुला तोंडघशी पाडलें असेन. पण म्हणून कांहीं तुझ्यावरलं प्रेम लटकं नव्हतं किंवा त्याची किंमत कमी होत नाहीं" (पृ. १४६). भयंकर बेरडपणा केल्यानंतरहि आपल्या नीच भोगलालसेला प्रेम हें अभिधान देऊन त्या भोगलालसेची तरफदारी करणारा हा गृहस्थ 'मानवराक्षस' आहे शुद्ध! गडकऱ्यांच्या भाषेंत बोलावयाचें तर अशा प्रेमिकाला 'बाजाराच्या चवाट्यावर चाबकानें चोपून काढलें' तरच अभिजात प्रेमाचा त्याला संपूर्ण साक्षात्कार होईल!

यावर कोणी म्हणतील—"अहो, सत्यसृष्टींत अशीं माणसें निश्चित आहेत. त्यापैकीं एकाचें चरित्र माडखोलकरांनीं रंगविलें यांत काय बिघडलें?" खुद्द माडखोलकरहि आपल्या परिचयाच्या कोणा व्यक्तीकडे बोट दाखवतील व म्हणतील—"तो पहा सत्यसृष्टींतील मुकुंद. याच्यावरूनच मी माझी रेखा निर्मिली." सकृद्दर्शनीं हा युक्तिवाद बिनतोड वाटेल यांत शंका नाहीं. पण त्यातील हेत्वाभास स्पष्ट करून दाखविणें आवश्यक आहे. सत्यसृष्टीतील व्यक्तीचें यथातथ्य चित्र कादंबरींत वा नाटकांत काढलें असतां चालेल एक वेळ. वाङ्मयांत वाटेल त्या प्रकारचे हीन, नीच, हलकट लोक यावेत; काहीं हरकत नाहीं. इयागो, लेडी मॅक्बेथ, क्लॉडिअस यांसारखीं नीच पात्रें रंगविलीं म्हणून शेक्सपियरला कोणी दोष देत बसत नाहीं. जगांत इतकीं भयंकर माणसें आहेत याबद्दल कोणाचाच वाद नाहीं. वाद आहे तो निराळाच आहे. आपण निर्मिलेल्या नीच पात्रांविषयीं सहानुभूतीचा

लेशहि वाचकाला वाटणार नाहीं अशी खबरदारी कादंबरीकाराला किंवा नाटककाराला अवश्य घ्यावी लागते. नीच पात्रांविषयीं पराकाष्ठेची घृणा उत्पन्न व्हावी अशीच मुळीं त्याची घडपड असावी लागते. नीच कृत्याचीं एखाद्या पात्राकरवीं तरफदारी केली म्हणजेच लेखकाच्या हेतूच्या शुद्धतेविषयीं शंका येऊं लागते. उदाहरणार्थ, वर मुकुंद क्षमेच्या बाबतींतील स्वतःच्या हलकट वर्तणुकीची जी तरफदारी करतो ती विचारात घेण्यासारखी आहे. " तुझ्यावरलें प्रेम लटकें नव्हतें किंवा त्याची किंमतहि कमी होत नाहीं " हें वाक्य मुकुंद स्वतःशींच बोलत आहे. असें क्षमेला सांगावें असें त्याला मनांतून वाटतें. स्वतःच्या अधोगामी व व्यभिचारी स्वभावाची भरपूर जाणीव असलेला मुकुंद क्षमेला गर्भपाताचा सल्ला दिल्यानंतर स्वतःच्या कृत्याची अशी तरफदारी करीत असतांना पाहून मन उद्वेगानें भरून जातें. शेवटींहि तो म्हणतो—" मी कांहीं एकटाच हिणकस नाहीं या दुनियेंत. " आपल्या व्यभिचारी वृत्तीवर पांघरूण घालून त्याचें समर्थन या गृहस्थानें न कचरतां केलें आहे. आणि या समर्थनावरच माझा खरा खरा रोष आहे.

यावर आणखी कोणी म्हणतील—" अहो, कादंबरींतलें पात्र ज्या पद्धतीनें वागेल अथवा बोलेल त्या पद्धतीला कादंबरीकार जबाबदार कसा ? कादंबरीकार पात्राच्या मुखानें बोलतो असें मुळींच नाहीं. " हा आक्षेपहि सामान्य आहे. वाङ्मय हें जर जीवनाचें प्रतिबिंब असावें असें म्हटलें जातें तर तें जीवन लेखक अगदीं तिऱ्हाईतपणें वर्णू शकेल हें शक्य वाटत नाहीं. आणि क्षणभर तशी कल्पना केली तरी माडखोलकरांनीं कोणत्या प्रकारचें हें भाष्य लिहिलें जीवनावर ? संसारांत कोणतेंच सुख नसल्यामुळें खिन्नतेची परिसीमा झाल्यानें सुखाच्या किरणाकडे आशेनें धावणाऱ्या दुर्दैवी मनुष्याचें चित्र केव्हांहि सहानुभूति उत्पन्न करितें. पण अथपासून इतिपर्यंत कांहींहि दृश्य कारण नसतां नीचपणानें वागणाऱ्या व्यभिचारी माणसाचें चित्र केवळ सत्यसृष्टींत अशीं माणसें असतात या एकाच सबबीवर काढणें कितपत युक्त आहे ? बरें, अशीं चित्रें काढलीं तरी तीं त्याज्य म्हणून दुर्लक्षित असावीं अशी भावना वाचकांच्या मनात निर्माण करणें हें लेखकाचें आद्य कर्तव्य आहे, कीं पात्रांच्या नीच कृत्यांचें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष समर्थन त्यांच्याकडून करवून त्यांच्या त्या नीच कृत्यांविषयीं

वाचकांची सहानुभूति मिळविणें हें त्याचें कर्तव्य आहे ! नुसतीं भीषण पात्रें रंगविणें निराळें व त्या पात्रांच्या कृत्याचें समर्थन करणें निराळें.

मुकुंदापेक्षाहि अधिक नीच व व्यभिचारी माणसें जगात आहेत हें कोण नाकबूल करील ? पण त्यांनीं स्वतःचें समर्थन करण्याच्या भानगडींत पडूं नये. समर्थन करावयाचें तर त्या समर्थनाला सयुक्तिक कारणें तरी द्यावयास नकोत काय ? ज्याच्यामध्यें काहींएक कारण नसतां नीचपणाचा प्रकर्ष झालेला आहे असा व्यभिचारी मनुष्य आपल्या व्यभिचाराचें समर्थन करूं लागला तर त्याला मूर्ख म्हणावें कीं पैजारा माराव्या ?

बर्नार्ड शॉच्या ' मिसेस वॉरन्स प्रोफेशन् ' या एका काळीं सेन्सॉरच्या तावडींत सांपडलेल्या प्रख्यात नाटकांतील मिसेस वॉरन् आपल्या धंद्याचें समर्थन करिते याबद्दल फार लोकांचा शॉवर भयंकर संताप झाला होता हें कोणास माहीत नाहीं ? पण मिसेस वॉरन्‌ला आपलें समर्थन करतां येण्याजोगें सबळ कारण आहे हें अमान्य करण्यात अर्थ नाहीं. कुंटणखाना चालविण्याच्या आपल्या कृत्याचें समर्थन करिताना मिसेस वॉरन् म्हणते—

" How could you keep your self-respect in such starvation and slavery ? And what's a woman worth ? What's life worth ? Without self-respect !.........Scrubbing floors for one and sixpence a day, and nothing to look forward to but the work house infirmary. "

मिसेस वॉरनच्या तोंडून स्वतः शॉ तिच्या हलकट धंद्याचें समर्थन करीत असल्याचें स्पष्ट दिसतें. पण शॉचें समर्थन करितांना फ्रँक हॅरिस म्हणतो—

" Indeed, he emphasises that the very people and conditions that demand virtue and chastity compel the girls and women to sell themselves either into marriage or brothels. "

माडखोलकरांना मुकुंदाच्या व्यभिचारी आयुष्याचें समर्थन करण्यासारखें कांहीं तरी कारण आहे काय ? अगदीं अकारण उत्पन्न झालेल्या व्यभिचाराचें समर्थन ते कसें करूं शकणार ? पण तेंहि त्यांनीं केलें आहे.

मुकुंदाच्या शब्दांवर कोणाचा विश्वास नसेल तर त्याच्या आत्मनिवेदनाची

त्याच्या स्वतःच्या पत्नीनें——सुलोचनेनें——'पूर्तता' केली आहे ती वाचावी. या पूर्ततेंत कोणतीहि स्वाभिमानी, तेजस्वी, बुद्धिप्रधान व सुसंस्कृत स्त्री जें कधींच लिहिणार नाहीं तें माडखोलकरांनीं सुलोचनेला लिहावयास लावून मुकुंदाच्या नीच, व व्यभिचारी जीवनाची प्रत्यक्ष तरफदारी केली आहे. आपल्या पतीच्या निंद्य जीवनाचा पाढा अगदीं त्याच्याच शब्दांत वाचूनहि ही बुद्धिप्रधान व तेजस्वी स्त्री लिहिते—" उलट त्यांच्याविषयीं सहानुभूति वाटली.........मी त्यांच्या विश्वासाला पात्र झालें नाहीं हा माझा दोष, माझाच उणेपणा; त्यांचा नव्हे." येवढी नादी झाल्यावर पुढें ती म्हणते——" त्यांचे ते अनेक प्रेमसंबंध—मला त्याबद्दलहि कांहीं म्हणायचं नाहीं. प्रौढ विवाहाच्या या काळांत ...... अनाघ्रात पुष्पांची अपेक्षा करणं असमंजसपणाचं नाहीं कां ठरणार ? " मुकुंदाशीं सुलोचनेचें लग्न होण्यापूर्वी त्याचे जे अनेक प्रेमसंबंध असतील त्याबद्दल तिनें त्याला क्षमा केली तर त्यांत कांहीं वावगें नाहीं;—पण पत्नी जिवंत असतां तिला फसवून जो एका विधवेला गरोदर करण्याचें पौरुष गाजवितो त्याच्याबद्दल कांहींच राग न येणाऱ्या सुलोचनेला कांहीं मानवी मनोविकार आहेत कीं नाहींत याचीच शंका वाटूं लागते. याहिपेक्षां भयंकर समर्थन पुढेंच आहे—" त्यांच्या वर्तनांत असली, तर फक्त दुर्बलता आहे, तत्वभ्रष्टता मला तरी कुठं दिसली नाहीं." काय म्हणावें या बाईला ! मुकुंद क्षमेला फसवितो व ती गरोदर होते. यानंतर स्वतःस गर्भपाताचा सल्ला देणाऱ्या मुकुंदाचें जीवन हिणकस आहे असें क्षमा म्हणते याबद्दलहि सुलोचनेचा घुस्सा आहे. " क्षमाबाईनीं त्यांना हिणकस म्हटलं आहे पण तेंहि खरं नाहीं. " एका विधवा स्त्रीच्या शोकपूर्ण किंकाळ्यांनीं जिच्या आंतड्याला पीळ पडत नाहीं व जी नवऱ्याचाच पाठपुरावा स्पष्ट शब्दांत करते तिची गणना कोणत्या कोटींत करावी ? आणखी गंमत पहा——" त्यांचें हें निवेदन वाचून मला माझ्या अपुरेपणाची, कोत्या दृष्टीची जाणीव झाली...... त्या निवेदनांत पराकाष्ठेचा प्रांजळपणा व मानवतेचें मर्म आहे. " चैनीसाठीं व्यभिचार हेंच जर 'मानवतेचें मर्म' असेल तर लॉर्ड बायरन्च्या आयुष्यांत पराकाष्ठेचें मानवतेचें मर्म आहे असें म्हणणें भाग पडेल; व चैनीसाठीं कुंटणखाने चालविणाऱ्या मिसेस् वॉरनच्या

जोडीदारामध्यें—सर जार्ज क्रॉफ्ट्समध्यें—तर त्याचा अतिरेक झाला आहे असें कबूल करावें लागेल.

तेव्हा वादाचा मुख्य मुद्दा असा—माडखोलकरांनीं व्यभिचाराची योग्य कारणमीमांसा करून मग त्याचें समर्थन करण्याचा प्रयत्न केला असता तर काहीं म्हणणें नव्हतें. पण एक लिंगपिसाट पुरुष निर्माण करून त्याच्या पिसाटपणाचें समर्थन प्रत्यक्ष त्याच्या सुशिक्षित पत्नीकडून करावयाचें हा माडखोलकराचा उपक्रम कांहीं और आहे यांत शंका नाहीं. अनीतीचें भरपूर वर्णन केलें तरी तें एकवेळ वास्तवतेच्या नांवाखालीं खपेल. टॉल्स्टॉयनें नाहीं कां कुंटणखान्याचें व वेश्याजीवनाचें वर्णन केलें? त्याच्या 'रिसरेक्शन्' मधील नायिका कुंटणखान्यांत शिरते. पण ती कां शिरते हें समजल्यावर तिच्याविषयीं कुणालाहि सहानुभूति वाटते. पण तिच्याप्रमाणें काहीं कारण आहे का मुकुंदाला? उगाच गंमत म्हणून व्यभिचार करावयाचा हेंच त्याचें ध्येय आहे. आणि या प्रकारच्या असमर्थनीय व्यभिचाराचें माडखोलकर समर्थन करीत आहेत. त्यांना त्यामध्यें 'मानवतेचें मर्म' दिसतें. धन्य आहे खरोखर!

कोणाला हें विवेचन फार तिखट वाटेल याची मला फार चांगली जाणीव आहे. पण माडखोलकरांना या बाबतींत स्वतःचें समर्थन करणें दुरापास्त आहे हें निश्चित. आतां हें कबूल करावयास हवें कीं, त्यांनीं मुकुंदाच्या व्यभिचारी जीवनाची निंदा कोणाकडून करविली असती तर असें तिखट लिहिणें कोणालाहि कठीण झालें असतें. पण आपल्या निवेदनाच्या अगदीं शेवटपर्यंत तो स्वतःचा पाठपुरावा करीत आहे व 'माझ्यासारखे अनेक हिणकस आहेत' असा आधार देऊन क्षमेवरील प्रेम लटकें नव्हतें याची ग्वाही देत आहे. येवढेंच नव्हे, तर त्याची पत्नीसुद्धां त्याच्या हीन वर्तणुकीला तत्त्वभ्रष्टता न म्हणतां साधा कमकुवतपणा म्हणते व त्याच्या त्या वर्तनांत स्वतःला 'मानवतेचें मर्म' दिसलें अशी स्पष्ट ग्वाही देते. यावरून काय अनुमान काढावें याचा वाचकांनींच निर्णय करावा.

# ६

## मुखवटे

'दुहेरी जीवन' या कादंबरींतील उन्मादक विलासी वातावरणांतून माडखोलकरांनीं पुन्हां राजकारणांत प्रवेश केला आहे. 'मुखवटे' ही कादंबरी नोव्हेंबर १९४० मध्यें प्रसिद्ध झाली. कादंबरी संपूर्णपणें राजकीय असली तरी रुक्ष राजकारणी घटनांनीं अथवा वादविवादांनीं तिला गांभीर्य येऊं नये यासाठीं रोज आणि मोहन या प्रणयी जोडप्याच्या विवाहपूर्व व विवाहोत्तर शृंगाराचीं कारंजींहि निर्माण करण्याची कादंबरीकारानें खबरदारी घेतलेली आहे. आणि यामुळें जडजंबाल राजकीय चर्चामुळें गुदमरून जाण्याइतपत मृदु असलेल्या आणि हळव्या वाचकाला बराचसा विरंगुळा मिळण्याची सोय झाली आहे.

'कांता' कादंबरींतील सर महादेव ठाकूर यांचा पुतण्या व कांतेचा पति प्रियदर्शन हा या राजकीय कादंबरीचा नायक आहे. मध्यप्रांतांत कॉंग्रेस मंत्रिमंडळ प्रथम स्थापन झाल्यानंतर साक्षात् घडलेल्या एक महत्वाच्या घटनेवरच प्रस्तुत कादंबरी बहुशीं आधारलेली आहे. बारीकसारीक तपशील कादंबरीकारानें 'प्रयोगाच्या सोयीसाठीं' जरा इकडे तिकडे केलें असलें तरी मुख्य घटना माडखोलकरांनीं कल्पित कथेचें अवगुंठन घालून मांडली आहे इतकेंच. कादंबरींतील प्रमुख व्यक्तींच्या तोंडावरील आवरणेंहि इतकीं झिरझिरीत आहेत कीं, वस्तुस्थितींतील अथवा प्रत्यक्षांतील कोणत्या राजकीय व्यक्तीसाठीं कादंबरींत लेखकानें कोणतें पात्र योजिलें आहे हें मध्यप्रांतांतील तत्कालीन राजकारणी घटनांची वरवर माहिती ज्याला आहे असा कोणीहि मनुष्य सहज सांगू शकेल. तात्पर्य असें कीं, १९३९ मध्यें मध्यप्रांतांत डॉ. खरे यांचें मंत्रिमंडळ सत्तारूढ असतां तेथील राजकारणांत ज्या घडामोडी झाल्या त्यांचा हा कादंबरीरूप इतिहास आहे. हा नुसता इतिहास असता तर इतिहासाच्या बाबतींत लेखकाला जे निर्बंध अत्यंत काटेकोरपणें पाळावे लागतात ते माडखोलकरांना अर्थातच पाळावे लागले असते. आणि माडखोलकरांना नेमकें हेंच नको आहे.

पात्रांनीं केलेल्या अनेक विधानांची जबाबदारी आपल्या शिरावर न घेतां त्या पात्रांवर टाकण्याची फार चांगली सोय कादंबरींत असते. पण त्या पात्रांकरवीं स्वत:चीं मतें कादंबरीकाराला अशा कांहीं कौशल्यानें सांगतां येतात व घटनाचा अर्थ आपल्याला योग्य वाटेल अशा रीतीनें करतां येतो कीं, त्याचा आशय तर वाचकाला तत्क्षणीं कळतो. पण ती कादंबरी असल्यामुळें, इतिहास नसल्यामुळें, त्याला कैचींत पकडून त्याचे दांत घशांत घालतां येत नाहींत. इतकी मोठी सोय कादंबरीमुळें होत असल्यामुळें तत्कालीन घटनांचा इतिहास लिहिण्याची माडखोलकरांना जरूर वाटली नाहीं यांत आश्चर्य नाहीं. इतिहासामुळें ओढवणारी जबाबदारी न पत्करतांच आपलें उद्दिष्ट कादंबरीमुळें त्यांनीं साधलें आहे. या प्रश्नाची चर्चा पुढें आपणांस करावयाची असल्यामुळें, अवघ्या सात वर्षांपूर्वीं घडलेल्या घटनांना माडखोलकरांनीं कादंबरीचें स्वरूप कसें दिलें आहे एवढेंच तूर्त पाहूं.

प्रियदर्शन हा मध्यप्रांतांतील कॉंग्रेस मंत्रिमंळांतील मुख्य प्रधान आहे. मध्यप्रांतांतील असेंब्लींत महाराष्ट्रीय गट आणि महाकोशलमधील हिंदी गट यांच्यामधील कलह असेंब्लीच्या बाहेर येऊं लागल्यामुळें प्रियदर्शनाच्या कामाविषयीं अनेक प्रकारचे विरोधी सूर समाजांत निघूं लागलेले आहेत. याचबरोबर कॉंग्रेस मंत्रिमंडळाला येन केन प्रकारेण त्रास देऊन त्याला आणि पर्यायानें प्रियदर्शनाला अडचणींत घालण्यासाठीं टपलेले ‘कागदी’ कम्युनिस्ट आणि त्याच्या नादीं लागलेले विठोबासारखे प्रामाणिक आणि एकनिष्ठ कम्युनिस्ट यांनीं प्रियदर्शनाच्या मार्गांत अनेक विघ्नें उत्पन्न केलेलीं आहेत. कामगारांची संघटना खऱ्या कळकळीनें करण्यासाठीं स्वत:च्या व कुटुंबाच्या हिताकडे संपूर्ण दुर्लक्ष करणारा विठोबा हा खरा कार्यकर्ता असल्यामुळें मंत्रिमंडळाला विनाकारण सतावण्याच्या विरुद्ध आहे; परंतु सविसाधू दांभिक कम्युनिस्टांची मात्र मंत्रिमंडळाला उपद्रव देण्याची शक्य तेवढी खटपट चालू आहे. कॉंग्रेस मंत्रिमंडळ अधिकारारूढ आहे तोंपर्यंतच कामगारांच्या हिताच्या गोष्टी घाईघाईनें पदरात पाडून घेण्याची अण्णासाहेब पुराणिकासारख्या नामधारी कम्युनिस्टांची धडपड चालू आहे. या कम्युनिस्टांची प्रियदर्शनाविरुद्ध फार मोठी तक्रार आहे. त्याचा कारभार निष्क्रिय असून कामगारांसाठीं त्यानें कांहींही केलें नाहीं, खरें लोकहित

करण्याची त्याची इच्छाच नाहीं असें त्यांचें म्हणणें आहे. प्रियदर्शन कामगारासाठीं कांहींही करीत नाहीं अशी सतत ओरड करणारा हा गृहस्थ स्वतःला समाजवादी म्हणवीत असे; पण याचा समाजवाद मोठा धूर्त व धोरणी होता. कोणताहि संप होताच जी रिलीफ कमीटी नेमली जात असे तिचें अध्यक्षपद बहुधा अण्णासाहेबांकडेच असे. आणि त्यामुळें त्यांना आपली सावकारी उत्कृष्ट तऱ्हेनें चालविता येत असे. असा हा कम्युनिस्ट आणि त्याच्याचप्रमाणें समाजवादाचा वरपागी देखावा करणारे त्याचे साथीदार कॉंग्रेस मंत्रिमंडळाविरूद्ध आणि व्यक्तिशः प्रियदर्शनाविरुद्ध जमेल तें कारस्थान करण्याचा विचार करीत आहेत. विठोबा हा प्रामाणिक कम्युनिस्ट असला तरी त्याच्या घरीं जमणाऱ्या लोकांमध्यें अनेक समाजकंटकाचाच भरणा आहे. एकमेकाचे खाजगी आचरण पूर्णपणें माहीत असल्यामुळें उखाळ्या पाखाळ्या काढण्याखेरीज दुसरें काहीं कार्य करतां येण्यासारखें आहे याचा त्यांना पत्ताच नव्हता. आणि तरीही गांधी व गांधीवाद या गोष्टींवर टीका करतांना त्यांची सारी प्रतिभा जागृत झालेली दिसत आहे. एकमेकांची टवाळी करणें व खाजगी गोष्टींची सार्वजनिक कुचाळी करणें हेंच या अड्डयांतील राजकारण आहे. काळ्यांचा 'पोटभरू शिवराळपणा,' मोहनच्या 'शेगावच्या वाऱ्या,' 'अण्णासाहेबाची 'मालगुजारी' इत्यादि गोष्टींची मनसोक्त टवाळी करणें एवढेंच राजकारण येथें चाललेलें आहे. या साऱ्या दांभिक पोटभरू लोकांत विठोबा हा एकच प्रामाणिक गृहस्थ आहे, आणि त्यालाच आपल्या प्रामाणिकपणाचें प्रायश्चित्त म्हणून कीं काय, अनेक प्रकारचीं संकटें सोसावीं लागतात. घरीं अन्नान्न दशा असतांना सर्वतोपरी हाल सोसून तत्त्वनिष्ठेपायीं स्वतःची व कुटुंबांतील मंडळींची धूळधाण करणारा हा प्रामाणिक, कष्टाळू आणि निष्कपटी विठोबा भोंवतालच्या दांभिक व खोट्या कार्यकर्त्यांत एकदम उठून दिसतो यांत शंका नाहीं. प्रियदर्शनाला खालीं ओढला पाहिजे या एकाच ध्येयानें बाकीचे सारे पोटभरू लोक एकमेकांशीं वरकरणी प्रेमळपणानें वागत आहेत. प्रियदर्शनाला आपल्या सचोटीचा फार अभिमान आहे हें त्यांना ठाऊक आहे. या अभिमानालाच ते घमेंड समजतात. उद्योगमंत्री पं. वाजपेयी व प्रियदर्शन यांचें फारसें सूत नाहीं या गोष्टीचा फायदा मोहन व अण्णासाहेब यांना घ्यावयाचा

आहे. कोठून तरी लोकमत प्रियदर्शनाच्या विरुद्ध करण्यासाठीं शेतकरी व कामगार यांच्या बाबतींत फार मोठया सुधारणा त्यानें एकदम करावयास पाहिजेत असा आग्रह धरावयाचा त्यांचा विचार आहे. आणि यासाठीं एक अनुकूलता त्याना दिसत आहे. दारूबंदीवर गांधींचा कटाक्ष असल्यामुळें तिच्यापायीं प्रांताच्या उत्पन्नात फार मोठी तूट येईल अशी मोहनची कल्पना आहे. उत्पन्नात इतकी तूट आली तर कामकऱ्यांच्या हिताचें कोणतेंही नवीन काम हातीं घेणें मंत्रिमंडळाला शक्य होणार नाहीं. या परिस्थितीचा फायदा घेऊन प्रियदर्शनाला धाकांत आणि दाबांत ठेवण्याचा मोहन आणि वर उल्लेखिलेले पोटभरू कम्युनिस्ट कार्यकर्ते यांचा डाव आहे. बाहेरचा असंतोष आणि मंत्रिमंडळांतील धुसफूस या दुहेरी आपत्तींत सांपडल्यानंतर स्वतःच्या इच्छेनें प्रियदर्शन कांहींहि करूं शकणार नाहीं अशी त्यांची खात्री आहे.

## प्रियदर्शनाची भूमिका

स्वतःच्या प्रामाणिकपणावर व सचोटीवर प्रियदर्शनाचा पूर्ण विश्वास आहे. पूर्वींचें कपटपूर्ण राजकारण निराळें आणि हें नवीन राजकारण निराळें अशी तो आपल्या मनाची समजूत करून घेत आहे. आपल्या विरुद्ध खुद्द आपले सहकारी व बाहेरचे लोक कारस्थानें करीत आहेत हें कळल्यानंतरहि तो मुळींच चलित होत नाहीं. " काँग्रेसचं राजकारण सत्यावर अधिष्ठित झालेलं आहे न बापूंचा जोंपर्यंत माझ्यावर विश्वास आहे तोंपर्यंत कोणा-चीही पर्वा करण्याची गरज नाहीं मला !—" आपण जोंपर्यंत प्रामाणिकपणें वागत आहोंत तोंपर्यंत गांधींचा आपल्याला पाठिंबाच मिळेल अशी खात्री असल्यामुळें तो अंतर्गत किंवा बाह्य विरोधाची फिकीर करीत नाहीं. अशी त्याची तडफदार भूमिका असल्यामुळें त्याच्या विरुद्ध कारस्थान रचून तें यशस्वी करणें मंत्रिमंडळांतील त्याच्या सहकाऱ्यांनासुद्धा अशक्य झालें आहे; पण आतांपर्यंत जी गोष्ट त्याच्या हितशत्रूंना व विरोधकांना साधली नव्हती ती साध्य होण्याचा योग अकल्पितपणें आला. सर महादेव ठाकुराचा आणि गव्हर्नरांचा जुना ऋणानुबंध. मुख्य प्रधान प्रियदर्शन हा सर महादेवांचा पुतण्या. यामुळें गव्हर्नर त्याला जेवणाचें आमंत्रण देतो. आणि, खाजगी

ऋणानुबंध लक्षांत घेऊन प्रियदर्शन तें आमंत्रण ताबडतोब स्वीकारतो. त्यानें हें आमंत्रण स्वीकारल्याची हकीकत मंत्रिमंडळातील त्याच्या सहकाऱ्यांशिवाय कोणालाहि माहीत नसतांना ती बाहेर फुटली. इतकेंच नव्हे तर, 'लोकहितां'त-सुद्धा ती छापून आली. मुख्य प्रधानानीं गव्हर्नराचें भोजनाचें आमंत्रण स्वीकारलें म्हणून असेंब्ली कॉंग्रेस पक्षातील कांहीं सदस्य खुद्द गांधींकडे तक्रार करणार आहेत अशी बातमी वर्तमानपत्रांत आली. ही बातमी त्याच्या कोणातरी सहकाऱ्याकडूनच फुटली असली पाहिजे अशी शंका घेण्यात आल्यावर प्रियदर्शन या बाबतींतली आपली भूमिका स्पष्ट करतो. त्याचें म्हणणें असें कीं, अगदीं वैयक्तिक नात्यानें गव्हर्नरानें आपल्याला आमंत्रण दिलें; आणि पूर्वीचा ऋणानुबंध लक्षात घेऊन त्याचा स्वीकार करणें भाग पडलें. हें करण्यापूर्वी सहकाऱ्यांचा सल्ला घेण्याची काहींच जरूर नव्हती असें त्याचें म्हणणें. आणि गांधींना लिहिलेल्या पत्रांतहि त्यानें हीच भूमिका स्पष्ट केली. खुद्द प्रांताध्यक्ष गुलाबचंद यांनीं गाधीजींकडे या बाबतींत तक्रार केली असें प्रियदर्शनाचें म्हणणें आहे.

प्रियदर्शनाविरुद्ध त्याचे सहकारी असलें कारस्थान का रचतात असा प्रश्न उत्पन्न होण्यासारखा आहे. प्रियदर्शनानेंच या प्रश्नाला उत्तरहि देऊन टाकलें आहे. नागपूर प्रांत एकजिनसी आणि एकभाषी नाहीं. ब्राह्मण-ब्राह्मणेतरवादाच्या जोडीला हिंदी-मराठी वाद येऊन बसल्यामुळें एका बाजूला महाराष्ट्रीय आणि दुसऱ्या बाजूला हिंदी असा प्रकार झाला. आणि प्रियदर्शन हा महाराष्ट्रीय असल्यामुळें त्याच्या विरुद्ध हिंदी कॉंग्रेस-वाल्यांचा रोष झाला आहे व त्याचें वर्चस्व त्यांना सहन होत नाहीं असें प्रियदर्शनाचें स्पष्टीकरण आहे. आपल्या मस्तकावरील मुकुट रत्नांचा नसून काटेरी आहे हें प्रियदर्शनाला अधिकारस्वीकारानंतर दोन महिन्याच्याआंतच कळून चुकतें. पण एकच मोह आणि एकच आकांक्षा त्याला अधिकार-पद सोडूं देत नाहींत. हातीं आलेल्या अधिकाराचा उपयोग करून "भावी पिढीला समर्थ बनवावं, हरिजनांना माणुसकीचे हक्क मिळवून द्यावेत, शेतकऱ्यांच्या डोईवरला भार थोडा कमी करावा आणि कामगारांना पोट-भर अन्न मिळण्याची सोय करावी" हीच त्याची आकांक्षा आहे. आणि यामुळेंच, इतका अंतर्गत कलह असतांना सुद्धां, त्याला अधिकार सोडवत

नाहीं. त्याच्या आणखीहि काहीं महत्त्वाकांक्षा आहेत. त्याला शाळाकॉलेजांतून लष्करी शिक्षण सक्तीचें करावयाचें आहे. हरिजनांना सर्व सार्वजनिक स्थळें मुक्तद्वार करावयाचीं आहेत. शेतसारा पंचवीस टक्यानीं कमी करावयाचा आहे. आणि सर्व प्रकारच्या कारखान्यांतील कामगाराचें जीवनवेतन निश्चित करावयाचें आहे. या सुधारणा आपल्या हातून शक्य तेवढ्या लवकर घडाव्यात यासाठीं अधिकारपद सोडावयाचें नाहीं असा त्याचा निश्चय आहे. हा निश्चय ज्या करारीपणानें तो करतो त्याच करारीपणानें गव्हर्नराकडे जेवावयास जाण्याचा निश्चय तो कायम करतो. पार्लमेंटरी कमिटीकडे तक्रार गेली आहे हें कळूनही तो आपला निश्चय बदलीत नाहीं. "राजाजींनीं मद्रासच्या गव्हर्नरबरोबर आगगाडींत लंच घेतला" या बातमीचा टीकाकाराना उत्तर देतांना प्रियदर्शनानें उपयोग करावा असें उमाकांतानें सुचवलें असता प्रियदर्शन म्हणतो, "आत्मसमर्थनाची असली पध्दतच मुळीं मला मान्य नाहीं! राजाजींकडे बोट दाखवून स्वतःचा बचाव करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं! मी जें केलं तें मला योग्य वाटलं म्हणूनच केलं हेंच माझं समर्थन!'—

मंत्रिमंडळातील या धुमफुशीला मागें म्हटल्याप्रमाणें एक महत्त्वाचें कारण होतें. प्रियदर्शनाचे सगळे सहकारी त्याच्यापेक्षां अधिक वयस्क आणि राजकीय डावपेचांत मुरलेले होते. त्याच्या नेतृत्वाखालीं काम करण्याचा प्रसंग आपल्यावर यावा याचें त्यांना वैषम्य वाटत असे. आणि हिंदी-मराठी वादामुळें त्या वैषम्याला कांहीं निराळीच धार आली होती. परंतु गेल्या कांहीं दिवसांत त्यांचे डावपेच हाणून पाडून प्रियदर्शनानें आपल्या मनांत योजिलेली प्रत्येक गोष्ट अत्यंत कणखरपणें तडीस नेली होती. त्याची सारी भिस्त स्वतःच्या चोख आणि निःस्वार्थी धोरणावर होती. शिवाय महात्माजींचा आपल्यावर लोभ आहे याचाही त्याला आधार वाटत असे.

गव्हर्नरचें आमंत्रण स्वीकारण्यांत प्रियदर्शनानें शिस्तभंग केला असे पं. वाजपेयी मंत्रिमंडळांतील प्रियदर्शनाचे महाराष्ट्रीय सहकारी उत्तमराव यांच्याजवळ बोलतात. उत्तमराव ही गोष्ट प्रियदर्शनाला फोनवरून कळवतात. परंतु गव्हर्नरचें आमंत्रण विचारपूर्वक स्वीकारलें असल्यामुळें त्याच्या परिणामाची सर्व जबाबदारी स्वीकारण्याचा प्रियदर्शनानें निश्चय केला आहे.

गव्हर्नरचें आमंत्रण ' खाजगी ' स्वरूपाचें असल्यामुळें तें स्वीकारावयास कांहींच हरकत नाहीं व ही गोष्ट पक्षाच्या अधिकारकक्षेंतच येत नाहीं असा त्याचा दावा आहे. " मी मुख्य प्रधान असलों, तरी मला कांहीं खाजगी स्नेहसंबंध, वैयक्तिक ऋणानुबंध आहेत कीं नाहींत ?...मला नाहीं वाटत माझं हें कृत्य पक्षाच्या अधिकारकक्षेंत येतें असं. " असें त्याचें समर्थन आहे. पं. वाजपेयींनीं स्वतःविरुद्ध कारस्थान रचलेलें आहे हें कळल्या-नंतरहि राष्ट्रसभा किंवा गांधीजी यांच्या बाबतींतील प्रियदर्शनाची श्रद्धा मुळींच कमी होत नाहीं. त्याचा गांधीजींवर दृढ विश्वास आहे. ' राष्ट्रस-भेच्या सत्याचं अधिष्ठान स्वत: बापू हे आहेत न् त्यांचं वर्तन हीच एक त्या सत्याची कसोटी समजली पाहिजे. '

कॉंग्रेस मंत्रिमंडळाला कांहीं तरी तकलीफ द्यावी यासाठीं नेहमीं तळ-मळणाऱ्या अण्णासाहेब पुराणिकांसारख्या संधिसाधु लोकांच्या हातीं हें एक नवीनच कोलित मिळालें आहे. याचा फायदा कसा घ्यावयाचा याचा ते सारखा विचार करीत आहेत. राजाजी गव्हर्नरबरोबर जेवले ते अगदीं अकल्पित रीतीनें; तो बेत पूर्वनियोजित नव्हता असें म्हणून अण्णासाहेब प्रियदर्शनानें गव्हर्नरकडे जेवणाचें आमंत्रण स्वीकारलें यावर पुढील भाष्य करीत आहेत, " आपल्याकडल्या या जेवणाला राजकीय स्वरूप न् महत्त्व आहे. " अण्णासाहेबांच्या म्हणण्याचा आशय असा कीं, राजाजींनीं गव्हर्नरा-बरोबर जेवण केलें याला कोणीहि महत्त्व दिलें नाहीं. परंतु प्रियदर्शनाला मात्र तसल्याच कृत्याबद्दल कॉंग्रेसश्रेष्ठींकडून जाब विचारला जाईल. मंत्रि-मंडळाला तकलीफ देण्याचा आणखी एक मार्ग अण्णासाहेबांना माहीत आहे. दारूबंदीच्या प्रयोगामुळें उत्पन्नांत फार मोठी तूट येणार हें नक्की असल्यामुळें पूर्वी कबूल केल्याप्रमाणें शेतसारा कमी करणें मंत्रिमंडळाला जमावयाचें नाहीं. आणि या गोष्टीचा फायदा घेऊन मंत्रिमंडळाविरुद्ध उठावणी करावयास पाहिजे असा अण्णासाहेबांचा आग्रह आहे. प्रियदर्श-नाची नागपुरांतील लोकप्रियता सहा महिन्याच्या आंतच नाहींशी करा-वयाची असा पं. वाजपेयींनीं चंग बांधला आहे अशी अण्णासाहेबांना खास बातमी मिळाली आहे. या कोलिताच्या जोरावर सारें रान पेटवून प्रियदर्श-नाला वठणीवर आणावयाचे विचार त्यांच्या राजकारणी मेंदूत थैमान

घालीत आहेत. अनेक व्यसनांत मुरलेला मोहनहि प्रांताध्यक्ष गुलाबचंदशेट यांच्या दांभिकपणावर टीका करतो व कॉंग्रेस मंत्रिमंडळ स्थापन झाल्यापासून ते निरनिराळ्या निमित्तांनीं भरपूर पैसा खात आहेत असें स्पष्टपणें बोलतो. इतकेंच नव्हे तर,नागपूर-वऱ्हाडांतल्या कॉंग्रेस कमिट्या महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्या हातातून निघून आपल्या लोकांच्या हातीं याव्यात अशी गुलाबचंदशेट जोरात खटपट करीत असल्याचाहि तो आरोप करतो.

ही सारीं कारस्थानें प्रियदर्शनाला पदच्युत करण्यासाठींच चाललेलीं होतीं हें अगदीं उघड आहे. प्रियदर्शन दारूबंदीला अनुकूल नव्हता. प्रथम शेतसारा कमी करावा असें त्याचें म्हणणें होतें. परंतु गांधीजींचें मत निराळें पडल्यामुळें त्याचा नाइलाज झाला. हिंदुस्थानांत दारू पिणारांचें प्रमाण शेंकडा वीससुद्धां नसतांना त्यांना व्यसनमुक्त करण्यासाठीं शेंकडा ऐंशीं शेतकऱ्यांच्या डोक्यांवरील जबर साऱ्याचें ओझें तसेंच कायम ठेवावयाचें हा भयंकर अन्याय आहे अशी उत्तमराव तक्रार करतात. तरीहि प्रियदर्शन मात्र अगदीं सरळपणें गांधींच्या तत्त्वज्ञानाचें समर्थनच करीत आहे असें पाहिल्यावर उत्तमराव उपरोधिकपणें म्हणतात, " मग बिचारा हिंदी शेतकरी हा शेगांवच्या प्रयोगशाळेंतील एक बेडूक आहे म्हणावयाचा !"

## गांधीजींवर टीकेचा कडाका

प्रियदर्शन गांधीवादाचें आपल्या परीनें समर्थन करीत असला तरी उत्तमराव अत्यंत कटु शब्दांत गांधी व गांधीवाद यांची मनमुराद हेटाळणी करीत आहेत. किंबहुना, असेंहि वाटतें कीं, त्यांच्या टीकेला धार यावी येवढ्यासाठींच प्रियदर्शनाला मधून मधून गांधी व त्यांचें तत्त्वज्ञान यांविषयीं एखाददुसरा बरा शब्द बोलावयास माडखोलकरांनीं लावलें असावें. 'सत्य' व 'अहिंसा' यांची कडक हजेरी उत्तमराव घेत आहेत. चालू कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या राजवटीपेक्षा जुनी, नोकरशाही राजवट काय वाईट होती असा प्रश्नहि ते तोंड भरून विचारीत आहेत. उत्तमराव स्वतःला 'टिळकांचा अनुयायी' म्हणवून घेत असल्यामुळें गांधी व गांधीवाद यांवर टीकेची झोड उठविण्याचा त्यांना खास अधिकार प्राप्त झाला आहे यांत शंका नाहीं ! गांधींच्या अनुयायांत सर्वत्र

ढोंगीपणा बोकाळला असल्यामुळें त्यांना त्यांच्या राजकारणाचा तिटकारा आला आहे. पण, उत्तमरावाची गांधीजींवरील व गांधीवादावरील टीका मुळांतूनच पाहिली पाहिजे. त्याखेरीज तिची खुमारी समजावयाची नाहीं. "टिळकांचा अनुयायी म्हणून मी राजकारणांत प्रवेश केला आणि त्यांचा अनुयायी म्हणूनच मीं आज राजकारणांत नांदतों आहे. गांधींचं तत्त्वज्ञान मला कधींच पटलं नाहीं; त्यांचं व्यक्तित्व मला कधीं आकर्षक वाटलं नाहीं. टिळकांच्याहि भोंवतीं मतलबी लोक होते; व त्यांचा उपयोगहि त्यांनीं करून घेतला. पण टिळकांनीं आपल्या वर्तनाला किंवा राजकारणाला भलभलत्या तत्त्वाचा मुलामा कधीं दिला नाहीं. उलट सत्य आणि अहिंसा याचा उठल्या सुटल्या जप करणाऱ्या गांधींच्या गोतावळयात आज जिकडे तिकडे ढोंगीपणा बोकाळलेला दिसतो. काँग्रेसच्या अंतःशुद्धीवर सदा न् कदा प्रवचन झोडणाऱ्या चळवळीचं अंतरंग इतकं हिडिस असावं हं !" (पृ. ११८) इतकें हृदयस्पर्शी भाषण केल्यावर राजेश्री उत्तमराव प्रियदर्शनाला विचारतात, "तुमचा विश्वास आहे या राज-कारणावर ?" या थिनतोड सवालावर प्रियदर्शन म्हणतो, "माझा विश्वास गांधींवर आहे! त्यांच्या राजकारणावर नाहीं!" गांधींच्या भोंवतालचे लोक, त्यांचे अगदीं पट्टशिष्यसुद्धां 'पाताळयंत्री' आणि 'मतलबी' आहेत असा त्याला गेल्या सात वर्षांत अनुभव आला असला तरी स्वतः गांधी वाईट ठरत नाहींत किंवा अविश्वसनीय ठरत नाहींत, गांधींच्या अत्युच्च भूमिकेवर इतरांना चढतां येत नाहीं हा कांहीं गांधींचा दोष नव्हे असें गांधींचें वैयक्तिक समर्थन प्रियदर्शन करीत आहे. प्रियदर्शनाचा गांधींच्या राजकारणावर अथवा त्यांच्या 'गोतावळया'वर विश्वास नसला तरी निदान त्यांच्या व्यक्तिमत्त्वाविषयीं तरी त्याला आदर वाटत असावा असें दिसतें. पण, उत्तमरावांना हें सुद्धां मंजूर नाहीं. खुद्द गांधींवरच त्यांचा सारा हल्ला आहे. गांधी स्वतःच ढोंगी आणि मतलबी आहेत असें त्यांचें स्पष्ट मत आहे. "ते आपल्या तत्त्वांप्रमाणें वागतात असं जें तुम्ही म्हणतां तेंहि मला पटत नाहीं. स्वतःच्या पट्टशिष्यांच्या विसंगत किंवा मतलबी वर्तनावर जो पांघरूण घालतो तो सत्याचरणी कसला ? स्वतः पाप करणं आणि स्वतः निष्पाप राहून दुसऱ्यांच्या पापावर फक्त पांघरूण

घालणं यांत व्यवहाराच्या दृष्टीनं फरक करतां येण्यासारखा असला, तरी शुद्ध नैतिक दृष्टीनं हीं दोन्हीं कृत्यं सारखींच निंद्य ठरतात.'' गांधींच्या आचरणांतील ही विसंगति प्रियदर्शनाला पुरतेपणी समजली नसेल असें वाटूनच कीं काय, उत्तमराव पुढें म्हणतात, “ त्याचं तें सत्य आणि अहिंसा हे निव्वळ मुखवटे आहेत.'' उत्तमरावांच्या या असंदिग्ध विधानावर आक्षेप उत्पन्न झाल्याखेरीज त्याची धार बाधक होणें शक्य नाहीं हें माडखोलकरांना चांगलें माहीत असल्यामुळें ते प्रियदर्शनाला पुढीलप्रमाणें बोलावयास लावीत आहेत. “ त्याच्या विसंगति किंवा त्यांची स्खलनं पाहून त्यांच्याविषयीं मत बनवूं नका.'' प्रियदर्शनाचें हें विधान मोठें मार्मिक आहे यांत शंका नाहीं. गांधींची बाजू घेण्याच्या मिषानें उत्तमरावाच्या बोलण्यावर आक्षेप घेत असतां गांधींच्या ‘ विसंगति ’ आणि त्यांचीं ‘ स्खलनें ’ या गोष्टींचा त्यानें मोठ्या कौशल्यानें बभ्रा केला आहे. प्रत्यक्ष गांधींच्या विसंगतींचा उल्लेख करून प्रियदर्शन आतां त्यांच्या अनुयायांकडे वळत आहे. “ त्यांचे शिष्य ढोंगी आहेत, व या शिष्यांच्या तोंडावरले सोज्वळ मुखवटे दूर करतांच युरोपांतल्या झोटिंगांना आणि मुत्सद्यांना लाजविणारे क्रूर आणि कारस्थानी पुरुष दृष्टीला पडतील हें खरें.'' गांधींच्या अनुयायांना हा फटका मारल्यावर प्रियदर्शन पुन्हां गांधींची कड घेऊन म्हणतो—“ पण स्वतः गांधी तसें नाहीत; त्यांच्या तोंडावर कसलाहि मुखवटा नाहीं.'' (पृ. १२० )

## प्रियदर्शनाचें प्रभावी व्यक्तिमत्त्व

असेंब्ली सुरू होतांच पहिल्याच दिवशीं कामगार, कोष्टी आणि किसान याचा मोर्चा असेंब्लीवर नेऊन मंत्रिमंडळाला भीति दाखविण्याचा कम्युनिस्ट मंडळींनीं बेत केला होता. ‘ लोकक्षोभाचें विराट् स्वरूप ’ मंत्रिमंडळाला दाखवावयाचें असा त्यांचा विचार झालेला असतो. पण या मोर्चाच्या आघाडीला कोणी रहावयाचें हेंच कायम होईना. प्रख्यात समाजवादी पुढारी राजेश्री अण्णासाहेब हें काम पतकरावयास तयार होईनात. बोलून चालून ‘ कागदी कम्युनिस्ट ’ हे! शेवटीं विठोबा मोर्चाचा पुढारी झाला. पोलिसांनीं प्रसंगोपात्त छडीमार केला. जमाव

अनावर झाला. अशा या आणीबाणीच्या प्रसंगीं स्वत: प्रियदर्शन जमावात शिरला, आणि त्यानें त्या खवळलेल्या जनसमूहापुढें भाषण केलें. समाज क्षणार्धात शात झाला. आणि मंत्रिमंडळाला हैराण करण्याच्या इरायानें असेंब्ली हाऊसपुढें जमलेल्या लोकानीं प्रियदर्शनाचाच मोठ्यानें जयघोष केला.

## मोर्चानंतर

प्रियदर्शनानें त्या खवळलेल्या जमावाला जीं आश्वासनें दिलीं तीं व्यक्तिश: दिलेलीं होतीं. त्यामुळें जमाव शात झाला हें खरें असलें तरी व्यक्तिशः दिलेलीं हीं आश्वासनें त्याला पुरीं करितां आलीं नाहींत तर? दारुबंदी हा तर खुद्द गांधीजींचा कार्यक्रम! प्रियदर्शनाचें यावर म्हणणें असें कीं, "मनुष्य जगला तर दारु पिईल कीं नाहीं? शेतकऱ्याला प्रथम जगू द्या. नंतर वळूं दारुबंदीच्या प्रश्नाकडे!" आणि आपलें हें मत अगदीं स्पष्टपणें गांधीजींना सांगण्याचा तो निर्धार करतो.

मोर्चा बारगळल्यानंतर संप घडवून आणण्याची खटपट मोहन आणि मंडळी सुरू करतात. संप सुरू झाल्यापासून सहा तासांच्या आंत विठोबा तुरुंगांत जाईल अशी व्यवस्था त्यांना करावयाची आहे. कारण तो मोकळा राहिला तर संपावर बिब्बा घालील अशी त्यांना भीति वाटते. पण विठोबाची सारी कर्तव्यतत्परता उचंबळून येते; आणि घरांत बाळंतीण होण्याच्या बेतांत असलेली बायको असहाय स्थितींत टाकून तो संपासाठीं बाहेर पडतो. अपेक्षेप्रमाणें त्यास अटक होते. इकडे त्याची बायको प्रसूतिवेदनानीं मरते. तिची व त्याची भेट होण्याचा योग नव्हता. प्रियदर्शनाच्या मदतीनें लवकरच विठोबाची सुटका होते.

## गांधीजी व प्रियदर्शन

गांधीजींना भेटण्यासाठीं प्रियदर्शन स्वत: शेगांवला जातो व त्याना स्वत:च्या साऱ्या अडचणी स्पष्टपणें सांगतो. मंत्रिमडळांतील आपल्या सहकाऱ्यांच्या आडमुठेपणाची उदाहरणें तो त्यांच्यापुढें ठेवतो व शेवटीं त्यांचा सल्ला विचारतो. त्याचें सर्व बोलणें शांतपणें ऐकून घेऊन गांधीजी

म्हणतात–" मी तुला कांहींहि सल्ला देऊं शकत नाहीं. तू आपल्या अडचणी वाटल्यास पार्लमेंटरी कमिटीपुढें ठेव. ( पृ. २४५ ) राजाजींच्या कोणत्याहि कृत्याचें समर्थन जे गांधीजी करतात त्यांनीं आपल्याला सल्ला देण्याचें कां नाकारावें असा प्रश्न प्रियदर्शनाच्या मनाला सतावूं लागला. त्याला मागच्या आठवणी झाल्या. विशेषतः, हरिपुरा कॉंग्रेसच्या वेळीं शाळाकॉलेजातून नेमबाजीचें शिक्षण सुरू करण्याची आपली योजना जेव्हां त्यानें त्यांना सांगितली तेव्हां त्यांनीं त्याचें अभिनंदन केलें नव्हतें याची त्याला आठवण झाली. आणि आज तर ते त्याच्याशीं अगदींच तिऱ्हाइतपणें वागले होते. त्यांनीं शेवटीं एकच सूचक वाक्य उच्चारलें— " मुख्य प्रधानाला आपल्या सहकाऱ्यांचा विश्वास संपादन करतां आला पाहिजे, प्रियदर्शन. " त्यांनीं त्याला सल्ला देण्याचें नाकारलें. आपल्या हातून कोणती भयंकर चूक घडली याचा उलगडा प्रियदर्शनाला होईना. स्वतःच्या विवेकबुद्धीला पटेल त्याप्रमाणें वागण्यात कोणता प्रमाद आहे हेंच त्याला समजेना. पण स्वतःच्या बुद्धीप्रमाणें वागण्यांतच आपल्या हातून खरी चूक झाली असें त्याला शेवटीं वाटलें. " बापूंचा आणि आपला जीविताकडे, समाजरचनेकडे आणि राजकारणाकडे पहाण्याचा दृष्टिकोन अगदीं भिन्न आहे " अशी त्यानें मनाची समजूत केली.

पण यामुळें गांधीजी पराकाष्ठेचे अहंकारी आहेत अशी त्याची खात्री पटली. पण " जगाला अहिंसेचे आणि अनासक्तियोगाचे पाठ देणाऱ्या महात्म्याला ही वृत्ति कशी शोभेल ? " आणि ते जर खरोखरीच इतके अहंकारी आणि पक्षपाती असतील, तर मग त्याचा महात्मेपणा तो कुठें उरतो ! अशा अनेक शंका त्याच्या मनांत येऊं लागल्या.

## प्रियदर्शनाचें बंड व त्याचे परिणाम

यानंतर मोठ्या धडाडीनें स्वतःचा खास कार्यक्रम अमलांत आणण्याच्या खटपटीला तो लागतो. लगेच सर्व बाजूंनीं त्याच्यावर भडिमार होतो. त्याच्या कार्यक्रमावर अनेक आक्षेप घेण्यांत आले. मंत्रिमंडळांत वादळ होऊन उद्योगमंत्री वाजपेयी राजिनामा देतात. प्रियदर्शनावर ते पांच आरोप करतात. या आरोपांची चर्चा पक्षाच्या सभेंत व्हावी अशी

मागणी करण्याचें प्रियदर्शन ठरवितो. जोंपर्यंत आपलें चारित्र्य शुद्ध आहे तोंपर्यंत कोणालाच भिण्याचें कारण नाहीं असा तो निर्धार करतो. त्याच्या या निर्धाराची उत्तमराव थट्टा करतात. "राजकारणांत चारित्र्याचा प्रभाव पडत नाहीं; कौटिल्याचा पडतो." अडाणी लोकांना झुलविण्या-साठीं 'संतपणाचा सोज्वळ मुखवटा' गांधींनीं तोंडावर चढविला आहे असें म्हणून उत्तमराव आपल्या विधानावर पुढील भाष्य करतात— "मला तर हा सगळा ढोंगीपणा वाटतो; हें सगळें पद्धतशीर कौटिल्य वाटतें! स्टालिन, मुसोलिनी, हिटलर किंवा कमाल या जगांतल्या चारी भारी अरेरावापेक्षां गांधी हा फारच घोटीव अरेराव आहे; न् त्याचे मार्ग फार सूक्ष्म आहेत हें मान्य आहे मला!" (पृ. २९३) शेवटीं, गांधींचें मन क्षुद्र आणि पक्षपाती आहे असा ते निर्वाळा देतात.

अखेर पार्लमेंटरी कमिटीच्या अध्यक्षांच्या देखरेखीखालीं चाललेल्या चौकशी समितीपुढें प्रियदर्शनाची चौकशी होते. या समितीपुढें प्रियदर्शन आपली बाजू स्पष्टपणें मांडतो. आपण दारूबंदीबाबत अनुत्साह दाखविला, आणि निशाणबाजीचें शिक्षण व नागरिकदलाची योजना या गोष्टींवर आपला दृढ विश्वास आहे हें तो आग्रहपूर्वक सांगतो. अहिंसेचें तत्त्व 'आजच्या समाजस्थितींत तरी' अव्यवहार्य आहे असें तो समितीला बजावून सांगतो. त्याच्या या भाषणाचा सभेवर फार मोठा प्रभाव पडतो. स्वत:ला 'सवाई हिटलर' समजणाऱ्या अध्यक्षाचाहि कांहीं इलाज चालेना. शेवटीं मतमोजणी होऊन प्रियदर्शनाच्या बाजूनें बावन्न मतें पडतात. फक्त दहा मतें विरोधी पडतात. अशा रीतीनें प्रियदर्शन निर्विवादपणें सभा जिंकतो.

यावर पार्लमेंटरी कमिटीचे अध्यक्ष एक पत्रक प्रसिद्ध करतात. असेंब्ली काँग्रेस पक्षानें प्रियदर्शनावर विश्वास प्रकट केला ही गोष्ट ते पत्रकांत कबूल करतात. पण त्याच्या कार्यक्रमाविषयीं पक्षांत असंतोष दिसून आला असें नमूद करून ते पुढें म्हणतात, "त्या दृष्टीनें राज्यकारभार अधिक सुरळित चालण्यासाठीं कमिटीनें मंत्रिमंडळाला जरूर त्या सूचना केल्या आहेत." गांधी पक्षपाती आहेत हा मंत्र उत्तमराव सतत जपत आहेत. 'अनत्याचाराच्या पायावर राजकारणाची पुनर्घटना करण्याचं कंकण' ज्यांनीं हातीं बांधलें

आहे अशा मंडळींचें खरें स्वरूप उघडकीस आलें हें कांहीं थोडें नाहीं असें प्रियदर्शन म्हणत असला तरी स्वतः गांधी चागले असून त्यांच्या भोंवतालची प्रभावळ वाईट आहे असें त्याला अजूनहि वाटत असल्यामुळें त्यांच्याकडे जाऊन न्याय मागण्याचें तो ठरवितो. गांधी–प्रियदर्शन मुलाखतींतून कांहींच निष्पन्न होत नाहीं. उलट गाधी अहंकारानें अगदीं आंधळे झाले आहेत असें त्याला वाटूं लागतें. " स्वतःच्या प्रमादांचा आणि स्खलितांचा डांगोरा स्वतःच्या तोंडानें जगभर पिटणें हें सुद्धां त्या अहंकाराचेंच चेष्टित आहे एक " असेंहि त्याच्या मनात आलें व गांधींचें ' अहंनिष्ठ राजकीय चारित्र्य ' त्याच्या डोळयांसमोर उभें राहिलें. कॉंग्रेस पक्षांत स्वतंत्र बुद्धि व धैर्य यांचा पूर्ण अभाव आहे अशी त्याची खात्री पटली. ( पृ. ३५५ )

उत्तमराव लोकशाहीच्या या विडंबनावर प्रखर टीका करतात. प्रियदर्शनाला ते म्हणतात, " तुमच्या प्रदभ्रष्टतेमुळें सत्य, अहिंसा आणि अंतःशुध्दि यांचा बडेजाव माजविणाऱ्या महात्म्याच्या तोंडावरला साधुत्वाचा मुखवटा निखळून पडला आणि त्याचं राजकीय चारित्र्य किती हिणकस आहे हें जगाला कळून चुकलें. तुम्ही ज्या क्षणीं पदभ्रष्ट झालात त्याच क्षणीं गांधींच्याहि पदभ्रष्टतेला प्रारंभ झाला, गाधींयुगाच्या अंताची सुरवात झाली. ढोंगी आणि अरेरावी गांधीयुगाची हयात वाढण्यापेक्षां देशात अराजक माजलेलं पुरवेल मला ! " ( पृ. ३५७ )

## गांधीवादाच्या मर्यादा

एका अँग्लो इंडियन पत्राला मुलाखत देताना गांधीवादाच्या उपयुक्ततेविषयीं प्रियदर्शन म्हणतो, " त्यांच्या तत्वज्ञानाचं स्वरूपच मुळीं असें आहे कीं, कांहीं एका मर्यादेपलिकडे त्यांच्या नेतृत्वाचा उपयोग होणें शक्य नाहीं. आजच्या शास्त्रीय जगांत जीविताकडे पाहण्याची त्यांची जुनाट अशास्त्रीय दृष्टि, आणि त्यांचें आत्मनिष्ठ, लहरी राजकारण यांचा निभाव लागणें शक्य नाहीं..... या क्रांतीच्या काळांत हिंदुस्थानाला योग्य दिशा दाखविण्याचें सामर्थ्य महात्माजींच्या प्रतिगामी तत्त्वज्ञानांत आहे असें मला वाटत नाहीं. " ( पृ. ३९० )

## पदभ्रष्ट

स्वतःच्या चारित्र्यावर भिस्त ठेवून प्रियदर्शनानें गांधीजींवर जो विश्वास टाकला त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं व 'अत्यंत अपमानास्पद परिस्थितींत' त्याला अधिकारपद सोडावें लागलें. त्याच्या मानी मनाची या दोन कारणांमुळेंच 'होरपळ' झाली !

## कादंबरींतील राजकारण

या प्रकरणाच्या सुरवातीस म्हटल्याप्रमाणें १९३९ मध्यें मध्यप्रांतात डॉ. खरे यांचें मंत्रिमंडळ कारभार पहात असतां तेथील राजकारणांत ज्या घडामोडी झाल्या त्यांचा हा 'कादंबरीमय इतिहास' आहे. कादंबरींतील मुख्य पात्रें प्रत्यक्षांतील कोणत्या व्यक्तींचीं चित्रें आहेत हें ओळखणें अतिशय सोपें आहे. प्रियदर्शन, उत्तमराव, पं. वाजपेयी, प्रांताध्यक्ष गुलाबचंद, 'स्वतःला सवाई हिटलर' समजणारे कॉंग्रेस पार्लमेंटरी बोर्डाचे अध्यक्ष इत्यादि पात्रें कोणत्या बिंबांचीं प्रतिबिंबें आहेत हें सांगण्याचें मुळींच कारण नाहीं. कोणीहि तें सहज ओळखील. प्रत्यक्ष गांधीजींच्या बाबतींत तर लेखकानें आवरणहि घातलेलें नाहीं. त्यांच्या नावानेंच सर्व उल्लेख आले आहेत. तात्पर्य, ही धड कादंबरीहि नाहीं व इतिहासहि नाहीं. बहुतेक सर्व वाचकांच्या डोळ्यांसमोर ज्या महत्त्वाच्या राजकीय घटना घडल्या त्यांच्यात स्वतःच्या सोयीसाठीं कांहीं 'कलात्मक' फेरफार करून, पण मूळ घटना कोणत्या तें सामान्य माणसालाहि अगदीं विनायास कळावें अशी भरपूर तरतूद करून आणि त्या घटनांतील व्यक्तींवरील आवरणें पराकाष्ठेचीं झिरझिरींत ठेवून व एक अत्यंत महत्त्वाची व्यक्ति (गांधीजी) जशीच्या तशी कादंबरींत आणून माडखोलकरांनीं एका विवाद्य राजकीय घटनेचा आपल्या दृष्टीनें अर्थ लावला आहे. कादंबरीचा आधार घेतल्यामुळें माडखोलकरांची एक मोठी सोय झाली आहे. आपल्याला अप्रिय असलेल्या व्यक्तीवर अत्यंत प्रखर टीका करण्याची हौस त्यांनीं उत्तमराव देशमुख या पात्राच्या मदतीनें पुरी करून घेतली आहे. मध्यप्रांतांत घडलेल्या घटना हा प्रत्यक्ष इतिहासाचाच एक भाग असल्यामुळें आपल्यावर

याबाबतींत कोणी टीका केली तर पात्रांच्या मागें दडण्याची व ' हे विचार माझे नसून त्या पात्रांचे आहेत ' असें बेधडक म्हणतां येण्याची सोय हवी यासाठींच माडखोलकरांनीं ही कादंबरी लिहिली आहे असें म्हणतांना मला कसलाच संकोच वाटत नाहीं. माडखोलकरांमध्यें प्रामाणिकपणा असता, व खरें धैर्य असतें तर योग्य त्या पुराव्याचा उपयोग करून, त्याची काळजी-पूर्वक छाननी करून, आणि इतिहासकारांच्या शुद्ध भूमिकेचा अवलंब करून मध्यप्रांतांतील खरे प्रकरणाचा त्यांनीं साद्यंत इतिहासच लिहिला असता. पण इतिहास लिहीत असतां इतिहासकाराची भूमिका कोणती असावी लागते ? सत्य जें असेल त्याचाच फक्त त्यानें आविष्कार करावयाचा असतो. सत्य दडपून ठेवावयाचें व असत्य प्रसृत करावयाचें हीं कामें करणारा मनुष्य इतिहास लिहिण्यास मुळींच लायक नसतो. जर माडखोलकरांना संपूर्ण सत्यच आविष्कृत करावयाचें होतें, व कोणत्याहि असत्य गोष्टीची सूचना देखील करावयाची नव्हती, म्हणजे खऱ्या इतिहासकाराची भूमिका जर त्यांना घ्यावयाची होती तर मग त्यांनीं यासाठीं कादंबरी न लिहिता इतिहासच लिहावयास पाहिजे होता. अवघ्या सात वर्षांपूर्वी घडलेल्या घटनांची कादंबरीच्या द्वारें चर्चा करण्याचा माडखोलकरांना मोह झाला यातच त्यांची भीरुता व जबाबदारी टाळण्याची वृत्ति हीं दोन्ही वैगुण्यें स्पष्टपणें दिसून येतात. क्रिप्सशिष्टाईनंतर डॉ. लोहिया यानीं The Mystery of Sir Stafford Cripps या नांवाचें पुस्तक लिहून अनेक गोष्टींवर सडेतोड टीका केली होती हें सर्वांस माहीत आहे. हा प्रामाणिक-पणा आहे. कारण, प्रत्यक्ष घडलेल्या घटनांवरील सर्व भाष्याची जबाबदारी स्वतः लेखकानें धीरानें पतकरली आहे. पण कादंबरी ही कल्पित कथा होय, इतिहास नाहीं, या सुपरिचित गोष्टीचा आधार घेऊन, किंबहुना, ' या कादंबरींतील सर्व पात्रें व प्रसंग काल्पनिक आहेत ' अशी लोणकढी थाप मारून लेखकाला वाचकाची प्रतारणा करावयाची आहे असें जेथें दिसतें तेथें त्याच्या क्षुद्र मनोवृत्तीची जितकी निंदा करावी तितकी थोडीच ! इतिहास आहे असा वाचकांना भास तर व्हावा आणि कोणी आक्षेप घेऊं लागला तर कादंबरीच्या ऐसपैस व्याख्येच्या आड दडावें अशी ही दुहेरी वळति आहे. बरें, कादंबरींतील प्रत्येक घटना खरी असून पात्रांच्या तोंडीं

घातलेलें प्रत्येक वचन अगदीं सत्य आहे अशी फुशारकी माडखोलकरांना मारावयाची असेल तर त्यानीं कादंबरी कां लिहिली ? इतिहासच का लिहिला नाहीं ? रोज आणि मोहन याच्या प्रणयावर स्वतंत्र कादंबरी लिहून खरेप्रकरण व त्यांत गांधीजींचा व वल्लभभाई पटेलाचा आलेला साक्षात् संबंध याच विषयाची सांगोपांग व साधार चर्चा कोणताहि आड-पडदा न ठेवता, न लाजतां, न भितां त्यांनीं करावयास हवी होती. पण राज-कीय घटनांवर व राजकारणांतील व्यक्तींवर अशाप्रकारें कादंबरीच्या द्वारें टीका करणें ही गोष्ट नुसतीच भीरुत्वाची द्योतक नसून पराकाष्ठेची तिर-स्करणीयहि आहे यांत कसलीच शंका नाहीं !

या ठिकाणीं एक गोष्ट स्पष्ट करणें आवश्यक आहे. महात्मा गांधी, त्यांचें राजकारण, त्याचें खाजगी व सार्वजनिक चारित्र्य, त्यांच्या सहका-ऱ्यांचें राजकीय व खाजगी चारित्र्य इत्यादि गोष्टींवर वाटेल तेवढी कडक टीका एखाद्या अधिकारी व्यक्तीनें करावयास माझी मुळींच हरकत नाहीं, असण्याचें कांहीं कारण नाहीं. तेव्हा, माडखोलकरानीं एखाद्या प्रांतातील राजकारणावर अथवा मं. गांधींवर किंवा त्यांच्या प्रभावळींतील व्यक्तींवर टीका केल्याबद्दल तक्रार मला करावयाची नाहीं. माझा मुद्दा असा कीं, ज्या पद्धतीनें व ज्या माध्यमाच्या द्वारें त्यानीं हें केलें आहे त्या पद्धतीवर व त्या माध्यमावर आक्षेप घेता येईल. सत्यसृष्टींतील सर्वांना परिचित असलेल्या व्यक्ति जशाच्या तशा, किंवा अगदींच किरकोळ फरक करून व त्या व्यक्ति कोण आहेत हें सर्वांना सहज समजेल अशा रीतीनें कादंबरींत आणून त्यांच्यावर प्रतिकूल टीका करणें हें निंद्य आहे. शिवाय, एखाद्या व्यक्तीला अधिक उदात्त व आदरणीय करण्याच्या इराद्यानें त्याच्या वैयक्तिक जीवनातील काहीं घटनांत थोडेफार फरक करणें व त्याचें एखाद्या कादंबरींत चित्र रेखाटणें ही गोष्ट एकवेळ क्षम्य मानता येईल. अर्थात् यालाहि मर्यादा आहेतच. पण निदान वर्ण्य व्यक्तीला अशा बाबतींत अन्याय तरी होण्याचा संभव नसतो. पण, ज्यावेळीं एकाद्या प्रसिद्ध व्यक्तीवर प्रतिकूल टीका करावयाची असते, त्याचें चारित्र्य व दानत या गोष्टी अत्यंत हीन आहेत हेंच सिद्ध करावयाचें असतें त्यावेळीं त्याचा इतिहास—म्हणजेच चरित्र—लिहिणें व त्या इतिहा-

सांत त्या व्यक्तीविषयीं केलेल्या प्रत्येक प्रतिकूल विधानाची जबाबदारी लेखकानें धीरानें पत्करणें हा एकच शिष्टाचारसमत मार्ग आहे. माडखोलकरांनीं ही गोष्ट करण्याइतपत नीतिधैर्य दाखविलें असतें तर त्यांत त्यांची दानत सिद्ध झाली असती. प्रस्तुत ' मुखवटे ' या कादंबरींत प्रियदर्शन हा नायक असून लेखकानें तो धीरोदात्त, प्रामाणिक, सत्याचा आग्रह धरणारा व निष्कलंक चारित्र्य असलेला दाखविला आहे. उलट म. गांधींना लेखकानें ' व्हिलन ' बनविलें आहे. हा व्हिलनहि सामान्य नाहीं. पराकाष्ठेचा कुटिल व्हिलन आहे हा. आणि हें सिद्ध करण्यासाठीं लेखकानें अगदीं पराकाष्ठा केलेली आहे. उत्तमराव देशमुख नावाचें जें पात्र या कादंबरींत आहे त्याच्या मुखानें स्वत: माडखोलकरांनीं म. गांधींना निरर्गल शिव्या देण्याची हौस मनमुराद पुरवून घेतली आहे. ' कांता ' कादंबरींत गांधीजींच्या चारित्र्याची व राजकारणाची हेटाळणी करण्याचा उपक्रम माडखोलकरांनीं केलेला होता. पण, तेव्हा या बाबतींत ते तरबेज झालेले नव्हते. आता ते या बाबतींत कांहीं विशेषच कौशल्य दाखवूं लागले आहेत. 'कांता' कादंबरींतील एका बदफैली इसमानें गांधीजींना 'रासपुतीन' ही पदवी दिली होती. या कादंबरींतील राजेश्री उत्तमरावानीं अगदीं कड पोंचविली आहे. पराकाष्ठेचे कुटिल, चारित्र्यहीन. संतपणाचा मुखवटा धारण करणारे, ढोंगी, स्टालिन–मुसोलिनी यांच्यापेक्षाहि सवाई अरेराव, अंत:शुद्धीचा खोटा बडेजाव माजविणारे, पक्षपाती, असहिष्णु इत्यादि शेलकीं विशेषणें उत्तमरावांनीं गांधीजींना बहाल केली आहेत व गांधीवाद हा अरेराव आणि ढोंगी आहे अशी गांधीवादाची संभावना केली आहे. उत्तमरावांनीं केलेलें गांधीवादाच्या निर्मूलनाचें कार्य जणू पूर्ण झालें नाहीं असें वाटून माडखोलकरांनीं पुन्हा एकदा प्रियदर्शनाच्या तोंडून त्याच्या राजकारणाची व तत्त्वज्ञानाची हजेरी घेतली आहे. त्याची जीविताकडे पहाण्याची दृष्टी 'जुनाट' व ' अशास्त्रीय ' आहे, त्याचें राजकारण ' आत्मनिष्ठ ' व ' लहरी ' आहे, त्यांचें तत्त्वज्ञान ' प्रतिगामी ' आहे, त्याचें राजकीय चारित्र्य ' अहंनिष्ठ ' आहे इत्यादि निर्णय प्रियदर्शनानेंहि शेवटीं दिले आहेत. अशा रीतीनें गांधीजी व गांधीवाद यांची अगदीं भंबेरी उडवून माडखोलकरांनीं विजयी मुद्रेनें कादंबरी संपविली आहे.

'मुखवटे' या कादंबरींतील राजकारणाचें हें असें स्वरूप आहे. ही कादंबरी नव्हे, इतिहासहि नव्हे व राजकारणावरील प्रबंधहि नव्हे. गांधीजींची अप्रतिष्ठा करण्याची माडखोलकरांना जो बेसुमार हौस आहे ती मात्र त्यांनीं भरपूर फेडून घेतली आहे. पण यामुळें गांधीजी हजारोंच्या चेष्टेचा विषय झाले नाहींत अथवा गांधीवादाचा नायनाटहि झालेला नाहीं. गांधीवादाची शास्त्रीय व तर्कशुद्ध चिकित्सा करून त्यांतील वैगुण्यें दाखविणें हें काम माडखोलकरांनीं एखाद्या प्रबंधाच्या द्वारें केलें असतें व आपली भूमिका केवळ तत्त्वजिज्ञासेची असून पूर्वग्रहदूषित निंदकाची नाहीं याचे भरपूर पुरावे त्या प्रबंधात त्यांनीं दिले असते तर गांधीवाद पदच्युत होण्यास अधिक मदत झाली असती यांत कोणतीच शंका नाहीं. पण 'सालोमालो'च्या पंथातील माडखोलकरांना जॉन गंथरप्रमाणें राजकारणावर सर्वमान्य होणारा तात्त्विक चर्चेनें युक्त असा भारदस्त ग्रंथ कसा लिहितां येणार? माझ्या मनांत नेहमीं एक विचार येतो. तो असा कीं, माडखोलकरांचें नांव कायम ठेवून अथवा त्यात किंचित् बदल करून, परंतु ही असामी म्हणजे ग. त्र्यं. माडखोलकरच असें कोणालाहि सहज उमजेल अशा रीतीनें, त्याच्या आयुष्यातील कांहीं खऱ्या व इतर बऱ्याचशा काल्पनिक गोष्टींचा मसाला उपयोगात आणून, त्याची केवळ टवाळी करण्याच्याच उद्देशानें, एखाद्या चतुर व मुरब्बी लेखकानें 'मुखवटे' या कादंबरीचें भरपूर अनुकरण करून एखादें नाटक किंवा एखादी कादंबरी लिहिली तर बरें होईल. माडखोलकराच्या कलेला त्यायोगें कसलें अवसान चढेल, व कलावंताचा त्यांनीं धारण केलेला मुखवटा गळून पडल्यावर कोणतें दृश्य दिसेल याचीं चित्रें मी मनात निर्माण करूं लागलों म्हणजे माझें मलाच हसूं येतें.

## मोहनचें दुहेरी जीवन

प्रियदर्शनाचें संपूर्णपणें राजकीय जीवन व त्यांतील अनेक राजकीय घडामोडी यानीं कादंबरी भलतीच वजनदार व भारदस्त होईल अशी शंका येऊनच कीं काय, माडखोलकरांनीं राजकारणाला मोहन व रोज यांच्या उन्मादक प्रणयाची चमचमीत फोडणी दिलेली आहे. खरें पाहतां, मोहन व रोज यांच्या विवाहपूर्व चोरट्या शृंगाराचा अथवा विवाहोत्तर मोहनच्या

पशुतुल्य कामुकतेचा कादंबरीच्या मुख्य विषयाशीं फारच थोडा संबंध आहे. पण धुंद, उन्मादक व बेछूट प्रणयाच्या आविष्कारांत सुख मानण्याकडेच माडखोलकरांची स्वाभाविक प्रवृत्ति असल्यामुळें त्यांना केवळ राजकीय कथानक मनापासून आवडेल हें शक्यच नाहीं. वाचकांना रिझविण्यापेक्षां स्वत:च्याच वृत्तींना चाळविण्यासाठीं व त्यापासून होणारें समाधान मिळविण्यासाठींच लेखकानें मोहनचें हें उपकथानक निर्मिलें असावें अशी शंका येते. उपकथानकाचा विषयहि माडखोलकरांचा हातखंडा आहे. स्त्रीची भावनावशता, प्रेम करण्याची आसक्ति, प्रियकराच्या ठायीं सर्वस्व केंद्रित करण्याची तळमळ, पुरुषाच्या संपूर्णपणें आहारीं जाण्याच्या बाबतींतील तिचें दौर्बल्य; आणि उलट पक्षीं पुरुषाची अतिरिक्त व पशुतुल्य कामुकता, स्त्रीच्या व्यक्तित्वाचा चुराडा करण्याची त्याची लालसा हें या मोहन-रोज प्रणयप्रकरणाचें तात्पर्य आहे. कादंबरीची सुरवातच मुळीं या प्रणयानें झालेली आहे. आणि या प्रणयकथेची लेखकानें अशी मांडणी केलेली आहे कीं, ती राजकीय कथानकांत मुळींच मिसळूं नये व स्वतंत्रपणें वाचतां यावी.

स्त्रीला आपल्या जाळयांत पकडण्याच्या कलेंत मोहन अगदीं तरबेज आहे, ' स्वाभाविक ' वासनांचा कोंडमारा करण्यांत कांहीं मतलब नाहीं असें तो वारंवार रोजला आग्रहपूर्वक सांगतो. ती केव्हां ' अमर्याद ' होते याचीच तो वाट पहात आहे. सुरवातीला, तिचें ' मन चाळवलें ' यांतच तो समाधान मानीत असे. पण त्याचें आयुष्य ' भटकें ' असल्यामुळें त्याचें एवढ्यानें समाधान कसें होणार ! आपल्या भटक्या आयुष्यांत निरनिराळ्या स्त्रियांच्या सहवासाची मजा त्यानें मनसोक्त अनुभविली होती, त्यांच्या ' बौद्धिक व वासनिक प्रेमाचा ' त्यानें मनसोक्त अनुभव घेतलेला होता. " त्यानें यौवन कवटाळलें होतें, कुस्करलें होतें, प्रीति उपभोगली होती, अव्हेरली होती. " असा हा प्रेमवीर रोज नांवाच्या ' उमलत्या गुलाबकळीचा सौरभ ' लुटण्याची लालसा करीत होता. आणि त्याची ही महत्त्वाकांक्षा थोड्याच वेळांत सफल होते. त्याच्या डोळयांत तिला नेहमीं ' अधीरता ' व ' अतृप्तता ' दिसत असली तरी त्याच्यावर विश्वास ठेवून ती त्याच्या तावडींत सापडते. पण मोहनला तिच्याशीं फक्त चोरटा शृंगार करावयाचा आहे. तिच्याशीं लग्न करण्याचा त्याचा विचार नाहीं. ती

ख्रिस्ती आहे या सबबीवर तो तिच्याशीं लग्न करण्याचें टाळूं पाहतो. तिचा मात्र लग्नाचा विलक्षण आग्रह चालू आहे. पण त्याच्या वारंवार नकारामुळें त्याची ' अनिर्बंध ' प्रीतीची कल्पना म्हणजे अन्य कांहीं नसून ' बंधातीत राहूं इच्छिणारी भोगलालसा ' आहे आणि ती आपल्या लग्नाच्या आड येत आहे असें तिला शेवटीं वाटूं लागतें. अनेक वेळां तिला त्याचा तिरस्कार येतो. पण तरीसुद्धां त्याच्याविषयींचें तिचें आकर्षण कांहीं कमी होत नाहीं. अखेर रोजच्या वडिलांनीं त्याला लग्नासाठीं तयार केलें. आणि यामुळें सारें दुःख ती एकदम विसरून गेली. तो ' भोगलंपट ' असेल, ' नाटकी ' असेल; तरीहि त्याचें आपल्यावरील प्रेम खरें आहे असें तिला वाटे.

' भंगलेलें देऊळ ' या कादंबरींतील अनिरुद्ध अनूशीं लग्न होईपर्यंत आपलीं सारीं व्यसनें आवरून धरतो. पण, लग्न झाल्याबरोबर लगेच धूम्रपानापासून मदिरेच्या धुंदीपर्यंत सर्व कांहीं प्रकार अनूला पाहावयास सापडतात. रोजचेंहि हेंच होतें. विवाहानंतर लगेच त्याच्या ' सुसंस्कृत पशुत्वाची भेसूर प्रतीति ' तिला येते. त्याच्या ' पशुत्वाची लगट ' तिला असह्य होते. आपण त्याच्या आयुष्यांतली पहिली स्त्री नाहीं हें तिला कळून चुकतें. आणि दररोज त्याच्या ' दुहेरी जीवना ' चा नवीनच प्रत्यय तिला येऊं लागतो. त्याच्या जीवनात अनेक कप्पे असून त्यांपैकीं कांहीं कप्पे आपणांस कधींच कळणार नाहींत असें तिला वाटूं लागतें. दिवसां तो ' सोज्वळ मुखवटा ' तोंडावर चढवीत असे व रात्रीं तो मुखवटा झुगारून देत असे. अनेक गोष्टी तो आपल्यापासून चोरून ठेवतो याचें तिला फार वाईट वाटे. एकदा तिनें याबाबतींत त्याला छेडलें असतां तो म्हणतो— " स्त्री कितीहि शिकलेली असली, तरी ती पुरुषाशीं समरस होऊं शकत नाहीं. पुरुषाच्या जीवनाला अनेक अंगें असतात. तो बहिर्मुख असतो. त्याच्या त्या व्यापक जीवनांत स्त्रीला गोडी वाटत नाहीं; तें जाणून घेण्याची तिला इच्छा नसते; ऐपतहि नसते." ललिता ('मुक्तात्मा'), अनू ('भंगलेलें देऊळ'), कांता ('कांता'), सुलोचना ('दुहेरी जीवन') या माडखोलकरांच्या पूर्वींच्या नायिकांच्या मनाचा कसला विलक्षण कोंडमारा होत होता हें आपण मागें पाहिलें आहे. त्याच प्रकारचा कोंडमारा प्रस्तुत कादंबरींतील रोजचा होत आहे. ती सुद्धां इतर नायिकांप्रमाणेंच सुशिक्षित,

घरंदाज व सुसंस्कृत आहे. आणि तरीसुद्धां बेछूट पतीच्या धुंद आयुष्यांत तिचा प्रत्यहीं कोंडमारा होत आहे व तिचें व्यक्तित्व चुरगळून जात आहे.

आपल्या जीवनांतील बंदिस्त चोरकप्पे तिला समजू नयेत अशी त्याची धडपड आहे. ' भंगलेलें देऊळ ' या कादंबरींतील अरूचें प्रेमाचें तत्त्वज्ञान आपल्या परिचयाचें आहे. तो म्हणतो, " स्वतःचं व्यक्तित्व जर मनुष्य प्रेमापायीं गमावून बसला,तर काय मजा आहे त्या प्रेमांत ? " रोज मोहनच्या जीवनाशीं संपूर्णपणें तन्मय होण्याची लालसा बाळगीत आहे. आणि नेमकें हेंच मोहनला नको आहे. त्याचें तत्त्वज्ञान पहा—" प्रत्येकाचं व्यक्तित्व जसं भिन्न असतं तसंच जीवनहि भिन्न असतं......स्त्रीपुरुषांचं मीलन म्हणजे काहीं दोन प्रवाहांचं मीलन नव्हे......एकमेकांचं व्यक्तित्व, विशिष्ट जीवन न गमावतां त्यांना साहचर्याचं सुख भोगतां आलं पाहिजे. " ( पृ. १४८ ) गंमत अशी कीं, अनूला आपल्याशिवाय स्वतंत्र अस्तित्वच असूं नये अशी ' भंगलेल्या देवळा ' तील अनिरुद्धाची इच्छा आहे; कारण, ती त्याला अहोरात्र जवळ पाहिजे, आपल्या सेवेंत तिनें सतत राबावें असें त्याला वाटतें. आणि यामुळें तिनें आपल्याशीं पूर्ण समरस व्हावें अशी त्याची इच्छा आहे. त्याच्या या आचरटपणामुळें स्त्रीचें आयुष्य नदीसारखें नसून वेलीसारखें असावें असें ती म्हणूं लागते. या कादंबरींत निराळाच प्रकार दिसून येतो. आपलीं बेछूट कारस्थानें बायकोला समजूं नयेत अशी मोहनची इच्छा आहे. ती तर त्याच्याशीं पूर्णपणें समरस होऊं पहात आहे. तिला वाटतें कीं, नवऱ्यानें आपल्यापासून काहींहि गुप्त ठेवूं नये. आणि यामुळें विवाहांत पतिपत्नींनीं आपलें व्यक्तित्व अबाधित ठेवून एकमेकाच्या जीवनांत विलीन होऊं नये हें ज्ञान तो तिला ऐकवीत आहे.

त्याचें हें प्रणयाचें तत्त्वज्ञान, त्याची ' निर्दय आसक्ति ' आणि ' दुर्दम अतृप्तता ' यामुळें रोजचा मनस्वी छळ होत असला तरी तिचें त्याच्यावरील प्रेम अत्यंत स्थिर आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. संसाराचा इतका विचका होऊनहि तिचें मन त्याच्याविषयीं विटत नाहीं.

शेवटीं व्यसनांचा अतिरेक झाल्यामुळें मोहन अनेक तऱ्हानीं गोत्यांत येतो व जगणें असह्य झाल्यामुळें तो आत्महत्या करतो. अगदीं अखेरीस त्याला आपल्या वर्तनाचा पश्चात्ताप होतो. तिला उद्देशून मृत्यूपूर्वी जें पत्र

तो लिहितो त्यांत तो म्हणतो, " माझें सारें जीवन प्रतारणा करण्यांत गेलें........मीं आजवर अनेक स्त्रियांच्या मोहाला बळी पडलों आणि त्यांचाहि बळी घेतला. पण तुझ्याविषयीं मला जें आकर्षण वाटलें, तें या सर्व अनुभूतींहून अगदीं निराळें, काहींतरी अलौकिक असें होतें. "

असें हें प्रणयप्रधान उपकथानक आहे. यांतील नायक मोहन ही व्यक्ति पूर्वी 'भंगलेलें देऊळ' व 'दुहेरी जीवन' या कादंबऱ्यांतील अनिरुद्ध व मुकुंद यांच्या रूपानें येऊन गेली होती हें वाचकांस आठवत असेलच. दुर्दम्य आसक्ति, अनिवार भोगलालसा व अतृप्तता हींच या तिघांचीं बिरुदें आहेत. सारेच 'नवपुष्पावरले भ्रमर' असून नावीन्याच्या हव्यासामुळें आपल्या सुशिक्षित, सुसंस्कृत, व प्रेमळ प्रियकरणींपासून दूर दूर जात आहेत व नावीन्याची हौस चांगल्या अथवा वाईट उपायांनीं भागवीत आहेत. भोगलोलुप, अतृप्त, शिकारी व भटक्या असा हा पुरुषी नमुना ( type ) माडखोलकरांनीं निर्माण केला आहे. हाच नमुना पुढच्या कांहीं कादंबऱ्यांतहि थोड्या फरकानें पुन्हा दिसणार आहे.

## स्वभावलेखन

प्रियदर्शन ही व्यक्तिरेखा उत्कृष्ट आहे. धीरोदात्त, पराकाष्ठेचा प्रामाणिक, कर्तव्यदक्ष, कर्तव्य करीत असतां कोणत्याहि संकटाला न जुमानणारा, ध्येयवादी, भावनावश आणि बांका प्रसंग येतांच कठोर होऊं शकणारा असा हा नायक मोठा आकर्षक आहे. विठोबा ही व्यक्तिरेखाहि वरच्या दर्जाची आहे. विलक्षण बिकट परिस्थितींत स्वतःला व कुटुंबांतील जवळच्या व्यक्तींना असह्य यातना सोसाव्या लागत असतांहि स्वतःच्या करारी ध्येयवादापासून रेसभरहि च्युत न होणारा हा प्रामाणिक व तळमळीचा कार्यकर्ता प्रियदर्शनाइतकाच आदरणीय वाटतो. 'कागदी कम्युनिस्टां'चे अग्रणी अण्णासाहेब ही व्यक्ति पोकळ बडबड करणाऱ्या व प्रसंग येतांच कांहींहि जबाबदारी न पत्करतां पाठ फिरवून पळून जाणाऱ्या बढाईखोर व संधिसाधु शेंदाडशिपायांची प्रतिनिधि आहे !

पुरुषावर अमर्याद प्रेम करून अंतीं स्वतःच्या भावनांचा व व्यक्तित्वाचा कोंडमारा सहन करणारी रोज ही व्यक्तिरेखा अशा स्त्रियांचा

माडखोलकरांनीं जो नमुना (type) बनविला आहे त्याबरहुकूम काढण्यांत आली आहे. 'भंगलेल्या देवळां'तील अनू व 'दुहेरी जीवनां'तील सुलोचना या पूर्वीच्या दोन नायिकांत व रोजमध्यें तत्त्वतः काय फरक आहे ? कांहीं किरकोळ फरक सोडून दिले तर या सर्व स्त्रियांच्या मनोव्यथेचें बीज व स्वरूपहि एकच आहे असें दिसून येईल. यामुळें रोज ही कांहीं स्वतंत्र व्यक्तित्वानें नटलेली व्यक्तिरेखा मुळींच नाहीं.

## शैलीचें सौंदर्य

रोज व मोहन यांच्या उपकथानकांतील रोजचें आत्मनिवेदन शैलीच्या दृष्टीनें वरच्या प्रतीचें आहे. भाषा माडखोलकरांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें मोठी डौलदार, रेखीव व बांधेसूद आहे. अर्थात्, लालित्यापेक्षां प्रगल्भतेकडे व प्रौढत्वाकडेच तिचा विशेष कल आहे हें याठिकाणींहि स्पष्ट दिसून येईल. अनूच्या आत्मकथनांत ('भंगलेलें देऊळ') जो विदग्ध,प्रौढ व रेखीव भाषेचा आविष्कार झालेला दिसतो तोच आविष्कार रोजच्या आत्मकथेंतहि झालेला आहे. वेंचक शब्द वापरण्याची हातोटी माडखोलकरांना चांगली साधली आहे. प्रसंगोचित सूचक संस्कृत अवतरणें, उपमा-दृष्टांतादि अलंकार यांनीं या आत्मकथेला विशेष सुबकपणा आलेला आहे. परंतु, एक गोष्ट मनांत ठसते ती ही कीं, रोजच्या भावनांचा आविष्कार यथातथ्य रीतीनें करणें ही गोष्ट लेखकाला विशेष महत्त्वाची वाटत नसून तो आविष्कार सालंकृत व सुबक शैलीच्या द्वारें करण्याचीच त्याला खरी तळमळ लागलेली आहे. वेंचक शब्द शोधण्याची लेखकाची तीव्र धडपड स्पष्टपणें दिसून येते. या आत्मकथनांतील भाषेचें स्वरूप अनेक ठिकाणीं गडकऱ्यांच्या 'पुण्यप्रभावां'-तील वसुंधरा-भूपाल यांच्या काव्यमय संवादांतील भाषेसारखें दिसतें.

माडखोलकरांचे उपमा, उत्प्रेक्षा, दृष्टांत इत्यादि अलंकार बहुंशीं सांकेतिक व ठरीव ठशाचेच असतात. त्याचप्रमाणें सृष्टिवर्णनेंहि ठराविक वेळेचीं, ठराविक दृश्यांचीं व ठराविक पद्धतीनेंच बरींचशीं केलेली असतात. क्षितिज, चतुर्थीच्या किंवा अष्टमीच्या चंद्राची कला, पाऊस पडून गेल्यानंतरची आर्द्र सृष्टि हे त्याच्या वर्णनाचे मुख्य विषय होत.

# ७

# नवे संसार

माडखोलकरांची ही पूर्वी व्यक्त झालेली कादंबरी ' मुखवटे ' या कादंबरी-नंतर वर्षाच्या आंतच १९४१ च्या जुलै महिन्यांत प्रसिद्ध झाली. 'मुक्तात्मा,' या कादंरींतील पराकाष्ठेचें संस्कृतप्राचुर्य व शैलीचें कांहीं वेळां अत्यंत कृत्रिम वाटणारें प्रौढत्व उत्तरोत्तर कमी कमी होत गेलेलें आपणांस दिसून येईल. नित्याच्या वापरांतील सुटसुटित, साध्या, परंतु प्रभावी शब्दां-ऐवजीं क्लिष्ट व वापरांत नसलेले संस्कृत शब्द वापरण्याची माडखोलकरांची विचित्र हौस पहिल्या कादंबरींत अगदीं पराकोटीला गेलेली आहे. पुढें पुढें ही हौस कमी होत जाऊन ' नवे संसार ' या कादंबरींतील भाषा पुष्कळच सोज्वळ व सोपी झाली आहे व तिच्यांतील कृत्रिमपणा व सांकेतिक-पणा जवळजवळ नष्ट झाला आहे. उपमा—दृष्टान्तादि अलंकारांचा व एकाच प्रकारच्या सृष्टिवर्णनांचा खच या कादंबरींत पडलेला नाहीं. चंद्राच्या कलांचें वर्णन, पावसाची सर पडून गेल्यानंतरच्या अवस्थेचें वर्णन, क्षितिजाच्या कडेचें वर्णन इत्यादि गोष्टी आतां बऱ्याचशा कमी प्रमाणावर येऊं लागल्या आहेत. संस्कृतप्राचुर्य कमी झालें आहे आणि खास माडखोलकरी टांकसाळींतील शब्दांची उधळमापहि झालेली नाहीं. क्वचित् माडखोलकरांना आपल्या पहिल्या संस्कृतप्रचुर भाषेची अचानक आठवण होते, नाहीं असें नाहीं. मग सुषमा, दाहक द्युति, तैजस भावना, गंधमदिर वास इत्यादि शब्द त्यांना वापरावेसे वाटतात.

## विफल जीवनाचें प्रतीक

या कादंबरीचा नायक विद्याधर हा विफल जीवनाचें प्रतीक मानावयास कांहीं हरकत नाहीं. “ जीवन विफल होण्याचा भीतीसारखा दुसरा शाप नाहीं तरुण मनाला” असे उद्‌गार विद्याधर आपली सहकारिणी (पत्नी नव्हे) मुक्ता हिच्याजवळ काढतो ( पृ. २५४ ). जीवनाच्या या विफलतेचा शाप मुक्ते-लाहि भोंवलेला दिसतो. प्रणयपूर्ति हा जो मानवजातीचा स्वाभाविक हक्क

त्या हक्काच्या उपभोगांत तिच्या जीवनाची परिणति आणि सफलता झालेली दिसत नाहीं. आपलें 'स्त्रीत्व विफल' व्हावें या 'भयानक जाणीवेनें' तीसुद्धां अत्यंत व्यथित झालेली आहे. (पृ. २६८)

कृतींत न उतरलेला ध्येयवाद हेंच या जीवनवैफल्याचें मूळ होय. ध्येयवादाच्या कल्पनेचीं आकर्षक आणि 'मंदिर' स्वप्नें जरी विद्याधराला पडत असलीं तरी तो ध्येयवाद कृतींत उतरविण्याचें सामर्थ्य त्याच्या ठायीं नाहीं, साहस नाहीं, धैर्य नाहीं. आणि ध्येयवाद कृतींत उतरवितां येणें केवळ स्वतःच्या दौर्बल्यानेंच अशक्य झाल्यामुळें त्याच्या मनात शेवटीं 'आत्मनिर्वाणा'चे विचार थैमान घालूं लागतात; आणि विफल जीवनामुळें वैतागलेला हा दुबळा ध्येयवादी मनुष्य स्वतःवर सर्वस्वीं विसंबून असलेल्या पत्नीचा व मुलाचा त्याग करून फरारी होण्याचें ठरवितो.

अशा या नायकाच्या दुबळेपणाचे अनेक पुरावे उपलब्ध आहेत. दिनकरनें रचलेल्या कटात सामील होण्याचें ठरवून विद्याधर नागपूरहून अकोल्याला जाण्याचा बेत करतो. त्यावेळीं कटाच्या भीषण विचारानें स्तंभित झाल्यामुळें त्याच्या नेत्रांतून 'टपोरे अश्रु' ओघळतात (पृ. २९२). हें कांहीं धीरगंभीर पुरुषाचें लक्षण नाहीं. हा मनुष्य राजकीय दरवड्यासारख्या छातीच्या कामाला अगदीं नालायक आहे. त्याचा तो पिंडच नाहीं. केवळ ध्येयवादाची तरल स्वप्नें पहात बसणें व त्या स्वप्नांच्या धुंदींत गुंगून राहणें, किंवा श्री. अनंत काणेकर यांच्या काव्यमय भाषेंत सांगावयाचें झालें तर 'गुंफीत कल्पनाजाला गुंगणें' येवढेंच काय तें त्याला शक्य आहे. तत्त्वनिष्ठेबद्दल किंवा ध्येयवादाबद्दल अमर्याद आदर असला तरी त्याला धाडसाची, धैर्याची, साहसाची जोड मिळावयास नको काय? दुर्दैवानें आपल्या नायकाच्या ठायीं यांपैकीं कांहींहि नाहीं.

प्रस्तुत कादंबरींतील नायकाचें जीवन ध्येयवादाचीं स्वप्नें प्रत्यक्षात उतरवितां येणें स्वतःच्या दुबळेपणानें अशक्य झाल्यामुळें विफल झालेलें आहे. ध्येयवादाच्या दृष्टीनें जसें त्याचें जीवन वाया गेलें आहे तसें व्यावहारिक दृष्टीनेंहि तें वाया गेलेलें आहे. विद्याधराची पत्नी मिरा हिला हें शल्य बोचत आहे. तिचा भाऊ मनोहर हाहि व्यावहारिक दृष्टीनें असाच अपेशी आहे. आपला भाऊ आणि नवरा हे गुणी असून दोघां-

ण्याहि आयुष्याची अशी परवड कां व्हावी या विचारानें मिरा नेहमीं कष्टी आहे. आपला नवरा सुशील, सहृदय आणि कल्पक असतांनाहि तारुण्याच्या ऐन उमेदींत जीवन कोळपून जाण्याचा प्रसंग त्याच्यावर कां यावा या प्रश्नाचें उत्तर तिला सांपडत नाहीं. 'ढोंगाची आणि फसवेगिरीची' चीड येवढाच काय तो त्याचा दोष तिला दिसतो. पण तो खरोखर दोष आहे कां? "जगाच्या व्यवहाराची उभारणी काय ढोंग आणि फसवेगिरी यांच्या पायावर झाली आहे कीं, ज्यामुळें त्याच्यासारख्या सहृदय आणि प्रामाणिक माणसाला कुठें थारा म्हणून मिळूं नये? जगाचें धारक तत्त्व काय संभावित स्वार्थपरायणता हें आहे कीं, ज्यामुळें त्याच्यासारख्या ध्येयवादी माणसाच्या जीवनाला कुठें घर म्हणून सापडूं नये?" असे अनेक प्रश्न तिच्या मनांत काहूर करीत आहेत.

एकंदरींत विद्याधराचें जीवन उच्च ध्येयवादाच्या दृष्टीनें व साध्या व्यावहारिक दृष्टीनेंहि विफल झालेलें आहे. सध्याच्या समाजरचनेंत निःस्वार्थ ध्येयवादाला व भलेपणाला स्थान नसल्यामुळें त्या समाजाची पुनर्घटना झाली पाहिजे असें मिराला वाटतें. त्या 'नव्या संसारां'त ध्येयवादाला आणि उच्च जीवनाला खास स्थान मिळेल अशी तिला आशा आहे. ती म्हणते, "सध्याच्या समाजरचनेंत तुम्हांला स्थान नाहीं हा तुमचा दोष, ही तुमची अपात्रता नव्हे, हा समाजाचा उणेपणा, ही समाजाची असमर्थता आहे. आपल्यापेक्षां अधिक प्रगत आणि उन्नत अशा माणसांच्या गुणांचं आणि ध्येयवादाचं चीज करण्याइतकं औदार्य त्याच्या ठिकाणीं नाहीं. समाजाचं हें वैगुण्य नाहींसं करण्याच्या दृष्टीनं त्याच्या पुनर्घटनेचा विचार करणं हें तुमचं कर्तव्य आहे." (पृ. ४२)

## जीर्ण संस्कृतीचे अवशेष

विद्याधराची पत्नी मिरा हिची मैत्रीण सरला ही पब्लिक प्रॉसिक्यूटर भय्यासाहेबांची पत्नी. सरलेच्या आग्रहावरून मिरा विद्याधरासह भय्यासाहेबांनीं आपल्या शेतावर दिलेल्या हुरडा पार्टीसाठीं जाते. त्याठिकाणीं दांभिकपणा, कृत्रिमपणा व उसनें सौजन्य यांचा अतिरेक विद्याधराला पाहावयास सांपडतो. पार्टीसाठीं जमलेल्या श्रीमंत व लब्धप्रतिष्ठित मंडळींच्या

वरकरणीं स्वाभाविक वाटणाऱ्या, पण वास्तविक पराकाष्ठेच्या कृत्रिम वागण्यामुळें विद्याधराच्या मनांत एकप्रकारचा तिरस्कार उत्पन्न झाला. " पण आमची एकंदर शिष्ट संस्कृतीच मुळीं या प्रकारची नाहीं का ? त्या संस्कृतीचें हास्य, सौजन्य, प्रेमळपणा या सगळयांत दर्शनी भागच जास्त नसतो का ? " असे विचार त्याच्या मनात आले. एका बाजूला प्रतिकूल समाजस्थितीमुळें ज्याचें व्यावहारिक जीवन विफल झालें आहे व ध्येयवाद कृतींत उतरविण्याइतपत कठोरपणा अंगीं नसल्यामुळें त्याहि बाबतींत ज्याला अपेश प्राप्त झालें आहे असा विद्याधर व तत्सम लोक, व दुसऱ्या बाजूला श्रीमंतीच्या तोऱ्यांत वागणारे आणि कृत्रिम हास्य व सौजन्य यांचा वर्षाव करणारे भय्यासाहेब व त्याचे दोस्त पपूशेठ इत्यादि लोक. असा हा अपरिहार्य विरोध आपल्या सामाजिक स्थितींत आहे यांत काहीं शंका नाहीं. आणि यामुळेंच ध्येयवाद व उच्च जीवन ही एक थट्टेची बाब होऊन बसली आहे. कारण, भय्यासाहेबांच्या वर्गातील लोक आपले विचार भोंवतालच्या समाजावर केवळ पैशाच्या जोरावर अनेक वेळा लादीत असतात. जगण्यासाठींच विषम व दारुण झगडा एका बाजूला चाललेला असतो व दुसऱ्या बाजूला ' बंगला, मोटार, भरभक्कम विमा, गलेलठ्ठ बँक बॅलन्स यांच्या पलिकडे ' ज्यांना कसलेंच ध्येय नाहीं आणि ' क्लब, सिनेमा, पिकूनिक् आणि बिलिमोरिया यांच्या पलिकडे ' ज्यांना आयुष्य नाहीं असे धनसंपन्न लोक व त्याच्या त्या ' नटव्या, लिवलिवित बाहुल्या. ' या नटव्या, लिवलिवित बाहुल्यांचा व आपल्या दरिद्री देशांतील कंगाल लोकांच्या असह्य जीवनाचा कधीं तरी आणि कसला तरी संबंध येतो काय ? ज्या भयंकर आर्थिक वैषम्यामुळेंच असले अत्यंत विरोधी नमुने समाजांत एकाच ठिकाणीं दिसूं शकतात, व ज्यामुळें हे जीर्ण संस्कृतीचे वारसदार अजून मिजाशींत वावरूं शकतात, व भोंवतालच्या लोकांना उपसर्ग देऊं शकतात तें आर्थिक वैषम्य अनेक सामाजिक दुःखाचें मूळ आहे व तें नष्ट झाल्याशिवाय ' नवे संसार, ' नवी समाजरचना निर्माण होणें शक्य नाहीं असें विद्याधराला वाटणें स्वाभाविक आहे.

असल्या या समाजांत वावरणाऱ्या भय्यासाहेब, पंपूशेठ इत्यादि मूर्ख व दांभिक मंडळींनीं आणि त्यांच्या तितक्याच मूर्ख जातभाईनीं म. गांधींची

व त्यांच्या तत्त्वज्ञानाची हेटाळणी करावी हाहि एक अजब प्रकार आहे यांत शंका नाहीं!

या टोळींतल्या व्यसनी माणसांच्या चैनी व बेजबाबदार आयुष्याशीं विद्याधर कधींच समरस होऊं शकत नाहीं. त्यांच्याबरोबर रेस्टोरांमध्यें जाऊनहि तो अभक्ष्यभक्षण व अपेयपान करीत नाहीं. त्याच्या विरक्तपणाची ते चेष्टा करतात. त्याच्या निर्व्यसनीपणाचा पंपूशेठ पुढीलप्रमाणें विपर्यास करतो-"पण, विद्याला व्यसनं नाहींत असं कशावरून समजता तुम्ही भय्यासाहेब? अहो तो साहित्यिक आहे. त्याच्याकडे अनेक तरुण मुलं नू मुली मोठ्या आदरानं येतात...माझं तर असं मत आहे कीं, माणसाला एखादं जबरदस्त व्यसन असलं म्हणजे तें लोकापासून लपवून ठेवण्यासाठीं सोवळेपणाचा आव आणावा लागतो त्याला." यावर विद्याधरहि चिडतो व त्याच्या पुरोगामित्वाच्या पोकळ बढाया, इतराच्या गुणांविषयीं मत्सरी तुच्छताबुद्धि आणि माणुसकीच्या मर्यादांचा विसर पाडणारी चैन यांवर भयंकर टीका करतो.

माणसाचें जीवन 'पूर्ण आणि समृद्ध' असलें पाहिजे असें पंपूशेठ आग्रहपूर्वक म्हणतो. पूर्ण आणि समृद्ध जीवन म्हणजे 'चैनीचें मोकाट आयुष्य' असा विद्याधर मार्मिक टोला मारतो. 'भोगलोलुप' हें विशेषण अशा लोकांना तो बहाल करतो. हा 'बेछूट चैन करण्याचा पंथ' आहे असें तो स्पष्टपणें म्हणतो. "त्याला ना मनाची लाज ना जनाची. मोठ-मोठ्या सोज्वळ शब्दांनीं शृंगारलं म्हणून कांहीं हिडीस स्वार्थी अन्तरंग लपत नाहीं या तत्त्वज्ञानाचं." (पृ. १२३)

## उच्च बौद्धिक वर्गाचें अंतरंग

भय्यासाहेबाच्या शेतावरील पार्टीच्या निमित्तानें जे लोक तेथें जमले होते त्यांच्यावर टीका करून विद्याधरानें स्वतःस उच्च समजणाऱ्या संपन्न वर्गातील बौद्धिक जीवन घालविणाऱ्या लोकांचें अंतरंग चांगल्या प्रकारें प्रकट केलें आहे. जीर्ण संस्कृतीच्या या अवशेषांचा भोंवतालच्या समाजावर जो अनिष्ट परिणाम होतो तो विचारांत घेतला असतां त्याच्या अंतरंगाची जाणीव असणें अगत्याचें आहे. या वर्गातील

माणसांची स्वाभिमानशून्यता मोठी विलक्षण असते. परकी सत्तेच्या आश्र-यानेंच ऐश्वर्याला चढलेल्या या लोकांनीं त्या सत्तेची खुषामत करण्याचें तंत्रच शोधून काढलें असलें तर त्यांत नवल नाहीं. महाराष्ट्रांत ब्रिटिश राजसत्ता सुरू झाल्यावर साहेब हें या वर्गाचें परात्पर दैवत बनलें. पूर्वी जेव्हां येथें मुसलमानी अमदानी भरभराटलेली होती तेव्हां याच लोकांच्या पूर्वजांनीं मुसलमानाची आराधना करून आपला ऐहिक उत्कर्ष भरपूर साधला होता. त्यावेळीं या लोकांनीं मुसलमानी पोषाख धारण करून मुसल-मानी सण साजरे केले असतील. ब्रिटिश अमदानीत ते साहेबांचें अंतर्बाह्य तंतोतंत अनुकरण करून नाताळसारखे सण साजरे करीत आहेत व गुढी पाडव्यापेक्षा जानेवारीच्या पहिल्या दिवसाचें महत्त्व अधिक मानीत आहेत. उद्या दैवयोगानें आणखी कोणाचें राज्य येथें आलें तर त्याची खुषामत करून आपली चैन साधण्यास हे लोक मागें पुढें पाहणार नाहींत. "असले हे लाळघोटे लोक, हे जातिवंत गुलाम ज्या राष्ट्रांत अधिकारपदें भोगीत आहेत, ज्या राष्ट्रांतील संपन्न वरिष्ठ वर्ग असल्या संधिसाधु हांजीखोरांनीं बुजबुजलेला आहे, त्या राष्ट्राचें डोकें पारतंत्र्यातून कसें निघणार! पैशासाठीं, अधिकारासाठीं, मानसन्मानासाठीं हपापलेले आणि त्याकरितां वाटेल तीं कर्मे करणारे हे लोक म्हणजेच आपला उच्च, संपन्न, बौद्धिक समाज! नीति, राष्ट्राभिमान आणि माणुसकी यांची ज्यांना यत्किंचितहि चाड नाहीं असा हा बड्या प्रतिष्ठितांचा वर्ग!" याच लब्धप्रतिष्ठितांमुळें आपलें सारें सामाजिक व बौद्धिक जीवन अगदीं सडून गेलें आहे हें विद्याधराचें मत बहुंशीं बरोबरच आहे हें डोळस जो कोणी असेल त्याला सहज दिसून येईल!

एकीकडे हें कृत्रिम, विलासी जीवन आणि दुसरीकडे कंगाल कष्टजीवी समाज, दुःखाच्या खाईत प्रतिक्षणीं पिचून जाणारें खुरटें 'कष्टिक' (हा खास माडखोलकरी शब्द आहे.) जीवन यांतील भयंकर विरोध विद्या-धराला फार जाणवतो.

## बौद्धिक प्रेम

भय्यासाहेबांच्या हुरडापार्टीच्या प्रसंगीं विद्याधरचा मुक्ता गोळवल-करशीं औपचारिक परिचय होतो. कांहीं दिवसांनीं योगायोगानें ती त्याला

नागपुरांत पुन्हां भेटते. रात्रीं तो एकटाच फिरावयास गेला असतां भज-नाचे ' आर्त ' सूर ऐकून थबकतो. अचानक दार उघडून मुक्ता बाहेर येते, त्याला ओळखते व आंत घेऊन जाते. आणि अशा रीतीनें त्यांची पूर्वीची औपचारिक ओळख दृढ होण्याची संधि येते. ती त्याला पोच-विण्यासाठीं बाहेर पडते. तिचा निरोप घेतेवेळीं ' विद्याधराचे सोत्कंठ नेत्र तिच्या त्या भावगंभीर नेत्रांना ' भिडले आणि त्यानें हात पुढें केला. क्षण-भरच तिला वाटलें कीं आपण हात पुढें करूं नये. " पण तो विचार अत्यंत प्रबळतेनें, विजेच्या वेगानें आणि प्रखरतेनें, अंतःकरणांत कडाडून उठत असतांनाच तिनें एकदम हात पुढें केला. "

या ' योगायोगा 'मुळें विद्याधर व मिरा या जोडप्याच्या प्रेमळ संसा-रांत विकल्प उत्पन्न झाला हें मात्र खरें. विद्याधर मुक्ता गोळवलकरकडे आकृष्ट झाला होता यांत शंकाच नाहीं. मग हें ' वासनिक ' प्रेम असो किंवा ' निरागस ' व शुद्ध असें ' प्लेटॉनिक लव्ह ' असो.

## क्रांतीच्या मार्गावर

यानंतर विद्याधर शाळेच्या सुपरिंटेंडंटशीं भांडून राजीनामा देतो व एका विमा कंपनीचा चीफ एजंट होतो. मुक्ता सुद्धां त्याच कंपनीची स्त्रीविभागाची व्यवस्थापिका होते. दोघेहि एकाच ऑफिसांत एकत्र काम करूं लागतात. स्वाभाविकच त्यांचा स्नेह वाढत जातो. आणि विद्या-धर व मिरा यांमधील अंतर दिवसेंदिवस वाढूं लागतें. हें प्रकरण शेवटीं इतरांच्या डोळ्यांवर इतकें येतें कीं, पंपूशेठ त्यांची कुत्सित चेष्टा चारचौघात करूं लागतो. एक गंमत अशी कीं, " विद्याधर चीफ एजंट झाले तरच मी काम करीन " असा मुक्तानें आग्रहच धरला होता. पंपू-शेठनें मग चेष्टा कां न करावी ?

विद्याधर ज्या कंपनीचा नागपूरमधील चीफ एजंट असतो त्याच कंप-नीचा दिनकर जोशी हा वऱ्हाडचा चीफ एजंट असतो. त्याचें वास्तव्य अकोल्यास असे. त्याची व विद्याधरची पूर्वी ओळख झालेली होती. व्यवसाया-निमित्त दोघांचा पुनः संबंध येतो. दिनकर बाह्यात्कारी विमा कंपनीचा एजंट असला तरी आंतून कटाची तयारी करीत होता. राजकीय दरोडा घालणें

हा त्याच्या कटाचा उद्देश होता. दिनकरच्या या ध्येयवादांत अखेर विद्याधर गुरफटतो व दरोड्याच्या कटांत दिनकर विद्याधरला सामील करून घेतो. 'मुक्तात्मा' कादंबरींत जसा चंद्रशेखर हा ध्येयनिष्ठ क्रांतिकारक आहे तसा या कादंबरींत दिनकर आहे. चंद्रशेखर ज्याप्रमाणें कोणत्याहि मोहापासून अलिप्त राहण्याचा आटोकाट प्रयत्न करतो त्याचप्रमाणें दिनकरसुद्धां स्त्रीप्रेम आपल्या ध्येयाच्या आड येईल म्हणून अविवाहित राहतो. उलट, चंद्रशेखरचा जोडीदार केशव ज्याप्रमाणें 'कातर' दिलाचा आहे व सुमतीशीं एकांत मिळाल्याबरोबर अंतःकरणावरील ताबा उडून तो आपली ध्येयनिष्ठा विसरतो व तिचें चुंबन घेतो त्याचप्रमाणें विद्याधरहि मुक्तेच्या बाबतींत असाच मोहवश होतो हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

दिनकर विद्याधराजवळ नव्या युगमानाचें जें विवेचन करतो तें मोठें चिंत्य आहे. दिनकरच्या मतें, जागतिक युद्धाच्या ज्वाळांनीं होरपळत असलेल्या या जगांत स्वास्थ्याची अपेक्षा करणें करंटेपणाचें लक्षण आहे. इंग्रज अमदानींत गेलीं दीडशें वर्षें आपल्याला स्वास्थ्याची इतकी विलक्षण संवय झाली आहे कीं, आपल्याला रक्ताची भीति वाटायला लागली आहे. अत्यंत वाईट गोष्ट अशी कीं, लोकांच्या 'रक्तांतली प्रतिकाराची, साहसाची आणि शौर्याची ईर्ष्या अजिबात गारद करून टाकण्याचं शतकृत्य' इंग्रजांनीं करून दाखविलें आहे. दीडशें वर्षांच्या 'रामराज्यामुळें' लोक अक्षरशः शेळ्यामेंढ्यांच्या सदरांत येऊन बसले आहेत. आणि यामुळें भोंवतालीं अनन्वित संहार होत असतांहि 'आम्ही हिंदुस्थानातले लोक मात्र स्वास्थ्याची आणि शांततेची अपेक्षा करीत आहोंत.' (पृ. २०३)

पण आतां मात्र ब्रिटिशांनीं जो 'शांततेचा अमानुष शाप' हिंदुस्थानाला दिलेला होता त्याच्यांतून मुक्त होण्याची शक्यता निर्माण झाली आहे. ही 'मरणप्राय शांतता,' 'अमानुष शांतता,' हें 'विषारी अभद्र स्वास्थ्य' ताबडतोब नष्ट झालें पाहिजे असें दिनकरला मनापासून वाटत आहे. "या शांततेच्या दारुण परिणामांच्या जाणीवेनं देशांतलीं सगळीं सुबुद्ध, सुविद्य मनं जेव्हां निराशून, चवताळून जातील, तेव्हांच शाप संपेल हा आमचा. कारण ही चिडलेली, चवताळलेली युयुत्सु निराशाच क्रांतीला जन्म देत असते." इंग्रजांच्या रामराज्यांत स्वास्थ्य भोगावयाला

सांपडल्यामुळें भयंकर तोटे झाले आहेत यांत कांहींच शंका नाहीं. यामुळें दिनकरनें अगदीं तळमळून या शांततेवर जे कोरडे ओढले आहेत ते योग्य आहेत.

## हिंदी राजकारणावर टीका

गेल्या वीस वर्षांत (म्हणजे १९२० ते १९४० या काळांत) अत्यंत क्षुद्र घटना व्यक्त करण्यासाठीं फार प्रचंड शब्द वापरण्यात आले अशी विद्याधराची तक्रार आहे. उदाहरणार्थ, क्रांति, संग्राम, युद्ध, सेनापति, निर्वाणीचा खलिता, सामुदायिक उठावणी इत्यादि शब्द पहावे. या प्रचंड शब्दांचा राजकारणांत झालेला सुळसुळाट विद्याधराला मंजूर नाहीं. "गेल्या वीस वर्षांत पवित्र आणि शक्तिशाली शब्दांची जितकी विटंबना हिंदी राजकारणात झाली, तितकी ती पूर्वी कधींच झाली नसेल." विद्याधराचा सारा रोख महात्मा गांधींनीं प्रणीत केलेल्या तत्त्वांवर व त्यांनीं सुरू केलेल्या सत्याग्रहाच्या चळवळीवर आहे हें अगदीं स्पष्ट आहे. विद्याधरासारख्या कचदिल आणि मोहवश माणसानें गांधीयुगांतील निरनिराळ्या चळवळींची अशी हेटाळणी करावी हें अजब शौर्य आहे खरोखर! गांधीजींच्या सत्याग्रही राजकारणाची चेष्टा करण्यासाठीं व त्याचें वैयर्थ्य पटविण्यासाठीं माडखोलकरांनीं माणसें काय लाख निवडलीं आहेत पण!

म. गांधींच्या सत्याग्रहाची थट्टा करणारा हा धडाडीचा वीर क्रांति करूं चाहतो. पण त्यासाठीं 'बुद्धि आणि ज्ञान' याखेरीज दुसरें कोणतेंच भांडवल स्वतःजवळ नाहीं याची त्याला लगेच जाणीव होते हें आपलें भाग्य आहे खरोखर! क्रांतीला नुसती बुद्धि पुरत नसते, त्यासाठीं साहस नांवाची चीज जवळ भरपूर प्रमाणात असावी लागते हें सत्य त्याला दिनकर पटवितो; आणि बुद्धिजीवी वर्गाचें वैगुण्यहि तो मार्मिकपणें दाखवितो—"बुद्धि आणि ज्ञान यांच्या जोडीला आणखीहि एक गोष्ट हवी. ती म्हणजे साहस. आणि तें तर मुळींच नाहीं बुद्धिजीवी वर्गांत." (पृ. २०६)

## बौद्धिक प्रेमाचा विकास

मुक्ता आणि विद्याधर यांचें संघटन दिवसेंदिवस दृढतर होत जावें.

मागें 'भंगलेलें देऊळ' या कादंबरीची चर्चा करीत असतां म्हटल्याप्रमाणें याहि कादंबरींत झालें आहे. आपला नवरा व मुक्ता यांचा परिचय प्रतिदिनीं 'प्रतिपच्चन्द्रलेखेव' वाढत आहे हें तिला हळु हळु दिसून येऊं लागलें. सुरवातीला (नेहमींप्रमाणें) तिला त्या दोघांच्या परिचयात शंकास्पद असें कांहींच वाटत नाहीं. पण तिची 'प्रेमळ' मैत्रीण सरला तिच्या मनात प्रथम असूया निर्माण करते. मिरेला आपल्याबरोबर घेऊन पचमढीस कांहीं दिवस हवापालट करण्यासाठीं जाण्याचा ती बेत करते. पण, मग विद्याधराच्या जेवणाची सोय काय असा प्रश्न मिरेपुढें निर्माण होतो. तेव्हां तो मुक्तेकडे जेवावयास जाईल असें सरला सुचवते. त्याला हें कसें आवडेल असा यावर मिरा प्रश्न विचारते. सरलाचा व आपला इतका घरोबा असूनहि तिच्याकडे जातांना विद्याधराला संकोच वाटतो. मग मुक्तेकडे तो कसा जेवावयास जाईल असें मिरेला कोडें पडतें. सरला यावर स्पष्टपणें म्हणते–" मी फक्त तुझी मैत्रीण आहे, त्यांची नव्हे!"

येणेंप्रमाणें विद्याधर व मुक्ता यांच्या स्नेहासंबंधीं मिरेच्या मनांत विकल्प निर्माण करण्याच्या बाबतींत सरला यशस्वी होते. तरीसुद्धां मिरा आपला कांक्षेखोर स्वभाव प्रकट करीत नाहीं. विम्याच्या कामानिमित्त त्या दोघांचा रोज निकटचा संबंध येणारच. पण त्यांत संशय घेण्यासारखें काय आहे असें ती सरलेला विचारते. या बाबतींत मिरा अजून भोळी व अजाण 'बालिका' आहे दिसून आल्यामुळें प्रगल्भा व ज्ञानी सरला तिला सुजाण करण्याच्या इराद्यानें म्हणते, " नवऱ्याचं आपल्यावर प्रेम आहे एवढ्यावरच संतुष्ट असतां कामा नये कोणत्याही स्त्रीनं ! पुरुष एका वेळीं अनेक स्त्रियांवर प्रेम करूं शकतो आणि तेंहि सारख्याच उत्कटतेन !" स्त्रीचें पुरुषावरील प्रेम व पुरुषाचें स्त्रीवरील प्रेम या दोहोंतील फरक मागें 'भंगलेल्या देवळा'तील अनूनें स्पष्ट केला होता हें वाचकांस आठवत असेलच. " स्त्रियांनीं प्रेमाचें एवढें स्तोम माजवावें आणि पुरुषांनीं ती केवळ करमणुकीची चीज मानावी !" हें अनूचें आणखी एक वाक्य लक्षांत ठेवावें. (भं. दे. पृ. ८३) आतां या शास्त्रांतील पंडिता सरलाबाई काय सांगतात तेंहि आपणास पहावयास पाहिजे. पुरुष एकाच वेळीं अनेक स्त्रियांवर सारख्याच उत्कटतेनें प्रेम करूं शकतो हें

तिच्या 'लोकशास्त्रांतलें महावाक्य!' स्त्रियांच्या बाबतींत तिचें म्हणणें असें कीं, स्त्री एकाच वेळीं अनेक पुरुषांवर प्रेम करूं शकत नाहीं. एखाद्या पुरुषावर जेव्हा ती प्रेम करते तेव्हां तो पुरुष तिचें सर्वस्व बनतो. त्याच्याखेरीज तिला स्वतंत्र अस्तित्वच उरत नाहीं. हें सारें प्रवचन अगदीं मागें अनूनें केलेल्या प्रवचनासारखें आहे हें सहज दिसून येईल. अनू म्हणते, "प्रमासाठीं सर्वस्वाचा त्याग फक्त स्त्रीनंच करावा. ती जेव्हां प्रेम करते, तेव्हां प्रियकराशिवाय वेगळं अस्तित्व तिला मुळीं उरतच नाहीं.—तिच्या जीवनाचा ओघ त्याच्या जीवनांत मिसळून जातो, नाहींसा होऊन जातो." (भ. दे. पृ. ३५) विवाहित पुरुष हा वाटेल तेव्हां दुसऱ्या स्त्रीकडे वळतो; पण विवाहित स्त्री मात्र अपरिहार्य कारणांमुळेंच दुसऱ्या पुरुषाकडे वळते असें सरलेचें म्हणणें आहे. याबाबतींत तिचा सिद्धान्त पुढीलप्रमाणें आहे—"पुरुष एकाच वेळीं अनेक स्त्रियांवर प्रेम करतो तें रुचिवैचित्र्यामुळं. आणि स्त्री एका पुरुषाकडून दुसऱ्या पुरुषाकडे वळते, ती असंतोष किंवा प्रतारणा यांच्यामुळं. स्त्रीच्या प्रेमांत आत्मार्पणाची भावना आणि स्थैर्य हें अधिक आहे. पुरुषाच्या प्रेमांत फक्त क्रीडेची, आत्मतृप्तीची भावना असते." (पृ. २३०)

## क्रांतीचे स्फोटक अंगार

युद्धानंतरच्या काळांत कदाचित् अंतर्गत यादवी होईल, आणि तशी यादवी न झाली तरी 'आर्थिक पिळणूक असह्य झाल्यामुळें गांजलेले निरनिराळ्या प्रकारचे दलितवर्ग' उठावणी करतील. आणि यासाठीं कांहींतरी तयारी केलीच पाहिजे असें विद्याधराचें मुक्तेला सांगणें आहे. भावी काळांत जी चळवळ होणार ती अनत्याचारी न राहतां अत्याचारी होईल असें त्याला वाटतें. ही अत्याचारी चळवळ व पूर्वी होऊन गेलेल्या अत्याचारी चळवळी यांमधील फरक तो पुढीलप्रमाणें स्पष्ट करतो—"जुने क्रांतिवादी हे शांततेच्या काळांत गुप्त मार्गांनीं आणि तुटक साधनांनीं उठावणीचा प्रयत्न करीत होते. आमचें धोरण आगामी अशांततेचा, युद्धानंतर माजणाऱ्या अराजकाचा फायदा घेण्याचं आहे." (पृ. २५१) अशा रीतीनें विद्याधराच्या अंतश्चक्षूंपुढें असलेली ही चळवळ अत्याचारी

असलेली ही चळवळ अत्याचारी होणार असली तरी नवीन क्रांतिकारक 'जरूर तेवढाच अत्याचार' करतील अशी मात्र तो ग्वाही देतो. कोणत्याहि जुनाट रचनेचा विध्वंस करतांना थोडेंबहुत क्रौर्य, थोडीबहुत अमानुषता अपरिहार्य आहे असें त्याला वाटतें. पारतंत्र्यामुळें तरुण पिढीच्या उन्नतीच्या सर्व वाटा खुंटल्या आहेत; आणि पारतंत्र्यानें उत्पन्न झालेल्या शांततेमुळें तरुण मनाचा तेजोवध झालेला आहे. 'हें पारतंत्र्य आणि ही शांतता यांच्याइतका अघोर नैतिक अत्याचार' जगांत दुसरा कोणताहि असूं शकणार नाहीं असा विद्याधरचा सिद्धांत आहे. जे राजकीय दरवडे क्रांतिकारकांना घालणें भाग पडेल त्याच्याविषयीं तो म्हणतो, "आमच्यासारख्यांनीं घातलेले डाके हे त्या सामुदायिक, नैतिक अत्याचारापुढें 'दर्यामें खसखस' ठरतील केवळ! त्याचे हेतु आणि परिणाम लक्षात घेतले पाहिजेत, तसेंच त्याचें तुलनात्मक नैतिक स्थानहि ध्यानांत घ्यायला हवें."

मुक्ता जडवादी नाहीं; मनानें आणि संस्कारानें ती अध्यात्मवादी आहे. त्यामुळें साध्याइतकींच साधनेंहि पवित्र आणि उन्नत असलीं पाहिजेत असें तिला वाटत आहे.

आणि विद्याधर पुन्हां एकदा बुद्धिजीवी वर्गाच्या दौर्बल्यावर कडक टीका करीत आहे. "आपल्या बुद्धिजीवी वर्गाचा हा मोठा दोष आहे कीं, धाडसाची कोणतीहि कल्पना त्याला पटत नाहीं; आणि त्यामुळंच क्रांतीच्या कोणत्याहि उठावणींत तो उडी घेत नाहीं."

## बौद्धिक प्रेमाचीं फळें

विद्याधर आपल्याला न कळवतां मुक्तेकडे गेला हें कळल्याबरोबर मिरेला भयंकर राग येतो व ती चिडून त्याला म्हणते, "आतां मी पचमढीला गेल्यावर तुम्ही मुळीं राह्यलाच जा मुक्ताबाईकडे!" आपला मुक्तेशीं 'तसा कोणत्याहि प्रकारचा संबंध' नाहीं हें विद्याधर अगदीं जीव तोडून तिला सागतो पण थोड्याच वेळापूर्वी मुक्तेचा निरोप घेताना बोलतां बोलतां त्यानें तिचे हात 'घट्ट' धरले होते व मुक्तेनेंच त्याला सावध केलें होतें हें लक्षांत घेतलें असतां त्यानें आतां जी ग्वाही दिली आहे तिच्यांतील

सत्य कोणत्या प्रकारचें आहे याची तावडतोब कल्पना येईल. विद्याधराचा आपल्या मनोविकारांवर अगदींच बेताचा ताबा आहे. उलट, गड-कऱ्यांच्या महेश्वराच्या भाषेंत बोलावयाचें झालें तर, 'कुंवारपणाला न शोभण्याजोगें' कांहीहि त्याच्या हातून घडूं नये याची मुक्तेलाच काळजी लागून राहिली आहे. तो भावनोद्रेकानें 'अशरण' झालेला दिसतांच ती त्याला म्हणते, "तुमच्याविषयीं माझ्या मनांत वसत असलेल्या उत्कट आदरबुद्धीला धक्का देईल असं कोणतंहि कृत्य तुमच्या किंवा माझ्या हातून घडतां कामा नये." विद्याधरापेक्षां जबाबदारीची जाणीव तिलाच किती तरी अधिक आहे.

गंमत हीं कीं, आपल्या बायकोचा आपल्यावरील विश्वास पार उडाला आहे ही गोष्ट विद्याधर मुक्तेजवळ कबूल करतो. विद्याधराच्या आपल्या मनावर असलेल्या संयमापेक्षां मुक्तेचा संयम अधिक प्रभावी असला तरी त्यादिवशीं विद्याधरानें तिचे हात धरतांक्षणींच तिला 'अनिर्वचनीय सुख' होतें हें मात्र अगदीं खरें. पण, तो विवाहित असल्यामुळें आपलें प्रेम वंचनेवर आधारलेलें आहे याची तिला चांगली जाणीव होती. ही जाणीव असल्यामुळेंच केवळ, भावना अनावर होऊं लागल्या असतांहि ती विलक्षण संयम दाखविते. तिनें याबाबतींत जो असामान्य विवेक दाखविला आहे त्या प्रकारचा विवेक माडखोलकरांच्या कादंबऱ्यांत अन्यत्र कोठेंहि दिसून येत नाहीं. विवाहितांच्या संसारांतून जे प्रश्न आतां उत्पन्न होऊं लागले आहेत व ज्यांचा ताप पहिल्या पत्नीला सहन करणें भाग पडतें त्या प्रश्नांपैकीं एका महत्त्वाच्या प्रश्नाची मुक्तेनें स्वतःशींच केलेली पुढील चर्चा मोठी उद्बोधक आहे. "विद्याधरचें आपल्यावर प्रेम आहे हें सिद्धच आहे आतां. पण त्या प्रेमाच्या अभिलाषानें मिराचें जीवन आपण कां दुःखी करावें ? तिच्या संसारावर अंगार कां ठेवावा ? एका स्त्रीनें दुसऱ्या स्त्रीच्या संसाराचें मातेरें करायचें ? मग स्त्रियांच्या उन्नतीची भाषा कशाला बोलायची ? आणि शिक्षणाचा, सुसंस्कृतपणाचा तरी काय उपयोग !" (पृ. २६६)

दुसरें असें कीं, विद्याधराचें मिरेवर जें प्रेम आहे त्याची 'उत्कटता अणुमात्रहि कमी झालेली नाहीं' हें मुक्तेला अगदीं स्पष्ट दिसत आहे.

तेव्हां त्या प्रेमाचा विध्वंस करावयाचा कोणताच हक्क आपणास नाहीं असें ती स्वतःच्या मनास पुन: पुन: बजावते. मिरेचा त्याला जरी कंटाळा आलेला असला तरी तो क्षणिक असण्याचाच संभव अधिक आहे. या क्षणिक तिरस्काराचा फायदा घेऊन विद्याधराचें मन मिरेकडून कायमचें हिरावून घेण्याचा तिला धीर होईना. "प्रेम कितीहि अथांग, अमर्याद असलें तरी त्यालाही सुकती ही असतेच. त्या सुकतीच्या क्षणाचा आपण फायदा घ्यायचा ? छे ! मग आपल्या मनाची, आत्म्याची आणि जीवनाची ऋजुता, शुचिता आणि उन्नतता ती काय राहिली ?"

तात्पर्य, विद्याधराच्या मोहाला बळी पडावयाचें नाहीं असें ती ठरवितें. त्याच्या मोहाला बळी न पडतांहि 'त्याच्या साहचर्याची गोडी आपल्याला अनुभवितां येईल' असें तिला वाटतें. पण, उत्तरोत्तर वाढत जाणाऱ्या सहवासाचें पर्यवसान भलतेंच होणार नाहीं कशावरून ? स्वतःच्या मनोविकारांवर कितीहि ताबा ठेविला तरी ते अनावर झाले तर ? तिच्या मनात अनेक शंका थैमान घालूं लागतात. जाग्रदवस्थेंत जिकलेल्या भावना स्वप्नसृष्टीत अखेर दगा देतात त्याप्रमाणें नेहमीं दाबून टाकलेल्या भावना एखाद्या क्षणीं तरी स्वैर होतील अशी भीति तिला वाटूं लागते. "दबा धरून बसलेल्या वासना एकाद्या असावध क्षणीं अनावर होणार नाहींत कशावरून ?... मिराची त्याच्याविषयींची आजची संशयी, तेढी दृष्टी कायम राहिली, तर (विद्याधराला तिच्याविषयीं वाटणारा) तो मोह एक दिवस उफाळणार नाहीं कशावरून ! आणि मग त्या मोहापुढें, त्याच्या वासनेच्या त्या प्रबळ आवेगापुढें, त्या प्रभावी आकर्षणापुढें आपला निग्रह टिकेल का ?" अशी संशयपरंपरा तिच्या मनांत उत्पन्न झाली.

पण, स्वतःचें स्त्रीत्व विफल होणार याची वाट काय ? प्रणयपूर्तीचा क्षण चालून असता तो डावलणें योग्य होईल काय ? पुन्हां तिच्या मनाची चलबिचल झाली व स्त्रीत्वाच्या वैफल्याच्या कल्पनेनें तिचें हृदय भरून आलें.

विद्याधर व मिरा यांच्यामधील अंतर अधिकच वाढत जातें. 'केवळ लग्न झालंय म्हणूनच' एका घरांत तीं दोघें रहात आहेत. अशी विचित्र अवस्था विद्याधर व मुक्ता यांच्या बौद्धिक प्रेमामुळें झाली आहे. अनू व अनिरुद्ध किंवा मुकुंद व सुलोचना यांचें वैवाहिक जीवन

जसें उध्वस्त होतें तसेंच विद्याधर व मिरा यांचेंहि वैवाहिक जीवन उध्वस्त झालें आहे. फरक इतकाच कीं, अनिरुद्ध व मुकुंद हे दोघेहि स्वभावतः भोगलोलुप व व्यसनासक्त आहेत; त्यांच्या स्त्रियांपासून ते दुरावले ते बौद्धिक कारणामुळें नसून केवळ त्यांच्या अनिवार भोगलालसे-मुळें! पण विद्याधर हा स्वभावतः सालस आहे, व्यसनांपासून सर्वथा अलिप्त आहे; आणि तरीसुद्धां मुक्तेसारख्या स्त्रीशीं दृढ परिचय झाल्या-बरोबर तो आपल्या पत्नीपासून दूर दूर जातो. एकच सबब त्याला सांगतां येण्यासारखी आहे. मिरेची बुद्धिमत्ता त्याच्या बुद्धिमत्तेच्या मानानें कमी आहे, त्याच्याइतकी ती सुसंकृत नाहीं, त्याच्या इतकी ती विचारी नाहीं, त्याच्याप्रमाणें ती ध्येयवादी नाहीं. इत्यादि कारणांमुळें मुक्तेसारख्या खरो-खर सुशिक्षित, सुसंस्कृत व ध्येयवादी स्त्रीकडे आपण आकृष्ट झालों तर तें कोणी आक्षेपार्ह मानूं नये असें तो म्हणण्याचा संभव आहे. पण थोड्या विचाराअंतीं त्याचें हें आत्मसमर्थन कमकुवत आहे असें स्पष्ट दिसून येईल. मुक्ता जर त्याला भेटली नसती तर काय झालें असतें? खात्रीनें तो मिरेच्या संसारांत समाधान मानून राहिला असता व त्याच्या विचारांशीं तीसुद्धां थोडीफार समरस झाली असती! अशी काय विलक्षण व अलौकिक बुद्धिमत्ता त्याला प्राप्त झाली आहे कीं, मिरेला तिची अजिबात ओळख पटूं नये? आणि असा काय लोकविलक्षण ध्येयवाद त्यानें पहिल्यापासून उराशीं बाळगला आहे कीं ज्या ध्येयवादाच्या पूर्तीच्या मार्गांत ती विनाकारणच विघ्नं उत्पन्न करीत आहे! उलट, तिच्या बाजूनेंहि कांहीं चांगल्या गोष्टी खास सांगतां येतील. आर्थिक दुःस्थिति असतां, भोंवतालचें स्वार्थी जग त्याच्या महत्त्वाकांक्षांचा प्रत्यहीं चुराडा करीत असतां मिरेनेंच त्याच्या गरिबीच्या संसारांत गोडी निर्माण करून त्याच्या मनाला रिझविण्याची पराकाष्ठा केलेली होती.

## नव्या संसारांतील स्त्रियांचीं दुःखें

तात्पर्य, स्वतःचा कोणताहि अपराध नसतांना नवरा दुसऱ्या स्त्रीच्या मोहांत अधिकाधिक गुरफटत चाललेला पाहून व्यथित होण्याचें मिरेच्या नशिबीं आलेलें आहे. मिरेच्या संसाराचा हा विचका झालेला पाहून प्रच-

लित परिस्थितींत स्त्रियांचीं दुःखें कशीं वाढत चाललीं आहेत याचें दिग्दर्शन होतें. स्त्रिया शिकूं लागल्या, चांगल्या सुशिक्षित झाल्या तेव्हां आपलें एक मोठेंच शल्य नाहींसें झालें असें त्यांना वाटूं लागलें. आर्थिक दृष्ट्या आपण सर्वस्वीं पुरुषांवर अवलंबून असल्यामुळेंच आपलीं सर्व दुःखें निर्माण झालीं आहेत असें स्त्रियाना वाटणें स्वाभाविक होतें. बराचसा झगडा केल्यानंतर सुशिक्षित स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्यहि मिळालें, स्वतःच्या पायांवर उभे राहतां येण्याचें सामर्थ्य त्यांना प्राप्त झालें. यामुळें एक दुःख नष्ट झालें तरी दुसरीं अनेक दुःखें उद्भवलीं. आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र होऊनहि ज्या सुखाची व स्वास्थ्याची अपेक्षा स्त्रिया करीत होत्या तें सुख व स्वास्थ्य मिळेलच अशी खात्री त्यांची त्यांनाच वाटेना. रोग समूळ नष्ट व्हावा या हेतूनें एखादें रामबाण औषध घ्यावें, त्यायोगें रोगाचें एक लक्षण थांबावें, पण रोगबीज कायम रहावें; आणि मग दुसऱ्या एखाद्या औषधाच्या मागें लागावें अशी अवस्था उच्च वर्गांतील सुशिक्षित स्त्रियांच्या बाबतींतहि झाली. खरें सांगावयाचें झालें तर, स्त्रियांच्या मानसिक दुःखांत अनेक 'कॉम्प्लिकेशन्स' आहेत. त्यामुळें एक दुःख कमी झाल्यासारखें वाटलें तरी दुसरीं अनेक दुःखें तशींच राहिलीं. नवीन संसारांतील स्त्रियाना असें दिसून आलें कीं, आपण आर्थिक दृष्ट्या स्वतःच्या पायांवर उभ्या राहण्यास समर्थ असूनहि आपला बिघडलेला संसार आज आपणांस ठाकठीक करतां येत नाहीं. असे कितीतरी संसार आपणांस प्रत्यहीं पहावयास मिळत आहेत. या स्त्रिया सुशिक्षित आहेत, नोकरी करून स्वतःचें व मुलांचें पोट भरण्याचें थोडेंफार सामर्थ्यहि त्यांना आहे. पण नवरा पुनः एकदा 'नव्हाळीचें' प्रेम शोधावयाला लागून त्यांच्यापासून दूर दूर व्हावयास लागला म्हणजे त्याला परत घरांत आणण्याचें सामर्थ्य त्यांना नसतें; आणि स्वतः त्याच्यापासून दूर होण्याचेंहि सामर्थ्य त्यांच्या ठायीं उत्पन्न होत नाहीं. तो बाहेर पळत असतो आणि या त्यांच्याविषयींचें आकर्षण मारून टाकूं शकत नसल्यामुळें घरांत कुढत राहतात. आर्थिक स्वातंत्र्य अशा बाबतींत काय करणार? पुरुषांच्या बाबतींत विरक्तता अंगीं बाणविण्याचें सामर्थ्य जोंपर्यंत स्त्रियांमध्यें नाहीं तोंपर्यंत त्यांचें आर्थिक स्वातंत्र्य त्यांच्या या वैवाहिक असंतोषामुळें निर्माण झालेल्या दुःखांचा परिहार मुळींच करूं

शकणार नाहीं हें अगदीं सत्य आहे. आणि सुशिक्षित स्त्रियांचें हें विचित्र वैगुण्य मतलबी पुरुषांनीं फार चांगलें हेरलें आहे. या कमकुवतपणाचा भरपूर फायदाहि ते करून घेत आहेत हें जरा डोळसपणानें आजूबाजूच्या सुशिक्षितांच्या 'असल्या' संसारांकडे पाहिलें तर कोणाच्याहि ध्यानांत येईल.

माडखोलकरांच्या कादंबऱ्यांपुरतेंच आपलें विवेचन मर्यादित करावयाचें झालें तर काय दिसून येईल ? अनू सुशिक्षित व आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र होण्यास समर्थ होती. असें असताहि सतत बारा वर्षेंपर्यंत भोगलोलुप व अतृप्ततेच्या वेदनांनीं तळमळणाऱ्या नवऱ्याचा सहवास तिनें सहन केलाच ना ? मनाचा विलक्षण कोंडमारा होत असताहि काता नवऱ्यापासून दूर राहूं शकली नाहीं. मुकुंदाच्या बदफैली आयुष्याशीं समरस होण्याचेंच सुलोचना ठरविते. मोहनच्या व्यसनांमुळें संसाराचा विचका झाला तरी रोज त्याच्यावर प्रेमाचा वर्षाव करीत आहे आणि त्याच्यापासून दूर होऊं शकत नाहीं. प्रस्तुत कादंबरींतील विद्याधराची पत्नी मिरा आपल्या पायांवर उभी राहण्यास समर्थ आहे. पण, विद्याधर-मुक्ता यांच्या आक्षेपार्ह संघटनाचा अतिरेक होऊनहि ती स्वतःच्या परिस्थितींत कोणतीहि सुधारणा करूं शकत नाहीं. निराळ्या शब्दांत बोलावयाचें झालें तर, नवरा दुसऱ्या स्त्रीच्या नादानें आपल्यावरील प्रेम विसरून घराला पारखा होत आहे हें पाहिल्याबरोबर त्याच्यावरील आपलें प्रेम कमी करून व स्वतःच्या पायांवर उभे राहून त्याच्या वागणुकीला त्याच्याच पद्धतीनें प्रत्युत्तर द्यावयाचें हेंच मुळीं बायकांना जमत नाहीं. आर्थिक स्वातंत्र्य मिळविणें बायकांना आतां सोपें वाटत असेल. पण हें दुसरें सामर्थ्य मिळविण्याची किमया मात्र त्यांना अजूनहि साधलेली दिसत नाहीं. कारण, हा भावनांचा प्रश्न आहे. येथें कोणाचा कांहीं इलाज नाहीं. आणि जोपर्यंत स्वतःच्या भावना मारण्याची व नवऱ्याची फिकीर न करण्याची सभ्य, सुशिक्षित स्त्रियांना शक्ति येणार नाहीं तोंपर्यंत पतीच्या अन्यस्त्रीसंगापासून उत्पन्न होणारीं सारीं दुःखें त्यांना निमूटपणें सोसावीं लागणारच !

आणि याच कारणामुळें, विद्याधराची पत्नी मिरा म्हणते, "स्त्री आर्थिक दृष्टीनं स्वतंत्र झाली ह्मणजे सुखी होईल असं म्हणतों नाहीं का

आपण ! वहिनि न् मी दोघीहि आजच्या घटकेला आपल्या पायावर उभ्या आहोंत. पण काय उपयोग आहे त्या आर्थिक स्वातंत्र्याचा !" ( पृ. २९० )

व्यसनासक्त, बाहेरख्याली व बेमुर्वतखोर नवऱ्यापासून मागच्या स्त्रियांना त्रास होत नसे असें नाहीं. पण त्यांच्या दुःखांचें स्वरूप व तत्सदृश परिस्थितींत सांपडलेल्या आजच्या सुशिक्षित व सुसंस्कृत स्त्रियांच्या दुःखांचें स्वरूप यात महदंतर आहे. आजच्या स्त्रियांची खरोखर दुहेरी कुचंबणा होत आहे. सुशिक्षणामुळें व सुसंस्कृततेमुळें त्यांना कित्येक गोष्टी करणें अवघड वाटतें. जें मनाचें औदार्य आणि जो मोकळेपणा या गोष्टींची एरवी गुणांत जमा झाली असती त्याच गोष्टी त्यांना घातक होतात; व तोंड दाबून बुक्कयांचा मार अशी त्यांची केविलवाणी अवस्था होते. विशेषतः, प्रेमविवाहांत ही गोष्ट अगदीं अपरिहार्य आहे असें वाटतें. स्वेच्छेनें आपला नवरा शोधून काढल्यानंतर त्याचे 'सद्गुण' आपणच इतराना सांगणें ही गोष्ट सुशिक्षित स्त्रियांच्या मानीपणाला कमीपणा आणणारी असते यात कांहींच शंका नाहीं. आणि यामुळें मनाला असंख्य इंगळ्या डंख मारीत असतांहि आपला संसार सुखाचा आहे असें इतरांना भासविणें त्यांना नाइलाजास्तव भाग पडतें. सुशिक्षित स्त्रियांच्या मनाचा होणारा हा विचित्र कोंडमारा सरलेनें चांगला स्पष्ट केला आहे–" जुन्या बायका नवरा वाईट वागला, तर घरांत आदळआपट करून, माहेरीं गाऱ्हाणीं नेऊन न् शेजारीं बेल वाहायला जाऊन शोभा करीत असत त्याची. पण जबाबदार सुशिक्षित स्त्रीला आपल्या संसाराचे धिंडवडे उघड्या डोळयानीं मुकाट्यानें बघावे लागतात ! मनाचा मार हू का चूं न करतां सोसावा लागतो. नवऱ्याच्या चोचलेखोर चैनी मनाला ताब्यात ठेवण्याच्या वेड्या आशेनें त्याच्या व्यसनांत सामील व्हायचं न् स्वतःची मात्र अवनति करून घ्यायची सगळ्या बाबतींत. जुन्या संसारात प्रेम नसेल कदाचित्, पण निष्ठा होती, स्थैर्य होतं. नव्या संसारात प्रेमहि नाहीं, निष्ठाहि नाहीं न् स्थैर्यहि नाहीं. ". ( पृ. २९० )

नवऱ्याच्या चोचलेखार, चैनी मनाला ताब्यांत ठेवण्याच्या नादानें त्याच्या विचित्र व्यसनांना उत्तेजन देण्यामुळें ज्यांची अक्षरशः मानसिक

अधोगति झाली अशा आजच्या कितीतरी स्त्रिया सरलेचे हे कटु उद्‌गार खरे आहेत हें निदान स्वत:च्या मनांत तरी खास कबूल करतील !

## कातर दिलाचा क्रांतिकारक

राजकीय दरवडा घालण्याच्या दिनकर कट करतो; आणि या कटांत सामील होण्याचें विद्याधर ठरवितो. पण त्याचें मन मात्र एकसारखें कच खात आहे. एकांतामध्यें जणुं शेवटचीच भेट आहे या कल्पनेनें तो मिरेपुढें अश्रुसुद्धां ढाळतो. ‘आपल्या आयुष्यांत कांहीं पुन्हां रात्र यायची नाहीं अशी’ असेंहि तो भावनावशतेनें बोलून जातो. असल्या कटांत उडी घ्यावयाच्या वेळीं मन अगदीं कठोर होणें जरूर असतें. पण विद्याधराचें अवसान गळावयास लागण्याच्या बेतांत आलें आहे.

स्वत:चें मुक्तेवर प्रेम आहे हें तो मोकळया मनानें दिनकरजवळ कबूल करतो. पण मिरेवर जें प्रेम आहे त्यापेक्षां मुक्तेवरील प्रेमाचें स्वरूप आणि अपेक्षा अगदीं भिन्न आहेत असेंहि तो म्हणतो. याची साक्ष तो पुढीलप्रमाणें सांगतो, “मुक्तावर माझं कितीही प्रेम असलं, तरी मिरा-विषयींची माझ्या मनांतली आसक्ति यत्किंचितहि कमी झालेली नाहीं.” स्वत:च्या कच्च्या दिलाची खात्री असल्यामुळें तो पुढें म्हणतो, “मी एकवेळ मोहवश होऊन अविचाराला प्रवृत्त होईन; पण ती (मुक्ता) मला मर्यादेबाहेर जाऊं देणार नाहीं कधीं.” ज्याला कांहीं विशेष कार्य करा-वयाचें असेल अशा ध्येयवादी माणसानें संसाराच्या पाशापासून दूर राहिलें पाहिजे असें यावर दिनकर म्हणतो. तो स्वत: याच कारणासाठीं अविवाहित राहिला आहे.

विद्याधर कशासाठीं अकोल्याला गेला हें कळल्याबरोबर मागें वर्णिल्या-प्रमाणें त्याचा कमकुवतपण लक्षांत घेऊन, त्याच्या ठिकाणीं साहस नाहीं हें ओळखून तीं त्याच्यामागोमाग अकोल्याला जाते. त्याच्या ठिकाणीं कटाला आवश्यक असलेली धडाडी नसल्यामुळें त्याला कटांत गोवूं नये यासाठीं ती दिनकरची अक्षरश: विनवणी करते. “अशा तऱ्हेची साहस करायला जो एक मनाचा अमानुष कठोरपणा असावा लागतो, तो त्यांच्या ठिकाणीं नसावा” असें ती याचें कारण देते. विद्याधराचे एकंदर आयुष्य

पाहिलें तर त्याच्यावर उत्कट प्रेम करणारी मुक्तासुद्धां त्याच्याविषयीं असें बोलते यांत चमत्कारिक असें कांहीं दिसणार नाहीं. पण मुक्ता असें बोलली तरी प्रसंग पडल्यास त्याला वाचविण्यासाठीं ती स्वतःचे प्राणहि खर्ची घालावयास तयार आहे हें पाहिलें म्हणजे तिची धीरोदात्तता व तेजस्विता या गोष्टी अगदीं ठळकपणें दिसून येतात.

आपण ध्येयवादी असावें, आपल्या हातून कांहींतरी विशेष घडावें, कांहीं त्याग करावा अशी तळमळ माडखोलकरांच्या कादंबऱ्यांतील अनेक प्रमुख व गौण व्यक्तींमध्यें दिसून येते. पण अगदीं थोडे अपवाद वगळले तर ध्येयनिष्ठेमुळें जो एक विशेष प्रकारचा कठोरपणा अंगीं बाणतो तो बहुतेकांच्या ठायीं दिसत नाहीं. थोडक्यांत, माडखोलकरांचे बहुतेक ध्येयवादी लोक कच्च्या दिलाचेच आहेत असें म्हणावेसें वाटतें. 'मुक्तात्मा' कादंबरींतील केशव हा क्रांतिकारकांच्या पंथांत मिसळूं पाहणारा ध्येयवादी पुरुष चंद्रशेखरला केविलवाणेपणानें म्हणतो," तुझ्याइतका मी कणखर नाही. ध्येयनिष्ठेमुळें तुझ्या वृत्तींत आलेला कठोरपणा माझ्या ठिकाणीं नाहीं " (पृ. २८२). तात्पर्य असें कीं, विद्याधर दुबळा ध्येयवादी असून राजकीय कामासाठीं दरवडा घालणें इत्यादि गोष्टींना नालायक आहे. मारून मुटकून क्रांतिवादी बनविलेला हा गृहस्थ कठोर ध्येयवाद कसा सफल करून घेणार ! अंगीं साहस, धैर्य, करारीपणा इत्यादि गुण असल्यामुळें दिनकरला जें भाग्य लाभलें तें विद्याधराला कसें लाभणार ? दरवड्यासाठीं जीं सहा 'अधिकृत' माणसें ठरलेलीं होतीं त्यात विद्याधराची गणना नव्हती हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तो 'अनधिकृत' उमेदवार होता, किंवा व्यवहारी भाषेंत बोलावयाचें झालें तर तो शिकाऊ आणि होतकरू क्रांतिकारक होता. केवळ त्याला क्रांतीचा सराव व्हावा म्हणूनच दिनकरनें त्याला आपल्या टोळीबरोबर येऊन दिलें असावें.

'लग्न ठरलें, तावडतोब या' अशी सांकेतिक तार दिनकर विद्याधराला करतो. तार सांकेतिक असली तरी ती कटासंबंधींची होती. येवढा महत्वाचा कागद पुरावा म्हणून एखाद्याच्या हातीं लागला तर त्याचे केवढें भयंकर परिणाम होतील हें साधारण बुद्धीच्या माणसाला सुद्धां अगदीं सहज कळूं शकेल. बोलून चालून राजकीय दरवड्याचा बेत ! असल्या प्रकरणाशीं

संबंध असलेली तार हातांत पडल्याबरोबर विद्याधरानें ती जाळून टाकावयास अथवा अन्य कोणत्याहि उपायानें नष्ट करून टाकावयास नको होती काय ? पण, मग तो होतकरू क्रांतिकारक कसला ? ती तार तावडतोब नाहींशी न करतां विद्याधर आपल्या टेबलाच्या खणांत ठेवून देतो. त्याची पत्नी मिरा त्याची सहकारिणी जी मुक्ता तिच्याविषयींच्या स्वाभाविक असलेल्या मत्सरानें ती तार विद्याधराला न कळत टेबलाच्या खणांतून बाहेर काढते व आपली मैत्रीण सरल हिच्याजवळ देते. या सरलचा नवरा भय्यासाहेब हा गृहस्थ पब्लिक प्रॉसिक्यूटर असतो हेंहि ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. कटांत सामील असलेल्या कोणाहि माणसानें जें कधींच करूं नये असलें मूर्खपणाचें काम विद्याधरानें केलें आहे हें यावरून सहज दिसून येईल. विद्याधरावर कोर्टांत खटला चालू झाल्यानंतर वर उल्लेखिलेली तार हा एकच पुरावा विद्याधराविरुद्ध कोर्टांत दाखल करण्यांत येतो ही गोष्ट विचारांत घेतली असतां ती तार मिळतांक्षणींच जाळून टाकणें कां जरूर होतें हें कळून येईल. आणि सुमार बुद्धीच्या कोणाहि माणसानें नेमकें हेंच केलें असतें. पण माडखोलकरांनीं क्रांतिकारक म्हणून जे इसम शोधून काढले आहेत त्यांपैकीं बरेच ध्येयवादाच्या स्वप्नसृष्टींतच विहार करीत असल्यामुळें व्यवहारांतील साधी गोष्टहि त्यांच्या मेंदूंत शिरली नाहीं तर त्यांत नवल काय ?

विद्याधरानें आणखी एक मूर्खपणा केलेला आहे. दिनकरचीं त्याला वेळोवेळीं जीं खाजगी पत्रें आलीं होतीं तीं सारीं तो आपल्या ऑफिसमध्येंच फायलीला लावून ठेवतो. खाजगी पत्रें आफिसमध्यें फायलीला लावून ठेवणारा हा गृहस्थ अगदीं ‘ लाख माणूस ’ आहे यांत कांहीं शंका नाहीं. हीं सारीं पत्रें त्याची ऑफिसमधील सहकारिणी मुक्ता जाळून टाकते. ‘ ती ’ तार जाळून टाकण्याबद्दल तीच त्याच्यामागें टुमणें लावते. हें पाहिल्यानंतर विद्याधराच्या ऐवजीं मुक्ताच क्रांतिकारकांच्या टोळींत शिरली असती तर बरें झालें असतें असें वाटूं लागतें.

माडखोलकरांचा हा एकच नायक अगदीं मोक्याच्या प्रसंगीं भोंगळपणा करतो असें समजण्याचें कारण नाहीं. ‘ मुक्तात्मा ’ कादंबरींतील करारी क्रांतिकारक चंद्रशेखर यानेंहि असाच भोंगळपणा केला नव्हता काय ? निकटवर्ति सहकाऱ्याचें अगदीं महत्त्वाचें व अगदीं गुप्त असें

पत्र चंद्रशेखर टेबलावर उघडेंच टाकून देतो व नेमकें हेंच पत्र दुसऱ्या दिवशीं पोलिस ऑफिसर रावसाहेब भुजंगराव देशमुख यांच्या हातीं अगदीं अलगद पडतें व चंद्रशेखराविरुद्ध अत्यंत मोठा पुरावा उपलब्ध होतो. ('मुक्तात्मा,' पृ. २३२) येवढ्या मोठ्या क्रांतिकारकानें असला 'गहाळपणा' करावा हें अजब आहे. विषादाच्या भरांत तें पत्र उचलून ठेवावयाला तो विसरला ही सबब योग्य नाहीं. चिठ्ठी वाचून झाल्यावर ती फाडून टाकायलाच हवी होती. इतर कामें नंतर. पण माडखोलकरांचे क्रांतिकारक असला मूर्ख गहाळपणा करण्याच्या कामांत अगदीं पटाईत आहेत. 'कान्ता' कादंबरींतील उमाकांत या अर्धवट क्रांतिकारकाची वाचकांस आठवण झालीच असेल. प्रस्तुत 'नवे संसार' या कादंबरींतहि अर्धवटपणाचा एक अजब नमुना आहे. हा अर्धवटपणा विद्याधरासारख्या होतकरू आणि शिकाऊ क्रांतिकारकाकडून घडला असता तर विशेष कांहीं वाटलें नसतें. पण दिनकरसारख्या कणखर व करारी वृत्तीच्या माणसाच्या हातून तो घडलेला असल्यामुळें सदर घटनेचें विशेष महत्त्व आहे. दरोडा घालावयास जातेवेळीं टोळींत सामील असलेल्या सहा लोकांची नावें असलेला एक कागद तो मुद्दाम आपल्याबरोबर घेतो. दरोड्याच्या वेळीं गडबडींत ही चिठ्ठी त्याच्या खिशांतून खालीं पडते व तिच्यामुळें सहा कटवाल्यांपैकीं तिघाचा हातोहात तपास लागतो. ही चिठ्ठी आपल्याजवळ ठेवण्याचें दिनकरला कारणच काय होतें तें समजत नाहीं. प्रवासाला निघतेवेळीं डागाची यादी करून नंतर मुक्कामाला पोंचल्यावर यादीबरहुकुम डाग आलेत कीं नाहींत हें पाहण्यासारखेंच या क्रांतिकारकाचें हें कृत्य आहे! आणि कटांत माणसें तरी किती होतीं? तर अवघीं सहा. सहा असामींची यादी कशाला करावयास हवी? सहा नांवें लक्षांत राहणें शक्य नाहीं वाटतें? सहज लक्षात राहणें शक्य नव्हतें तर घोकून ती यादी पाठ करावयास काय अडचण होती? पण इतक्या मोठ्या कटाचा असला जबरदस्त पुरावा क्रांतिकारक टोळीच्या खुद्द म्होरक्यानें प्रत्यक्ष दरोड्याच्या वेळीं आपल्याजवळ ठेवणें ही गोष्ट माडखोलकरांच्या क्रांतिकारकांशिवाय इतर मामुली आणि व्यवहारी माणसाच्या डोक्यांत येणेंच शक्य नाहीं. 'कांता' कादंबरीमध्यें स्ट्रॅंगमनची गोळी लागून श्यामा-

सुंदरी मरते. नंतर तिचें दहन करून तिचे दोघे साथीदार अगदीं गहाळपणें सकाळीं प्रत्यक्ष स्टूॅगमन उशाशीं येऊन उभा राहीपर्यंत शांतपणानें झोपतात. माडखोलकरांच्या क्रांतिकारकांचा हा गहाळपणा खास अनुकरणीय आहे. प्रतिकूल परिस्थितीमुळें नव्हे, तर भलत्याच वेळीं केलेल्या स्वतःच्या बेजबाबदार हलगर्जीपणामुळेंच केवळ हे क्रांतिवीर आपल्यावर आपल्या हातानें संकटें ओढवून घेतात हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. चंद्रशेखर व दिनकर यांसारखे पट्टीचे आणि मुरब्बी वीरसुद्धां गहळपणा करतात. मग विद्याधरासारख्या होतकरू उमेदवाराला गाफील राहून स्वतःवर संकट ओढवून घेण्याचा हक्कच नाहीं काय?

## क्रांति आणि मोह

दिनकर आणि त्याच्या बरोबरचे लोक विद्याधरासह दरवडा घालावयास गेले असतां मुक्ता दिनकरच्या बंगल्यांत रात्रीं एकटीच राहते. रात्रीं अडीच वाजतां एकटा विद्याधर परत येतो. एकांतांत तीं दोघें काळोखांतच बराच वेळ एकाच खाटेवर बसली होतीं. त्या एकांतांत मुक्ता त्याला म्हणते, “ मला अलीकडे असं वाटायला लागलंय कीं, माझा हा स्नेह तुमच्या दुःखाला कारण होणार. ” त्यानें एकदम तिचे हात धरले आणि तिला जवळ ओढण्याचा प्रयत्न केला. आपल्या मनावरचा ताबा जातो कीं काय अशी तिला भीति वाटली. पण ती क्षणभरच. तिनें आपलें मन कठोरपणें आवरलें व त्याला म्हणाली, “ तुम्ही आपली जबाबदारी विसरूं नका. तुम्ही विवाहित आहांत......” माणसें ज्या क्षणीं मोहानें बेभान होतात त्या क्षणीं स्वतःच्या उफाळलेल्या भावना आवरून धरणारी ही स्त्री विद्याधराला दिव्य कोटींतली वाटली तर त्यांत कांहीं नवल नाहीं. तो शरमिंदा होऊन तिला म्हणतो, “ तो मोह तूं आवरूं शकतेस, त्या मोहानं बेभान होणाऱ्या मला तू आपल्या जबाबदारीची जाणीव करून देतेस, यांतच तुझा विलक्षणपणा, तुझी असामान्यता, तुझं दिव्यत्व आहे.”

विद्याधरला दरवड्याबाबत अटक होते. पण दिनकरनें पाठविलेल्या सांकेतिक तारेशिवाय दुसरा कोणताहि पुरावा न सांपडल्यामुळें तो सुटतो. विद्याधरच्या मागोमाग मुक्ता अकोल्याला गेली असें साक्षीपुराव्यांत बाहेर

आल्यामुळें मिरेला त्या दोघांच्या वर्तनाचा दाट संशय येतो. आणि यामुळें विद्याधराला फार मनस्ताप सोसावा लागतो. "मिराच्या संशयी वृत्तीमुळें होणारा मनस्ताप सोसवत नाहीं आतां" अशी तो मुक्तेजवळ तक्रार करतो. त्याचा तीव्र मनस्ताप मुक्तेला स्पष्ट जाणवत होता. त्याच्या त्या 'संतप्त डोळयांचें चुंबन घ्यावें' आणि त्याचें मस्तक आपल्या 'हृदयाशीं धरून कुरवाळावें' अशी प्रबळ इच्छा तिच्या मनांत उफाळून उठली. पण मोठ्या निग्रहानें तिनें ती दडपली.

## अपेशी ध्येयवादाचा परिणाम

शेवटीं तो 'आत्मनिर्वाण' करण्याचें ठरवितो. आत्महत्त्येचे विचार त्याच्या मनांत येऊं लागलेले पाहून मुक्ता त्याला स्पष्टपणें म्हणते, 'तुम्हाला ही जी आत्मनिर्वाणाची भाषा सुचली आहे ती भीतीमुळं मनाचा धर सुटल्यामुळं, चोहोबाजूंनीं अंधार दिसूं लागल्यामुळं.' मुक्तेनें विद्याधराच्या मनाचें केलेलें हें विश्लेषण अगदीं बिनचूक आहे. अपेशी ध्येयवादामुळें जी तीव्र निराशा उत्पन्न होणें अपरिहार्य असतें त्या निराशेच्या पोटीं विद्याधराच्या मनात हें 'आत्मनिर्वाणा'चे विचार येत आहेत हें अगदीं उघड आहे.

हिंदुस्थानांतील 'नवे संसार' यापुढें साहसाचे होणार हें धरून चाललें पाहिजे असें विद्याधराला वाटतें. आणि मिरा हा आपल्या आयुष्यांतला सर्वांत मोठा मोह आहे असें त्याच्या मनानें पक्कें घेतल्यामुळें आपल्या हातून कांहीं साहस व्हावयाचें असेल, कांहीं महत्कार्य व्हावयाचें असेल तर प्रथम मिरेचा मोह तोडून टाकावयास पाहिजे असें त्याला वाटूं लागतें. आपले हे विचार तो खुद्द मिरेजवळच बोलून दाखवितो.

शेवटीं फरारी होण्याचें नक्की ठरवून तो मुक्तेचा (मिरेचा नव्हे!) निरोप घ्यावयास जातो. ही केवळ अंधारांत उडी आहे असें मुक्ता म्हणते. यावर तो म्हणतो, "तो अंधार मला प्रकाशाप्रत नेईल अशी खात्री आहे माझी. पूर्वीच्या आयुष्यांत आतां पुन्हा शिरणं शक्य नाहीं मला. माझं मन आतां त्या जीवनांत रमणं अशक्य आहे." मिरेच्याच मोहात मन अजून घुटमळत आहे हें तो कबूल करतो. पण तिच्या मोहापेक्षां 'अधिक

उच्च, अधिक उदात्त कर्तव्य ' त्याला साद घालीत आहे; आणि म्हणून तो मोह ताडकन तोडून टाकायचा त्यानें निर्धार केला आहे.

मुक्ता त्याला अडवूं इच्छीत नाहीं. ज्या दिवशीं देशांत क्रांतीची उठावणी होईल त्या दिवशीं तिला पुन्हा भेटण्याचें तो कबूल करतो. आणि अश्रूंनीं तिचे डोळे अंध झाले असतांनाच, आणि दुःखानें तिचें मन बेभान झालेलें असतांनाच विद्याधर कोठेंतरी निघून जातो !

## असमर्थनीय

प्रत्यक्ष कोणतेंहि महत्कार्य डोळ्यांपुढें नसतांना व फरारी होण्याची कोणतीहि जरूर नसतांना विद्याधर कशासाठीं फरारी होतो तेंच समजत नाहीं. दिनकर आणि त्याचे सहकारी फरारी होते म्हणून हाहि फरारी झाला असें म्हणावें तर फरारी न होतांच कांहीं महत्त्वाचें राजकारण त्याला करितां आलें असतें; व तसाच बांका प्रसंग आला असता तर मग फरारी व्हावयासहि कांहीं हरकत नव्हती. अशी शंका येते कीं, ध्येयवादाची कल्पना कृतींत उतरविण्याची धमक अंगीं मुळींच नसल्यामुळें व अत्यंत बिकट प्रसंगींहि आपण एखाद्या अत्यंत सामान्य माणसाप्रमाणें किती विलक्षण मोहवश होऊं शकतो याची प्रत्यक्ष प्रतीति आल्यामुळें तो स्वतःवरच चिडला असावा; व तीव्र निराशेमुळें कधीं कधीं जो वैताग येतो त्या वैतागाच्या पोटीं विद्याधरानें हा विचित्र संकल्प केला असावा. मिरेवरील प्रेम हा मोह कोणत्याहि महत्कार्याच्या येत असल्यामुळें तिचाच मोह सोडावयाचा निर्धार त्यानें केला आहे हें खरें वाटत नाहीं. मिरेचा मोह हें त्याच्या आत्मनिर्वाणाचें मुळींच कारण नाहीं. मिरेच्या मोहापेक्षां त्याला मुक्तेचा मोह कितीतरी अधिक बाधत आहे हें खुद्द त्यालाहि नाकबूल करतां यावयाचें नाहीं. मिरेचा मोह म्हणजे किस झाडका पाला !

दुसरें असें कीं, त्याचें हें कृत्य अगदीं बेजबाबदारपणाचें आहे. मिरेजवळ तिच्या मोहासंबंधीं तो बोलला होता हें खरें असलें तरी कोणतीहि कल्पना न देतां त्यानें एकदम घर सोडणें हें मुळींच समर्थनीय नाहीं. खरोखर तसाच भयंकर प्रसंग आला असता, आणि त्यासाठीं घरादाराचा त्याग करून चळवळींत उडी टाकणें अगदीं अगत्याचें झालें

असतें तर त्यानें मिरेचा केलेला त्याग समर्थनीय ठरला असता. पण, डोळयांपुढें कोणतेंहि उद्दिष्ट नसतां घर सोडून जाणें हा पत्नीचा निःसंशय विश्वासघात आहे! पराभूत मनोवृत्ति हीच केवळ याच्या बुडाशीं आहे यांत शंका नाहीं.

## मोह विरुद्ध विवेक

या कादंबरींतील मुक्ता ही व्यक्तिरेखा अगदीं डोळयांत भरण्यासारखी आहे. शांताराम नाडकर्णी नांवाच्या तरुणावर पूर्वी तिचें आत्यंतिक प्रेम होतें. दुर्दैवानें तिचें त्याच्याशीं लग्न होऊं शकलें नाहीं. त्याच्याशीं तिचें 'मानसिक' लग्न झालें होतें. यानंतर विद्याधरशीं तिचा औपचारिक परिचय झाल्यापासून तो शेवटीं 'आत्मनिर्वाण' करण्याची इच्छा तिच्यापाशीं बोलून दाखवीपर्यंत तिचें चरित्र आपण काळजीपूर्वक अवलोकिलें तर या बाईविषयीं आदर वाटावा असेंच तिचें वर्तन आहे. विद्याधराविषयीं तिला शारीरिक आकर्षण वाटलें व तिच्या भावना उचंबळून येण्याचे प्रसंग मधूनमधून आले असले तर त्यांत अस्वाभाविक असें कांहीं नाहीं. प्रणयपूर्ति न झाल्यामुळें तिच्या नैसर्गिक विकारांनीं आपला प्रभाव दाखवावा हें क्रमप्राप्तच आहे. पण, मनोविकार उच्छृंखल होणें यांत कांहीं अस्वाभाविक नसलें तरी विवेकानें ते आवरून धरण्याचा प्रयत्न करणें हें मात्र विशेष करामतीचें आहे. विद्याधराचा सहवास तिला प्रिय असला तरी त्यानें मोहवश होऊन कांहीं बेजबाबदारपणा करावा हें तिला मंजूर नाहीं. मनोविकार अनावर झाल्यामुळें मनाची जी क्षुब्ध अवस्था होते ती विवेकाला तितकीशी अनुकूल नसते हें खरें असलें तरी हेंहि दिव्य पार पाडणारीं कांहीं अपवादात्मक माणसें असू शकतात. मुक्ता अशा अपवादात्मक माणसांपैकींच एक आहे. ती जितकी भावनावश आहे तितकीच विचारीहि आहे. विद्याधराच्या कमकुवतपणाची बरोबर परीक्षा करून तो कटासारख्या कामाला नालायक आहे हें कळल्याबरोबर त्यापासून त्यानें परावृत्त व्हावें अशी धडपड ती करते यांत त्याच्या ध्येयवादांत विघ्न आणण्याची तिची इच्छा आहे असें नसून मानवी मनोव्यापारांचें तिचें सूक्ष्म ज्ञानच दिसून येतें. पण हें करीत

असतांनाच, प्रसंग पडला तर त्याचे प्राण वाचविण्याठीं वाटेल तें साहस करावयासहि ती तयार आहे हेंहि विसरतां कामा नये. दिनकरकडून आलेलीं खाजगी पत्रें विद्याधरानें भोंगळपणाने ऑफिसमध्येंच फायलीला लावून ठेविलीं होतीं. तीं पत्रें तिनेंच नष्ट केली. दिनकरकडून आलेली सांकेतिक तार नाहींशी करण्यासाठीं विद्याधराच्या मागें तिनेंच टुमणें लावलें. हें पाहिलें म्हणजे भावना व विवेक या दोन्ही बाबतींत तीच विद्याधरापेक्षां कितीतरी श्रेष्ठ आहे असें म्हणावेसें वाटतें. विद्याधर विवाहित असल्यामुळें त्याला त्याच्या पत्नीपासून हिरावून घेणें हें आपल्या सुशिक्षणाला व संस्कृतीला शोभणार नाहीं येवढा अतिमानुष वाटणारा विवेक ती दाखविते. तिनें मनांत आणलें असतें तर विद्याधर व मिरा यांच्यांत वितुष्ट आणणें तिला अगदीं सोपें होतें. पण तो मोहवश झालेला दिसल्याबरोबर तीच त्याला सावध करते. तिला स्त्रीसुलभ भावना व विकार नाहींत असें मुळींच नाहीं. ती त्यांना आवरूं शकते इतकेंच. त्याच्या वासनांना आपण एकाद्या वेळीं बळी पडूं अशीहि तिला वारंवार भीति वाटते. पण, मनोविकार दाबून टाकण्यांत ती यश मिळविते.

एक शंका अशी उत्पन्न होईल कीं, मिरेच्या वैवाहिक जीवनांत विघ्न उत्पन्न न व्हावें व विद्याधरानें मोहवश होऊन बेजबाबदारपणें वागूं नये यासाठीं विलक्षण जपणारी विवेकी मुक्ता विद्याधर आपल्या बायकोपासून दुरावत आहे हें दिसून आल्याबरोबर त्याचा परिचय तोडून कां टाकीत नाहीं ? एक उत्तर असें कीं, स्त्रीला स्वाभाविक असलेले विकार तिच्याठिकाणीं प्रथम उत्पन्न झाले असतीलहि व विद्याधराविषयीं तिला 'वासनिक' प्रेम भरपूर वाटलें असेलहि. पण नंतर आपलें कांहीं तरी चुकत आहे असें दिसून येतांच ती निश्चयानें आपल्या भावना आवरून धरते. "मोहाला बळी न पडतांहि त्याच्या साहचर्याची गोडी आपल्याला अनुभवितां येईल" (पृ. २६७) असें तिला वाटतें. पण तिचा स्वतःचा आपल्या मनोविकारांवर ताबा असला तरी विद्याधराचा आपल्या विकारांवर मुळींच ताबा नव्हता याची वाट काय ! तिला ही गोष्ट अनेक वेळां स्पष्टपणें दिसून आली होती. शिवाय तो आपल्या बायकोपासून मनानें दररोज जास्तच दुरावत आहे हेंहि तिला चांगलें कळत होतें.

अशा स्थितींत मोहवश न होतांहि साहचर्याचें सुख मिळविण्याची कल्पना हास्यास्पद आहे. एकच मार्ग यांतून होता. आणि तो म्हणजे मुक्तेनें विद्याधराचा परिचय मोठ्या निर्धारानें व करारीपणानें तोडून टाकणें. हें करण्याचें तिला धैर्य झालें नाहीं हें उघड आहे. विवाहित पुरुषाचा स्वतःच्या बायकोशिवाय दुसऱ्या एकाद्या स्त्रीशीं अत्यंत निकट संबंध आला व दोघेंहि मोहवश होण्याच्या अवस्थेला जाऊन पोचलीं म्हणजे दोनच गोष्टी शक्य आहेत. त्या पुरुषानें बायकोची फिकीर न बाळगतां दुसऱ्या स्त्रीच्या मोहांत पूर्ण गुरफटणें किंवा त्या दुसऱ्या स्त्रीनें विवेकानें स्वार्थत्याग करून आपणच दूर जाणें. याखेरीज अन्य गोष्ट यासारख्या परिस्थितींत शक्य नाहीं. विद्याधर मोहवश असला तरी मुक्ता विचारी असल्यानें तिनेंच त्याचा परिचय अतिरिक्त वाढण्याच्या आंतच तोडा-वयास हवा होता. मिरा व मुक्ता या दोघींना एकत्र राहतां येणें ही गोष्ट मानवी स्वभावाशीं सर्वस्वीं विसंगत असल्यामुळें मुक्तेनें दूर जाणें येवढी एकच गोष्ट शक्य आहे. आणि तिनें ती गोष्ट न केल्यामुळेंच अखेर विद्याधराला बायको व ती या दोघींना सोडून फरारी व्हावें लागलें हें अगदीं उघड आहे. मिरेविषयीं त्याला तिरस्कार वाटूं लागला होता व मुक्ता तर त्याला मर्यादेबाहेर जाऊं देण्यास तयार नव्हती. अशा विचित्र परिस्थितींत दोघींचाहि निरोप घेणें त्याला भाग पडलें असावें. मुक्ता पूर्वींच निघून गेली असती तर मिरेकडे त्याचें मन पुन्हा खास वळलें असतें. अनेक पुरुषांच्या बाबतींत असें होतें. ते स्वभावतः भोग-लोलुप किंवा दुष्ट नसतात. क्वचित् त्याना मोह पडतो हें खरें आहे. पण मोहाचें कारण योग्य वेळींच नाहींसें झालें तर ते ताळ्यावर येतात. विद्याधर स्वभावतः दुष्ट नाहीं किंवा भोगासक्त नाहीं हें आपणांस चांगलें माहीत आहे. आणि याच कारणामुळें असें म्हणावेंसें वाटतें कीं, मुक्ता जर वेळींच त्याच्यापासून दूर गेली असती, किंवा तें शक्य नसल्यास त्याचा परिचय तिनें थांबविला असता तर ध्येयवादाच्या व कांहीं तरी महत्कार्य करण्याच्या सबबीवर विद्याधराला घर सोडण्याची गरज पडली नसती !

## गांधीवाद आणि क्रांति

प्रस्तुत कादंबरींत राजकारणावर ज्या प्रमुख चर्चा आहेत त्यांमध्यें दिनकरनें विद्याधराजवळ नव्या युगमानाचें केलेलें वर्णन (पृ. २०२-४), क्रांति व ध्येयवाद यांविषयीं त्या दोघांतील चर्चा (पृ. २०७), आगामी अशांतता, भावी यादवी व नवीन अत्याचारी चळवळ यांविषयीं विद्याधर व मुक्ता यांमधील चर्चा (पृ. २४८, २५४), गांधीवादाच्या वैयर्थ्यावर व क्रांतीच्या महत्त्वावर दिनकरचें व्याख्यान (पृ. ३०३-४) इत्यादि स्थळें उल्लेखनीय आहेत. दिनकरचा खरा रोष ब्रिटिश अमदानींतील मरणप्राय शांततेवर व लोकांना स्वास्थ्याची जी विलक्षण चटक लागली आहे तिच्यावर आहे. त्याचप्रमाणें यापुढील चळवळ अनत्याचारी न होतां अत्याचारीच होणार असें विद्याधराचें निदान आहे हें आपण मागें पाहिलेंच आहे. आतां दिनकरचें गांधीवादावरील विचार तेवढे ऐकावयाचे राहिले आहेत.

दिनकरच्या मतें आतां गांधीवादाचें हिंदी राजकारणांतील कार्य संपलें आहे. दुसऱ्या महायुद्धानें एक गोष्ट स्पष्ट केली आहे. ती अशी कीं, यापुढच्या काळांत गांधीवाद व गांधीवादी नेतृत्व या गोष्टींचा हिंदुस्थानाला कांहींहि उपयोग होणार नाहीं. गांधीवादी नेतृत्वांतील विसंगति आतां स्पष्ट दिसूं लागली आहे. एकीकडे लढ्याची भाषा व दुसरीकडे पराकाष्ठेची निष्क्रियता. "एकीकडे तोंडानें आत्यंतिक कृतीची भाषा बोलायची व दुसरीकडे आपल्या शब्दावर झुलणाऱ्या जनतेला निष्क्रियतेच्या पराकोटीला नेऊन पोचवायचं" हा अजब नमुना आहे असें दिनकरला वाटतें. एकीकडे खादीचें कुडतें घालून राष्ट्रसभेंत शिरलेले बडे भाडवलवाले कारखान्यांतून युद्धसाहित्य निर्माण करून वाटेल तेवढा नफा मिळवीत आहेत आणि दुसरीकडे गांधींच्या आज्ञेनुसार पोकळ युद्धविरोध दाखवीत आहेत व त्यासाठीं प्रसंगीं तुरुंगातहि जात आहेत. याची चीड येऊन दिनकर म्हणतो, असलें हें दांभिक, विसगत राजकारण देशाला काय दास्यमुक्त करणार!"

गांधीवादाचें कार्य आतां संपलें आहे हाच संदेश मागें 'मुखवटे' या कादंबरींतील प्रियदर्शनानें दिला होता हें वाचकांस आठवत असेलच. ('मुखवटे' पृ. ३०६). प्रियदर्शन गांधींच्या राजकारणाला आत्मनिष्ठ,

लहरी, प्रतिगामी अशीं विशेषणें देतो तर दिनकर त्यांतील दांभिकपणा व विसंगति उघड करून दाखवीत आहे.

गांधींच्या राजकारणावर टीका करून झाल्यावर दिनकर त्यांच्या अहिंसेच्या तत्त्वज्ञानाकडे वळला आहे. जगांतलें प्रत्येक सामर्थ्य अघोरी आहे अशी त्याची खात्री आहे. आपल्या राजकारणांत जिचें इतकें प्रस्थ माजलें आहे ती अहिंसा सुद्धां पराकाष्ठेची अघोरी आहे असें त्याचें मत आहे. "प्रतिकार दडपून टाकतांना, प्रतिपक्षाचा नायनाट करतांना ती सात्त्विक अहिंसा किती अघोरी बनते, तिला कसे नाना प्रकारचे अपवाद सुचतात हें गेल्या चारपांच वर्षांत पुरेपूर अनुभवाला आलंय लोकांच्या."

याठिकाणीं, कोणतेंहि तत्त्व व त्या तत्त्वाचा वापर या दोन गोष्टींत दिनकरनें घोटाळा केलेला स्पष्ट दिसत आहे. प्रत्यक्षांत वापर करताना काहीं व्यक्तींनीं आपल्या इच्छेप्रमाणें एखाद्या तत्त्वज्ञानाची ओढाताण केली व स्वार्थ साधला तरी त्या तत्त्वज्ञानाच्या स्वरूपाला यायोगें बाध कसा पोंचतो तेंच समजत नाहीं. न्याय देतांना एखाद्या न्यायाधीशानें लाच घेऊन खोटा निर्णय दिला तर ती गोष्ट त्या न्यायाधीशाच्या विरुद्ध आहे, न्यायाच्या विरुद्ध नव्हे. अहिंसेचा दुरुपयोग काहीं वेळां झाला हें विधान त्या तत्त्वाचें वैयर्थ्य पटविण्यास मुळींच समर्थ नाहीं. दुसरें एखादें बलवत्तर प्रमाण पुढें आणावयास पाहिजे. दिनकरजवळ हें सामर्थ्य नाहीं.

गांधीवादाची रेवडी उडविल्यानंतर दिनकर क्रांतीचें महत्त्व वर्णीत आहे. "क्राती हा खरोखरी अग्नीच आहे एक...याच्याइतकं स्वभावशुचि आणि स्वतःशुद्ध जगांत दुसरं काय असूं शकेल!...क्रांतीजवळ कसल्याच प्रकारचं ढोंग नाहीं; तिच्या तोंडावर कोणताच मुखवटा नाहीं."

गाधीवादावर, गांधींच्या राजकारणावर, त्यांच्या दांभिकतेवर माडखोलकरांच्या विविध कादंबऱ्यांतून जीं प्रवचनें आहेत तीं इतकीं ठराविक साच्याचीं आहेत, त्यांतले शब्दसुद्धां कित्येक वेळां इतके सारखे असतात कीं, एकच इसम निरनिराळीं नावें घेऊन हें बोलत आहे कीं काय असा भास होतो. अनेक वेळां गांधीवादाची निंदा केली आणि गांधींची हेटाळणी केली म्हणजे तर्कशुद्धतेमुळें नव्हे, तर केवळ पुनरुक्तीमुळें तरी नाजुक बुद्धीच्या वाचकांच्या गळीं आपलें म्हणणें उतरविता येईल असें

कदाचित् माडखोलकरांना वाटत असावें. "Follies often repeated lose their absurdity, and assume the appearance of reason" हें गोल्ड्स्मिथचें प्रसिद्ध वचन माडखोलकरांनीं ध्येयवाक्य म्हणून आपल्या 'अभ्यासिकें'त लावून ठेवलें असावें !

## निसर्गवर्णनें

सांकेतिक निसर्गवर्णनांची माडखोलकरांची हौस उत्तरोत्तर कमी होत चालली आहे हें आपण पाहिलेंच आहे. या कादंबरींतील निसर्गवर्णनाचीं स्थळें फक्त तीनच असून (पृ. १२५, २३५, २३६) तीं वर्णनेंहि पुष्कळ आटोपशीर आहेत. तरी 'सुनील, सतेज पश्चिम क्षितिजावर पसरलेल्या ढगांच्या काळसर रेषांतून तांबडा रंग भरल्यासारखा दिसत होता' इत्यादि ठराविक गोष्टी नेहमींप्रमाणें त्यांत आहेतच. 'चतुर्थीच्या चंद्राचें अपुरें लालसर बिंब' हि आहे व 'पश्चिमेच्या स्वच्छ व सुनील क्षितिजावर' तळपणारी गुरु व शनि यांची जोडीहि आहे. 'रस्त्यावरल्या पिंपळाच्या मोठया थोरल्या झाडाचीं नवीं हिरवींगार पानें चंद्रप्रकाशांत चमचम करीत होतीं, इत्यादि वर्णनहि नेहमींचेंच आहे !

## राजकीय चर्चांचा पाठपुरावा

या कादंबरीला सौ. शांताबाई माडखोलकरांची प्रस्तावना आहे. 'मराठी कादंबऱ्यांतील राजकीय चर्चा अस्वाभाविक असतात' या आक्षेपाचा विचार करितांना त्या विचारतात—"'पथेर दाबी' किंवा 'शेष प्रश्न' या शरद्बाबूंच्या चर्चेनें ओतप्रोत भरलेल्या कादंबऱ्या ज्यांना चालतात त्यांनीं मराठी कादंबऱ्यांतील चर्चेलाच तेवढीं नाकें कां मुरडावींत हें मला समजत नाहीं......एकीकडे कादंबऱ्या विचारप्रवर्तक हव्यात असें म्हणायचें व दुसरीकडे त्यांत चर्चा आल्याबद्दल कादंबरीकारांना नांवें ठेवायचीं, हें विसंगत नाहीं कां ?" या प्रश्नाचा आपणांस पुढें सविस्तर ऊहापोह करावयाचा असल्यामुळें सध्या त्यांचा प्रश्न ऐकून स्वस्थ बसूं !

## ८

# नागकन्या

'नवे संसार' या कादंबरीच्या संबंधांत श्री. रा. ज. देशमुख यांना लिहिलेल्या पत्रांत श्री. माडखोलकर लिहितात, "युद्धकाळांत जर कादंबरी लिहायची आणि युद्धामुळें झालेला मनाचा क्षोभ जर तींत व्यक्त करायचा नाहीं, तर मग कादंबरी लिहायची तरी कशाला?" ('नवे संसार', प्रस्ता. पृ. ३) 'नवे संसार' ही कादंबरी १९४१ च्या जुलै महिन्यांत, म्हणजे दुसऱ्या महायुद्धाच्या धुमश्चक्रींतच, प्रसिद्ध झाली. यामुळें त्या कादंबरींत स्वतःच्या मनाचा युद्धामुळें झालेला क्षोभ श्री. माडखोलकरांनीं व्यक्त केला हें रास्तच झालें. पण त्यांच्या मानसिक क्षोभाचा उद्रेक जितका अनावर झाला होता तितकाच त्याचा आविष्कारहि जोरदार झाला. तो इतका कीं, त्यांच्या मनाला एक प्रकारचा थकवा आला व कांहीं विरंगुळा मिळावा यासाठींच जणूं अवघ्या पांच महिन्या-नंतर त्यांनीं 'नागकन्या' ही कादंबरी लिहिली. या कादंबरींत राजकार-णाचा लेशहि नाहीं. जगांत कोठेंतरी प्रचंड महायुद्ध चाललें असून हिंदुस्थानालाहि त्याची विलक्षण झळ पोंचत आहे या गोष्टीची अंधुकसुद्धां जाणीव ही कादंबरी करून देणार नाहीं. तिच्यांत गांधी नाहींत, गांधीवाद नाहीं, त्यांचें 'दांभिक' व 'लहरी' राजकारण नाहीं, त्यांची अहिंसा नाहीं, त्यांच्या राजकारणाला व तत्त्वज्ञानाला विटलेल्या जलाल व तेजस्वी क्रांतिकारकांची हृदयभेदक भाषणें नाहींत—कांहीं नाहीं!

मग या कादंबरींत आहे तरी काय? संवेदनांच्या तत्त्वज्ञानाचें रसभाव-पूर्ण निरूपण आहे. 'त्याची मुशाफरी' ही माडखोलकरांची 'रातराणी' या कथासंग्रहांतील कथा किंवा 'दुहेरी जीवन' ही कादंबरी यांमध्यें संवेदनांचा (sensations) जो विचित्र हव्यास दिसून येतो त्याच प्रका-रचा हव्यास याहि कादंबरींत भरपूर दिसून येतो. 'रणांगण' या काद-बरींतील नायक व नायिका हॅर्टा यांच्यामध्यें जो अल्पकालिक प्रणयसंबंध घडून आला आहे. तसाच अल्पकालिक संबंध याहि कादंबरींत

चढून आला आहे. ' यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महोदधौ। समेत्य च व्यपेयातां तद्वद् भूतसमागमः ॥ ' या प्रसिद्ध श्लोकांत वर्णिलेल्या तत्त्वज्ञानाचा निराळ्या कारणासाठीं उपयोग करून असें म्हणतां येईल कीं, केवळ योगायोगानें एका तरुणाची एका तरुणीशीं गाठ पडते. तीं दोघें बरोबर हिंडतात, एकांतांत उन्मत्त होऊन विहार करतात आणि मग आपापल्या गांवीं निघून जातात व नुकतेंच जें कांहीं होऊन गेलें तें शांतपणें विसरून जातात. प्रस्तुत कादंबरींतील प्रणयकथेचें स्वरूप हेंच ! अर्थात् या कादंबरींत मूर्तिमंत उन्माद अक्षरशः ओसंडून वाहत आहे हें सांगणें नलगे. नग्न स्त्रीदेहाचीं अत्यंत उत्तान वर्णनें असल्या कादंबरींत यावयाचीं नाहींत तर काय राजकारणाचीं किंवा युद्धाच्या भीषण परिणामांची चर्चा करणाऱ्या कादंबरींत यावयाचीं ?

एका रमणीय चांदण्या रात्रीं नायक रंगा यानें एका मिशनरी ' नागकन्ये ' बरोबर केलेला विलास हा या कादंबरीचा विषय आहे. कथानक अवघें एक दिवसाचें आहे. अर्थात् विलासी वृत्तीचा उन्माद आणि पराकाष्ठेचा रंगेलपणा यांचेंच राज्य येथें दिसून आलें तर त्यांत कांहीं नवल नाहीं.

तापी नदीच्या कांठीं घोडीला पाणी पाजीत असतां नायकाला एकाएकी नागकन्या दिसते व थोड्याशा किरकोळ चौकशीनंतर तेथून चारपांच असलेल्या आजोबांच्या समाधीच्या ठिकाणीं स्वतःबरोबर चलण्याचा तो तिला आग्रह करतो. आणि किंचित् विचार करून ती सुद्धां तें कबूल करते.

ती भेटल्याबरोबर तिच्याशीं बोलण्यांत गोडी वाटली व तिनें आपल्याबरोबर चलावें असें वाटलें यांत नायकाला ' जन्मांतरसंगती ' चा अंश वाटला.

जणूं कांहीं तीं दोघें स्वप्नांत चालत होतीं. भोंवतालचें वातावरण एखाद्या स्वप्नापेक्षांहि सुरम्य, ' मदिर ' आणि ' उन्मादक ' होतें. शांत, एकांत अरण्य आणि बरोबर ती पराकाष्ठेची उन्मादक, आणि ' धुंद करणारं, ' ' मुसमुसणारं ' तारुण्य असलेली नागकन्या ! ' गर्द सभोंती रान साजणी तू तर चांफेकळी ' या कव्युक्तीचें प्रात्यक्षिकच तें !

वाटेंत एका वाडींत नायक मोहाच्या दारूच्या दोन बाटल्या पैदा करतो. आपली सायकल नागकन्या त्या वाडींतच ठेवते व तीं दोघें एकाच घोडीवर बसून त्या गर्द झाडींतून पुढें निघतात. ' आपला हात तिच्या कटि-

बंधाभोंवतीं घट्ट लपेटून ' तो घोडीवरील मांड बळकट करतो. चढउतार असल्यामुळें एकमेकाच्या अंगावर तीं दोघें एकसारखीं ' हळुवारपणें ' आदळत होतीं—अन् मग गोड रोमांच त्यांच्या अंगावर उभे राहत होते.

नदीपाशीं येतांच तीं दोघें खालीं उतरलीं व ' गोटयाळ ' रस्त्यानें हळुहळु चालूं लागलीं. त्यानें एका हातांत तिचा हात ' घट्ट ' धरला होता व दुसरा हात ' कटिबंधाभोंवतीं दृढतेनें लपेटलेला होता.'

ती त्याला एकसारखी त्याचें नांव विचारीत असते. त्यानें बऱ्याच वेळानें सांगितलेलें ' रंगा ' हें नांव त्याला खरें वाटत नाहीं व तिचें ' मदिया ' हें नांव त्यालाहि खरें वाटत नाहीं.

## आतां संवेदनांच्या तत्त्वज्ञानाचें निरूपण

तिनें नांव सांगण्याचा त्याला आग्रह केला तेव्हां तो अगदीं जातिवंत कवीच्या रसवंतींत बोलतो—" नांव सागून फायदा काय ? आपण मघाशीं नदीच्या तीरावर भेटलों, त्यावेळीं आपली दृष्टादृष्ट होताच पूर्वजन्मींची ओळख पटली आपल्याला......दृष्टभेट होताच जें जन्मजन्मातरींचं अदृश्य, अज्ञात सौहार्द डोळ्यांना दिसतं, हृदयाला भिडतं आणि एकमेकांना एकमेकांकडे आकर्षून आणतं, तें तसंच नामानिराळं, अज्ञात राहूं देण्यांत एक प्रकारचा आनंद, एक प्रकारचा उन्माद, एक प्रकारची अनघता नाहीं का ?...उद्यां सकाळीं किंवा दुपारीं एकमेकांना सोडून गेल्यावर पुन्हां कदा कदाचित् कधींहि भेट होणार नाहीं आपली. तेव्हां अशा या तात्कालिक जीवनाची मधुर स्मृति नावाला कशाला जखडून ठेवायची ? हें एक स्वप्न आहे ! " स्वप्न हें स्वप्न म्हणूनच भोगावयाचें असतें. ' यथा काष्ठं च काष्ठं च ' या श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें माणसांचें संबंध ' नीरस आणि निर्जीव ' असते तर फार बरें झालें असतें असें नायकाला वाटतें.

नायिकेची भेट ज्या क्षणीं झाली त्या क्षणाच्या पूर्वीचें सर्व कांहीं पूर्ण विसरून जावें व पुढच्या क्षणाचा यत्किंचित् विचार न करितां ' ही रात्र, हा एकान्त आणि प्रीति यांचा अनिर्बंध मनानं आस्वाद घ्यावा ' असं नायकाला वाटत आहे. नायकाचे हे विचार पाहिले

म्हणजे कोणालाहि ओमर खय्यामच्या पुढील ओळींची आठवण झाल्या-वांचून राहणार नाहीं—

Ah, fill the Cup:--what boots if to repeat
How Time is slipping underneath our Feet :
Unborn To-MORROW and dead YESTERDAY,
Why fret about them if To-DAY be sweet !

केवळ त्या क्षणापुरताच विचार करून मागल्या अथवा पुढल्या क्षणा-कडे पूर्ण दुर्लक्ष करून जें सुख हातीं आलें असेल त्याचा यथेच्छ उपभोग घ्यावा हें नायकाचें जीवितविषयक तत्त्वज्ञान आहे. आपल्या या तत्त्व-ज्ञानांतील कच्चे दुवे कोणते आहेत हें त्याला माहीत नाहीं असें नाहीं. तो म्हणतो, " माझी अशी समजूत होती कीं, गत जीवनाची आठवण न करिता आणि भावी जीवनावर परिणाम होऊं न देतां मनुष्य तेवढ्या वेळेपुरती मजा करूं शकेल. पण जीवनांतला प्रत्येक क्षण हा मागल्या क्षणांतून उत्पन्न झालेला न् पुढल्या क्षणाला उत्पन्न करणारा असतो." तरी सुद्धां त्याला आतां असें वाटूं लागलें आहे कीं फक्त चालू क्षणाचाच विचार करावा आणि उन्मादक प्रीतीचा मनसोक्त उपभोग घ्यावा. " तुला ज्याक्षणीं मी पाहिली, त्याक्षणींच मला जुन्या दुःखाचा विसर पडायला सुरवात झाली आणि त्या विस्मृतींतून ही नवी प्रीति निर्माण झाली...... फक्त एवढंच वाटतं कीं, मागलं सगळं विसरून जावं, पुढल्यासंबंधीं कांहींहि विचार करूं नये आणि ही रात्र, हा एकान्त, आणि प्रीति यांचा अनिर्बंध मनानं आस्वाद घ्यावा–" ( पृ. ५३ ).

प्रीतीच्या उन्मादाचें मागें 'भंगलेल्या देवळां' तील अनूनें केलेलें वर्णन वाचकांच्या चांगल्या परिचयाचें आहे. आतां प्रस्तुत कादंबरीचे नायक रंगराव त्या उन्मादाचें कसें वर्णन करीत आहेत तें पहावें. " यौवन आणि प्रीति यांच्याइतकं मादक आणि दाहक मद्य नाहीं दुसरं जगांत !... हलाहल, सुरा आणि अमृत यांची एक मूस ओतून या दोन चिजा देवानं निर्माण केल्या असाव्यात. विषाची मूर्च्छना, सुरेचा मद आणि अमृताची माधुरी हीं तिन्ही एकवटलीं आहेत यौवन आणि प्रीति यांच्या मिला-

कांत–" (पृ. ६७) सृष्टिवर्णनांचा आणि गांधीवादाच्या टवाळीचा माडखोलकरांनीं एक सांचा निर्माण केला आहे व निरनिराळ्या कादंबऱ्यांत त्या सांच्याचा त्यांनीं विटाळ्याप्रमाणें उपयोग केलेला आहे. त्याप्रमाणें इतर कांहीं गोष्टींचाहि साचा करून ठेवावा असा त्यांचा विचार दिसत आहे. प्रणयाचा उन्माद वर्णावयाचा आहे ना! करा एक सांचा तयार!" किंवा करा एखादी तबकडी तयार आणि निरनिराळ्या पात्राना ती आपापल्या फोनोवर वाजवूं द्या. प्रणयोन्मादाचें रंगरावकृत वर्णन आपण आतांच पाहिलें आहे. हें वर्णन मागें याच विषयाचें 'भंगलेल्या देवळां'त जें वर्णन आलें आहे त्याची अगदीं सही सही नक्कल आहे. माडखोलकरांचीं पात्रें उत्तरोत्तर कल्पनादरिद्री होऊं लागलीं आहेत याचा हा पुरावा आहे. किंवा निराळ्या भाषेंत जरा स्पष्टपणें बोलावयाचें झालें खुद्द माडखोलकरांची प्रतिभाच मंद होऊं लागल्याचा तो पुरावा आहे. आणि यामुळेंच, ठराविक चर्चा, ठराविक व्याख्यानें, ठराविक निंदा, ठराविक निसर्गवर्णनें, ठराविक सांकेतिक उपमा यांचा अतिरेक झालेला दिसून येतो. 'भंगलेल्या देवळां'तील वर उल्लेखिलेलें प्रणयोन्मादाचें वर्णन पुनरुक्तीचा दोष पत्करूनहि येथें देतों. हीं दोन्ही वर्णनें वाचकांनीं अवश्य ताडून पहावीं व माडखोलकरांच्या ठराविकपणावर मी आताच जी सौम्य टीका केली आहे तिच्यांतील मर्म ओळखावें. 'भंगलेल्या देवळां'तील वर्णन पुढीलप्रमाणें आहे. "प्रणयाइतका उन्मादकारी मोह मानवी जीवनांत दुसरा कोणता असूं शकेल?........ मला केव्हां केव्हां वाटतें कीं, हलाहल, अमृत आणि मदिरा या तिघां भावडांचे परस्परविरोधी गुणधर्म मिसळून विधात्यानें प्रणय ही चीज निर्माण केली असावी. विषाची दाहकता, सुधेचें माधुर्य आणि सुरेची मादकता या तिहींचा मिलाफ झाला आहे प्रीतींत" (भं. दे. पृ. २८) यावर अधिक भाष्य करण्याची जरूर नाहीं!

नायक नायिकेला आपल्या प्रीतीचे सारे खेळ कथन करतो. यावर नागकन्याहि मोठें प्रभावी वक्तृत्व करते. तिचें म्हणणें असें कीं, प्रीति हा कांहीं यौवनाचा एकच धर्म नाहीं. प्रीति हा यौवनाचा केवळ एक भाग आहे. 'तें यौवनाचें सर्वस्व नव्हे, साफल्य नव्हे, आणि सामर्थ्य

तर नव्हेच नव्हे.' प्रीतिभंगानें तरुणाचें हृदय खचून जाणें यासारखा दुबळेपणा दुसरा कोणताहि नाहीं असें तिला वाटतें. प्रेम ही आयुष्यांतील एक मामुली घटना आहे. प्रेमाशिवाय जीवनांत गोडी उत्पन्न करणाऱ्या अनेक गोष्टी असतात हें ज्याना माहीत नाहीं तेच प्रेमभंगानें कष्टी होतात. तिच्या मतें 'प्रीतीपेक्षांहि यौवनांत साहसाची प्रवृत्ति अधिक प्रबळ असते, असली पाहिजे.' साहसांतच जीवनाचें खरें साफल्य आहे. येवढें वक्तृत्व केल्यावर ती अगदीं मोकळ्या मनानें आपले प्रेमप्रसंग व प्रेमभंग कथन करते.

तिचा दुसरा प्रियकर एक धिप्पाड चिनी तरुण होता. 'पौरुष ही काय चीज आहे' हें तिनें प्रथमच त्याच्या सहवासांत अनुभवलें. कांहीं पुरूष स्त्रीकडे एक भोग्यवस्तु म्हणून पाहतात असें आपण आतांपर्यंत ऐकत आलों. पण या बाईचें म्हणणें काय आहे पहा—"स्त्रीत्व हा जसा पुरुषाच्या उपभोगाचा विषय होऊन बसला आहे, तसा पुरुष हा सुद्धा स्त्रीच्या उपभोगाचा विषय होऊं शकतो." ज्या देशांतल्या तरुणांना प्रीति हा यौवनाचा धर्म वाटतो त्या देशाचें डोकें वर निघणें अशक्य आहे. पाश्चात्य लोक प्रीतीचे खेळ 'आस्वादानें' आणि 'उन्मत्तपणानें' खेळतात; पण प्रीतीच्या मदानें धुंद होऊन ते आपलें कर्तव्य, आपलें ध्येय कधींहि विसरत नाहींत असें ती आग्रहपूर्वक म्हणते. "प्रीति ही तारुण्यांतील एक क्रीडा आहे, आणि क्रीडा ही जीवनाचें सर्वस्व कधीं होऊं शकत नाहीं" या एका सिद्धान्ताची ती इतक्या वेळां पुनरुक्ति करते कीं शेवटीं "प्रीति हा यौवनाचा धर्म नाहीं, तो तारुण्यांतला केवळ एक मद आहे, ज्वानीचा एक जोष आहे" हें आपले नायक राजेश्री रंगराव यांना कळून चुकतें!

## चांदण्यांतील जलविहार

प्रीति ही तारुण्यांतील केवळ एक क्रीडा आहे हें नायकाला पटल्यानंतर तीं दोघेंहि मोहाच्या दारूचा आस्वाद घेतात. मदिरेनें आर्द्र झालेल्या तिच्या अधरोष्ठाचें तो आवेगानें दृढ चुंबन घेतो, आणि अशा रीतीनें 'मदिराक्षि मदाननार्पितं मधु पीत्वा रसवत् कथं नु मे' या कालिदासाच्या उक्तींतील कल्पना कृतींत उतरवितो.

चांदणें मोठें मादक पडलें आहे. त्या चांदण्यांत नदीचें पाणीहि आकर्षक दिसत आहे. भोंवतालचें एकंदर सर्वच वतावरण अत्यंत 'मदिर' आहे. अशा वेळीं पाण्यांत विहार करावयाचा तो सवस्त्र अवस्थेंत करण्यांत काय मतलब आहे ? विवस्त्र होऊन तीं दोघें त्या स्फटिकनिर्मळ पाण्यांत शिरण्याचें ठरवितात. 'चांदण्यांत चकाकणारं नदीचं सुनील पाणी हेंच अशा एकान्त पोहण्याच्या वेळचं जलवस्त्र.–' ती नग्न होऊन पाण्यांत उतरलेली दिसतांच तो "वेगानें तिच्याजवळ आला आणि एखाद्या मस्त हत्तीनें आपल्या प्रियकरणीला सोंडेनें विळखा घालून जवळ ओढून घ्यावें त्याप्रमाणें त्यानें तिच्या कटिबंधाला आपल्या लांब हातानें लपेटून जिथें खोल पाण्यांत तो डुंबत होता तिथें तिला नेलें."

त्यांच्या विवस्त्र जलकेलीच्या इतक्या वर्णनानें वाचक कदाचित् उन्मत्त होणार नाहींत अशी शंका आल्यामुळेंच कीं काय, माडखोलकर आतां तपशीलवार माहिती देत आहेत. त्याच्या कमावलेल्या बांधेसूद शरीराची 'पिळदार पुष्टता आणि चपळ बलिष्ठता' या विवस्त्र जलविहारांत मोठ्या मोहकतेनें तिच्या प्रत्ययाला आली. त्यानें तिला दृढ आलिंगन दिलें व त्याच स्थितींत तो पाण्यांत वेगानें गिरक्या घेऊं लागला. "पाणी उथळ असल्यामुळें तिचे सुगोल, गोरेपान अवयव त्या उज्वल चंद्रप्रभेंत स्पष्ट दिसत होते. वायलच्या निळ्या विरविरीत साडींतूनहि तिच्या अवयवांचा थवलिमा इतका खुलून दिसला नसता." त्याच्या गळयात हात घालून पाण्याबाहेर असलेल्या त्याच्या शरीरावर ती 'चुंबनांचा वर्षाव' करते. स्वाभाविकच तो बेहोष होतो. पण त्याचें भान हरपलें, शुद्ध नाहींशी झाली तरी ती मात्र तसल्या अवस्थेंतहि पूर्ण शुद्धीवर आहे. तीहि आपल्याप्रमाणेंच प्रीतीच्या उन्मादानें बेहोष झाली असेल असें त्याला कदाचित् वाटलें असेल तोंच ती म्हणते—"मी इतक्या मोकळेपणानं तुझ्याशीं वागते आहे, म्हणून तू भलताच गैरसमज करून घेऊं नकोस ! आजपर्यंत कुणाच्याहि वासनेचं मी खेळणं होऊं दिलेलं नाहीं स्वतःला !"

अनेकांना सहज खेळवून कोणताहि खेळ आपल्या अंगलट येऊं न देण्यांत पटाईत असलेली एक 'पृथुजघना' मागें 'मुक्तात्मा' कादंबरींत आपल्या परिचयाची झाली होती हें वाचकांस आठवत असेलच.

' उसाऱ्या शेतांतून स्वतःच्या अंगाला पानोळी न लागूं देतां मनसोक्त चरणाऱ्या ' ( ' मुक्तात्मा, ' पृ. १३५ ) त्या पृथुजघनेपेक्षां आपली ही नागकन्या खास सवाई आहे. दोघींची तुलनाहि होणार नाहीं. नागकन्या ती नागकन्या ! तिची सर प्रेमाबाईला कशी येणार ! अर्थात् दोघींची जात जवळ जवळ एकच आहे हें मात्र खरें. ' जग ही निव्वळ भोगभूमि आहे, व ते भोग जितके विविध आणि उच्च तितकें जीवन व्यापक आणि आनंदमय ' असें प्रेमाबाईचेंहि तत्त्वज्ञान होतें. पण अखेर प्रेमाबाई चंद्रशेखरकडे आकृष्ट होतेच. नागकन्या ही या बाबतींत अधिक प्रवीण आहे हें आम्हांस ताबडतोब कबूल !

येणेंपरी, ' मदिर ' चांदण्यांत विहार करून बेहोष झाल्यानंतर पुढें त्या क्षणदांपत्याचें रात्रीं काय होतें तें कवीनें आपल्याला सांगितलें नाहीं. पण आपण जातिवंत रसिक आणि दर्दी असल्यामुळें काय झालें असेल तें सहज ताडूं शकतों.

खरा विनोद दुसऱ्या दिवशीं सकाळीं होतो. ती त्याला पुन्हां एक व्याख्यान देते. त्याचा भावार्थ असा--" तारुण्य हें उपभोगाकरितां नाहीं. निदान दलित, परतंत्र राष्ट्रांतल्या न् समाजांतल्या तरुणांना तरी उपभोगांत गर्क होऊन जाण्याचा हक्क नाहीं ! " ( पृ. १४७ ) तिच्या या व्याख्यानाचा राजेश्री रंगरावांवर कोणता आणि कितपत परिणाम झाला व पुढें त्यांनीं कोणत्या क्रांतींत भाग घेतला हें आपल्या दुर्दैवानें अजून आपणांस कळलें नाहीं. नागकन्या पुन्हां त्याला कधींकाळीं जर भेटली तर दरम्यानच्या काळांत आपलें तत्त्वज्ञान त्याच्या अंगीं कितपत बाणलें आहे याची पारख केल्याखेरीज ती त्याला विवस्त्र अवस्थेंत स्वतःशीं जलविहार करूं देणार नाही इतकंच भाकीत फार तर आपणास करितां येईल !

प्रथम त्यांची भेट ज्या ठिकाणीं झाली होती त्याच ठिकाणीं निरोप समारंभ पार पडतो. तो तिचें ( सरावाप्रमाणें ) एक ' दीर्घ ' चुंबन घेतो. त्याच्या हाताची पकड सैल होतांच त्याच्या मिठींतून तिनें आपल्याला सोडवून घेतलें व 'गन्धर्वनगरलेखे' प्रमाणें पाहतां पाहतां ती नाहींशी झाली. मागेंसुद्धां तिनें वळून पाहिलें नाहीं ! आणि Quiet Flows the Dawn या

प्रसिद्ध वचनाप्रमाणें माडखोलकरांनींहि आपल्या कादंबरीचा शेवट पुढील-प्रमाणें केला आहे--

'तापीचें गतिगान अखंड चालू होतें!'

## युद्ध आणि नागकन्या

श्री. माडखोलकरांनीं 'नवे संसार' ही कादंबरी पाश्चिमात्य जग युद्धाच्या खाईत पडलें असतां व युरोपांतील युद्धाची झळ हिंदुस्थानाला अगदीं तीव्रतेनें पोंचूं लागली असतां लिहिली. युद्धकालीन परिस्थितीमुळें त्यांच्या मनाचा जो अभूतपूर्व क्षोभ झाला तो त्यानीं त्या कादंबरीच्या द्वारें प्रकट केला. 'युद्धामुळें झालेला क्षोभ जर तींत व्यक्त करावयाचा नाहीं, तर मग कादंबरी लिहायची तरी कशाला!' माडखोलकरांचा हा प्रश्न बिन-तोड आहे यांत कांहीं शंका नाहीं. तत्कालीन परिस्थितीचे पडसाद त्या कादंबरींत उमटले हें योग्यच झालें. माझ्यापुढें नेहमीं जो प्रश्न पडतो तो निराळाच आहे. 'नवे संसार' लिहिल्यानंतर अवघ्या पांच महिन्यांत माडखोलकरांनीं 'नागकन्या' लिहिली. या कादंबरींत प्रचलित परीस्थितीचा लेशसुद्धां नाहीं. राजकारण नाहीं, समाजकारण नाहीं, अर्थकारण नाहीं, संप नाहींत, चळवळ नाहीं, कांहींहि नाहीं. कथानक अगदीं स्वप्नरंजनात्मक आहे, उत्तान शृंगारानें परिपूर्ण आहे. अमक्याच काळात किंवा अमक्याच देशात तें घडलें पाहिजे असें कोणतेंहि बंधन त्या कथानकावर नाहीं. वाटेल त्या काळात व वाटेल त्या देशात तें घडूं शकेल. कारण, केवळ स्वप्नच आहे तें एक. प्रश्न असा कीं, ज्या अर्थीं माडखोलकरांनीं असली कादंबरी लिहिली व ज्या अर्थीं भोंवतालच्या परिस्थितीची कसलीच छटा तिच्यात दिसत नाहीं त्याअर्थीं १९४१ च्या नोव्हेंबर महिन्यांत जगांतल्या सर्व ठिकाणच्या लढाया एकदम थांबून सर्वत्र अबादानी झाली होती, व हिंदुस्थानांत तर रामराज्य झालें होतें असा तर्क एखाद्यानें करावा काय! वस्तुस्थिति अशी आहे कीं, 'नवे संसार' लिहिण्याच्या वेळची जी सर्व प्रकारची परिस्थिति होती तिच्यापेक्षां 'नागकन्या' प्रसिद्ध झाली तेव्हांची परिस्थिति कितीतरी वाईट झाली होती. दर पुढचा दिवस मागच्यास बरा म्हणवीत होता. अशी विचित्र परिस्थिति असतांहि तिचा अंशसुद्धां ज्या कादंबरींत

उतरला नाहीं असली विलक्षण कामुक व उन्मादक वर्णनांनीं भरलेली कादंबरी माडखोलकरांनीं कां लिहिलीं ? कोणत्या जीवनाचें हें प्रतिबिंब आहे ? त्यांना कोणत्या मानवतेचा साक्षात्कार वाचकांस करून द्यावयाचा आहे ? कोणतें अभिनव सत्य आकर्षक शब्दांत सांगावयाचें आहे ? मानवी भावनांची कोणती आर्तता प्रकट करावयाची आहे ? कोणत्या प्रकारच्या समाजाचें प्रतिनिधित्व करावयाचें आहे ? आपल्या परतंत्र आणि अवनत समाजाला काय सांगावयचें आहे ? या व आणखी कित्येक प्रश्नांचीं उत्तरें शोधावयाचा प्रयत्न माझ्या मनानें सुरू केला म्हणजे तें अक्षरशः स्तिमित होतें.

ही कादंबरी लिहिलीच कशाला असाच मुळीं माझा प्रश्न आहे ! उन्मादक, कामुक आणि विलासी शृंगाराचीं वर्णनें वाचतांना नाक मुरडण्याइतपत अरसिकता आमच्या वांटयाला खास आलेली नाहीं. संस्कृत वाङ्मयांतील सारा 'अभिजात' शृंगार आणि भयंकर उत्तान शृंगार या सर्वांचीं विविध रूपें आम्हीं पाहिलीं आहेत. तरी सुद्धां माडखोलकरांच्या पूर्वीच्या कादंबऱ्यांत मधून मधून डोकावणारीं औचित्यभंग करणारीं व सदभिरुचीच्या अभावाचीं द्योतक असलेलीं कामुक वर्णनें त्याज्य होत असें मागें वेळोवेळीं म्हटलें. आतां ही सबंध कादंबरीच अथपासून इतिपर्यंत पराकाष्ठेच्या कामुक आणि वासना उन्मत्त करणाऱ्या वर्णनांनीं अक्षरशः ठेचून भरलेली आहे. यांतील कोणत्याहि एखाद्या वर्णनानें औचित्यभंग होत नाहीं हें खरें असलें तरी या कादंबरीच्या लेखनाचा उपक्रम हाच मुळीं मोठा औचित्यभंग होय असें स्पष्ट म्हणावेसें वाटतें. 'नवे संसार' कसे असतील हें सांगून झाल्यानतर व क्रांतीचा संदेश दिल्यानंतर स्त्रीच्या नग्न सौंदर्याचें इतकें गहिरें वर्णन करणारी असली कादंबरी लिहिणें याचा मी तरी एकच अर्थ करतो. माडखोलकर पराकाष्ठेचे अप्रामाणिक असले पाहिजेत हाच तो अर्थ होय. 'नवे संसार' ही कादंबरी लिहितांना आपल्या सध्यांच्या समजाचीं जीं चित्रें त्यानीं रंगविलीं होतीं तिच्यांत त्यांचें मन रमतें कीं पाण्यांत उतरलेल्या विवस्त्र मदियाच्या 'सुगोल,' गोऱ्यापान अवयवांच्या ठायीं रमतें ? पराक्रमी पुरुषाचा विलास आकर्षक असतो आणि निष्क्रिय माणसाचा तिरस्करणीय वाटतो. 'नागकन्या' कादंबरींतील

नायकाचा विलास आकर्षक वाटण्यासारखें कोणतें व्यक्तित्व त्याच्याठायीं आहे ? कोणतेंहि नाहीं ! माडखोलकरांनीं एका कादंबरींत राजकारणाचे व क्रांतीचे पाठ द्यावयाचे व दुसऱ्याच कादंबरींत स्त्रीनें पुरुषाशीं व पुरुषानें स्त्रीशीं विलास कसा करावा याचें शास्त्र सांगावयाचें ! असा हा विरोध कां दिसतो ? माझें स्पष्ट उत्तर असें कीं, माडखोलकर अप्रामाणिक आहेत. त्यांचे कोणते विचार खरे व त्यांच्या कोणत्या भावना खऱ्या ? आणि कोणत्या उसन्या आणि वरपांगी ? मला असें वाटतें कीं, माडखोलकरांचें मन राजकारणांत अथवा क्रांतीच्या तत्त्वज्ञानांत खरोखर रमत नसून तें डाकबंगल्यांत आणि नागकन्यां-तच रमत असावें. 'मुखवटे' कादंबरी लिहितांना त्याना रोज व मोहन यांच्या उपकथानकातून मोहनची भोगलोलुपता विस्तारानें वर्णिल्यावांचून राहवत नाहीं; 'कांता' कादंबरींत अत्यंत अनुचित रीतीनें स्त्रीच्या विवृत अवयवांचें वर्णन केल्यावांचून राहवत नाहीं; 'दुहेरी जीवन' या कादंबरींत मुकुंदाच्या अनेक कामुक प्रेमांचीं सविस्तर वर्णनें केल्यावांचून राहवत नाहीं—नागकन्येशीं विलास व डाकबंगल्यातील विलक्षण शृंगार याहि गोष्टी कलात्मक रीतीनें वर्णिल्यावांचून त्यांना राहवत नाहीं !

हें सर्व करण्याबद्दलहि माडखोलकरांना आम्ही एक वेळ दोष दिला नसता. या गृहस्थाची मनोवृत्तीच अशी, त्याला तो तरी काय करणार ? असें म्हणून आम्ही स्वस्थ बसलों असतों. पण, सध्याची परिस्थितीच अशी आहे कीं, भोंवतालच्या घटनामुळें मनांत उत्पन्न झालेला क्षोभ कादंबरीच्या द्वारें व्यक्त करण्यावांचून गत्यंतर नाहीं असें एकदा विधान करावयाचें व लगेच ज्या जगात आपण वावरत आहोंत त्या जगाकडे संपूर्णपणें पाठ फिरवून केवळ स्वप्नरंजनात्मक लिखाण करून त्याद्वारें वाचकाच्या कामुक वृत्तींना पराकाष्ठेचें उत्तेजित करावयाचें या माडखोलकरी प्रकारावर खरा आक्षेप आहे. वाचकांच्या कामुक वृत्ति चाळविणें हाच माडखोल-करांच्या या कादंबरींतील नग्न जलविहाराच्या व त्यावेळच्या आनुषंगिक विलासांच्या वर्णनाचा एकमेव हेतु आहे असें मीं स्पष्टपणें म्हणतों. शिवाय, स्वतःच्या विकृत भावनांचें कौतुक केल्याचेंहि समाधान त्यांना मिळालें असेल. नाहींतर युद्धकांड चालू असतां आणि माणसें अगदीं हवालदिल होऊन गेली असतां, आपण जगतों कीं मरतों इतकी विचित्र

परिस्थिति उत्पन्न झाली असतां, केवळ उन्मादक विलासांचें आणि संवेदनांच्या व आत्यंतिक सुखवादाच्या तत्त्वज्ञानाचें कलात्मक आविष्करण करण्याचा त्यांना खचित धीर झाला नसता. कोणत्याहि कलाकृतीचा हेतु कोणता व सामान्य वाचकांच्या मनावर तिचा एकंदर परिणाम काय होण्याचा संभव आहे हे दोन सर्वसंमत प्रश्न प्रस्तुत कादंबरीच्या बाबतींत विचारून त्याचीं उत्तरें काय येतात तें वाचकांनींच ठरवावें; आणि, 'मागचं सगळं विसरून जावं, पुढल्यासंबंधीं कांहींहि विचार करूं नये आणि ही रात्र, हा एकान्त, आणि प्रीति यांचा अनिर्बंध मनानं आस्वाद घ्यावा' हें तत्त्वज्ञान प्रमाण मानणाऱ्या नायकाचे उन्मत्त विलास वर्णन करणारी कादंबरी १९४१ च्या नोव्हेंबरमध्यें—म्हणजे अनेक अनर्थपरंपरांमध्यें देश बुडून गेलेला असतां—माडखोलकरांनीं कशासाठीं लिहिली असावी याचेंहि त्यांनींच उत्तर द्यावें !

'रातराणीची फुलें' या कथासंग्रहात 'त्याची मुशाफरी' या नांवाची माडखोलकराची जी गोष्ट आहे तिच्यातहि क्षणिक संवेदनाचें तत्त्वज्ञानच आपणांस पहावयास मिळेल. चालू क्षण बहुमोल असून पुढें येणाऱ्या क्षणाचा यत्किंचित् विचार न करितां जें सुख मिळवण्यासारखें असेल तें अवश्य मिळवावें हें तें तत्त्वज्ञान होय. मुशाफिर म्हणतो, "एकदा मनुष्याला या जीवनाची चटक लागली, म्हणजे स्थिर कौटुंबिक आयुष्यापेक्षा प्रत्येक दिवशीं नव्या अनुभूतीचा आस्वाद घेण्याची संधि देणारं हें भटकं, बेछूट जीवन त्याला जास्त आवडतं. या अनुभवांत जर कांहीं मजा असेल तर ती हीच कीं, क्षणिक भावनेच्या आवेगांत एकत्र यायचं न् त्याची धुंदी डोळ्यावरून उतरतांच कवटाळलेल्या व्यक्तीला विसरून जायचं."

'उद्बोधन' हें कलेचें ध्येय आहे असें माडखोलकर मानतात. 'नागकन्या' लिहून त्यांनीं कोणतें उद्बोधन केलें आहे हें समजणें दुरापास्त आहे !

## १

# डाकबंगला

'पौरुष हा सुद्धां स्त्रीच्या उपभोगाचा विषय होऊं शकतो' हा सिद्धान्त 'नागकन्या' कादंबरींतील मदियेच्या तोंडून सांगितल्यावर आणि मदिरा पिऊन नायक–नायिकांनीं चांदण्यामध्यें केलेल्या जलविहाराचें मोठें गहिरें वर्णन कसबीपणानें केल्यानंतर एक वर्ष पुरें होतें न होतें तोंच माडखोलकरांनीं उन्मादक शृंगारवर्णनांना सरावलेल्या आपल्या रसिक वाचकांना एका डाकबंगल्याचें संपूर्ण अंतदर्शन घडविलें आहे.

मँगेनीजच्या खाणीच्या मालकाची सून कांचनगौरी हिच्या रंगेल, विलासी जीवनाची ही मस्त कहाणी आहे. शहरी वस्तीपासून अगदीं दूर एकान्तांत, उत्कृष्ट निसर्गसौंदर्यानें परिपूर्ण असलेल्या एका रमणीय टेकडीवरील स्वतःच्या मालकीच्या डाकबंगल्यांत कांचनगौरी रहावयास आली त्याच दिवशीं एक मुशाफिरहि तेथेंच आला.

मदिया नागकन्या होती तर ही कांचनगौरी 'मत्स्यकन्या' आहे. रामसागर नांवाच्या तळ्यांत अर्धविवस्त्र अवस्थेंत ती जलविहार करीत असतांनाच तो नवखा मुशाफीर अभावितपणें तेथें येतो. तिच्या 'सुगौर तन्वंगाला घट्ट लपेटून बसलेला तो सुनील जलवेष' पाहिल्याबरोबर तो तरुण अगदीं हवालदिल होऊन गेला, आणि 'ज्याचा फक्त मधला भाग तेवढा पाण्यांत बुडालेला होता' अशा त्या 'बांकदार, धनुष्याकृति' शरीराकडे आणि तिच्या पाण्यांतल्या 'सावेग' हालचालींकडे अनिमिष नेत्रांनीं पाहत काठावरील पायऱ्यावर बेभान, बेचैन आणि बेहोष अवस्थेंत उभा राहिला.

तो ज्या पायऱ्यांवर उभा होत त्या पायऱ्यांशिवाय पाण्याबाहेर पडावयाला जवळपास दुसरा मार्गच नसल्यामुळें तिचा खरोखर नाइलाज झाला. तिनें त्याच्याकडे पाहिलें. त्यानें तिला शिष्टाचारानुसार नमस्कार केला. तो नाइलाजानें स्वीकारून ती झपझप वर निघून गेली. ती तळ्यांतून बाहेर पडून पायऱ्यांवरून वर चढत असतां कोणतें नयनमनोहर,

उन्मादक, गहिरें व लोभसवाणें दृश्य आपल्या मुशाफिर नायकाला दिसलें असेल याची कांहींशी कल्पना आपण रसिक असल्यामुळें आपणांस खास करितां येईल.

हा नवखा तरुण कोण असावा? तिला कुतूहल उत्पन्न झालें आणि तिनें चौकीदारापाशीं चौकशी केली. तो 'मेहमान' गेलीं तीन वर्षें नियमानें त्याच दिवसात तेथे येत असे; त्याला 'भलभलते शोक नव्हते,' आणि तो मोठा दिलदार व संभावित आहे इत्यादि महत्त्वाची माहिती चौकशींतून बाहेर आली.

तेथून तावडतोब निघण्याच्या उद्देशानें ती मोटर बोलावते. इतक्यांत तो 'मेहमान' तेथें आला आणि आपल्यामुळेंच केवळ तिला तेथून जावें लागत आहे याबद्दल त्यानें शक्य तेवढा खेद व्यक्त केला. तिला त्या एकान्तांत असलेल्या बंगल्यांत आपल्यामुळें संकोच वाटूं नये यासाठीं तोच तेथून निघून जाण्याची तयारी दाखवितो. एकंदरींत तिला तो फार 'सभ्य' दिसला.

अखेर दोघांपैकीं कोणीच जात नाहीं. दोघेंहि डाकबंगल्यांत राहतात. एकाच बंगल्यांत आपण दोघे राहतों यामुळें चौकीदाराला आणि खानसाम्याला काय वाटेल अशी तिला शंकाहि आली. तिच्याच खोलींत त्या दोघाचें 'सहभोजन' होतें. जेवतांना त्या मुशाफिराविषयीं अधिक माहिती तिला मिळते. तो एका युरोपियन फार्मसीचा प्रवासी प्रतिनिधि होता. तो एम्. एस्सी. असून त्याचें नांव धनंजय सबनीस असें होतें.

ज्या खोलींत कांचनगौरी रहात होती त्या खोलीविषयीं 'बाईजी या खोलीशिवाय दुसरीकडं कुठं रहात नाहींत या बंगल्यांत' असें चौकीदार त्याला म्हणाला होता. यामुळें तिचें कांहींतरी विलक्षण जीवनरहस्य त्या खोलीशीं संलग्न असलें पाहिजे असें त्याला वाटलें व त्यानें तसें तिला विचारलेंहि.

सोळा वर्षांपूर्वी आपला पति रतिलाल याच्याबरोबर लग्नापूर्वी पिकूनिक्साठीं आली असतां याच खोलींत तिनें जो सर्व प्रकारचा शृंगार केला होता त्याची तिला आठवण झाली.

रतिलाल हा 'स्त्रीसौंदर्याची शिकार करावयास निघालेला' लक्ष्मीपुत्र

होता. पुष्कळशा मैत्रिणी घेऊन तो आपल्या गांवीं पिक्‌निक्‌साठीं गेला होता. तेथून इतर मैत्रिणींना वगळून कांचनगौरीला एकटीलाच त्यानें आपल्याबरोबर घेतलें व डाकबंगल्यात तो आला. बंगल्याला लागूनच असलेला ‘रामसागर’ हा सुंदर जलाशय पाहून कांचनगौरी अगदीं मुग्ध होऊन गेली. सूर्य मावळून बराच वेळ झाला व चांदणें पडलें तरी तें प्रणयी युगल तेथून हललें नाहीं. आज ज्या खोलींत कांचनगौरी उतरली होती त्याच खोलीत रतिलाल तिला रात्रीं घेऊन आला.

रात्रीं तीं दोघें बगीच्यांत उन्मादक चादण्यांत थोडावेळ फिरतात. परत खोलींत गेल्याबर ती आरशासमोर उभी राहिली असता ‘रतिलालनें तिला मागून झटकन् हातानें घट्ट लपेटली’ व तिचें चुंबन घेतलें. ती सुन्न झाली. त्याच्या मिठींतून सोडवून घेऊन ती संतापानें थरथरा कांपत त्याला म्हणाली—“एवढ्यासाठींच तुम्ही मला इथें आणलीत कां?” तिच्या संतापाकडे मुळींच लक्ष न देतां तो अगदीं शांतपणें म्हणाला, “तू आलीस.” अखेर रात्रीं त्या खोलींत विधिलिखिताप्रमाणें व्हावयाचा तो ‘प्रकार’ झालाच. आणि कांचनशीं लग्न ठरण्याची बातमी रतिलालनें आपल्या इतर मैत्रिणींना सांगितली.

हेंच तिचें रहस्य! आणि याच रहस्यावर त्या ‘मेहमाना’नें अचूक बोट ठेविलें होतें. ‘आपल्या हृदयाची निरगाठ उकलण्याचा प्रयत्न त्याला कसा साधला’ याचें तिला नवल वाटलें. आणि म्हणून कांहीं झालें तरी रात्रीं त्या बंगल्यांत रहावयाचें नाहीं असा तिनें निर्धार केला.

‘मी जेवल्याबरोबर लगेच परत जाणार आहे’ असें जेवतांनाच ती म्हणाली. आपल्यामुळें हिच्यावर इतक्या लवकर परत जाण्याची पाळी आली या विचारामुळें त्याला वाईट वाटलें असावें असें दिसलें. आणि तो म्हणाला, “तुमच्यावर माझा सहवास लादण्यांत मी चूक केली असं वाटतं आता मला.” त्याच्या या अजीजीच्या बोलण्यानें तिलाहि स्वाभाविकच वाईट वाटतें; आणि त्याला ती विचारते, “माझा आतां जाण्याचा विचार मी सोडून दिल्यानं समाधान होईल का तुमचें?” काय बोलणार तो यावर? पण रहावयाचेंच ठरविलें तर अगदी मोकळेपणानें वागावें लागेल अशी मात्र तो तिला अट घालतो.

जेवण झाल्यानंतर ती आपली सारी कहाणी त्याला मोकळेपणानें सांगते. ( नागकन्येनेंहि अशीच आपली कहाणी नायकाला सांगितली होती हें वाचकांस आठवत असेलच. ) लग्नापूर्वीची कहाणी आपणांस ठाऊक आहेच. लग्नानंतर असें झालें कीं, कांहीं दिवस रतिलाल तिच्यावर विलक्षण आसक्त होता. पण त्याच्या या अतिरिक्त भोगलालसेचा परिणाम असा झाला कीं, त्याचा तो सहवास म्हणजे निव्वळ जुलूम वाटे तिला. त्याचा प्रणय आणि शृंगार या दोन्ही गोष्टी अत्यंत शारीरिक आणि उद्दाम स्वरूपाच्या होत्या. आणि यामुळें प्रीतीविषयींच्या तिच्या साऱ्या नाजूक भावनांचा त्यांच्या आवेगानें चक्काचूर होऊन गेला. तिला एक मूल झाल्याबरोबर रतिलालचें तिच्यावरील लक्ष कमी होऊं लागलें व तो गायिकांच्या मागें लागला. इतकेंच नव्हे तर, त्याना तो उघडपणें घरींहि आणूं लागला.अशाप्रकारें कांचनगौरीच्या वैवाहिक आयुष्याची परवड झाली.

कांहीं दिवसांनीं रतिलाल वारल्यावर ती गावीं राहण्यास गेली. तिचा खाणवाला सासरा कांहीं कामानिमित्त याचवेळीं बंगल्यांत आला. ती तेथें एकटी आहे असें पाहून रात्रीं तो तिच्या खोलींत शिरतो व तेथें तिच्याशीं अतिप्रसंग करतो. पण ती ओरडतांच तिला दम देऊन तो निघून जातो. दोन महिन्याच्या आंतच वडिलांच्या मदतीनें ती आपली स्वतंत्र व्यवस्था करून घेते. पण सासऱ्याचा त्रास कांहीं चुकेना. अनेक प्रकारांनीं तो तिला त्रास देई. हा सगळा पाढा या तिऱ्हाईत मुशाफिरापुढें वाचण्यांत काय मतलब आहे असें तिला वाटलें. लग्नाची हकिकत त्याला सांगितली हेंहि चुकलें असें तिला वाटूं लागलें.

संध्याकाळीं ती मुशाफिराबरोबर फिरायला जाते. सूर्य मावळल्यावर चांदण्यांत रामसागरावर तीं दोघें जाऊन बसतात. तलावाच्या कांठीं, मघांशी अर्धवट सोडलेली कहाणी ती पुढें चालू करते. गोष्ट सांगतां सांगतां एकाएकी तिचे डोळे आंसवांनीं डबडबलेले पाहताच मुशाफिरानें तिचे हात एकदम घट्ट धरले. त्याच्या त्या अनपेक्षित स्पर्शानें ती दचकली. पण तिनें त्याच्या हातांतून आपले हात सोडवून घेतले नाहींत किंवा कोणत्याहि प्रकारची उत्सुकताहि तिच्या वृत्तींत दिसून आली नाहीं. आपल्या मनावरील आपला ताबा गेला याचें मात्र तिला फार वाईट वाटलें.

बंगल्याकडे परत आल्यावर तीं खिडकीपाशी उभी राहिलेली असतां तो हळूंच तिच्या मागें येऊन उभा राहिला. तिच्या डोळ्यांतून अश्रु ठिबकत होते. खिडकीच्या कट्टयावर ठेवलेले तिचे हात त्यानें हळूंच आपल्या हातांत घेतले. त्याबरोबर ती आर्त स्वरानें म्हणाली, " नको, नको, धनंजय ! मला एकटीलाच राहूं द्या आतां--"

पण तो तिला एकटीलाच राहू देण्यास तयार दिसत नाहीं. एकत्र शयन झाल्यामुळें जे व्हायचें तें झालें. तो दमून गेल्यावर तिच्या अंगाभोंवतालचा त्याचा बाहुपाश सैल होतांच त्याच्या स्पर्शसंमोहांतून तिचें मन बाहेर पडलें. आणि ' आज आपल्या हातून हें काय घडलें ' हा एकच प्रश्न तिच्या हृदयांत खवळून उठला.

आतां दुर्लौकिक होणारच ! तो टाळावा कसा ? तो टाळण्याचा एकच मार्ग तिला दिसला--मृत्यू ! ज्या तलावांत सकाळींच ती स्वच्छंदपणें विहार होती त्याच तलावांत ती उडी टाकते व पुढें होणाऱ्या आपल्या दुर्लौकिकावर त्या निळसर पाण्याचें पांघरूण घालते.

## पात्रें तींच, नेपथ्य तेवढें वेगळें

' नागकन्ये ' प्रमाणें याहि कादंबरींत अवघीं दोन पात्रें आहेत: आणि बराचसा भाग नायिकेच्या पूर्वायुष्यांतील घटनांनीं व्यापलेला आहे. हें प्राक्कथन स्वभावलेखनाचें कौशल्य दाखविण्याच्या बाबतींत मोठीच अडचण निर्माण करतें. यामुळें व्यक्तिरेखनाचें कसब दाखविण्यास येथें कादंबरीकारास अवसरच नाहीं. उन्मादक विलासाचीं गहिरीं वर्णनें, स्त्रीदेहाच्या अनावृत सौंदर्याचीं वर्णनें, प्रगल्भ शैलीनें नटलेलीं निसर्गाचीं वर्णनें यांत या कादंबरीचें सारें आकर्षण साठविलेलें आहे.

अत्यत भोगलोलुप असलेला व स्त्रीसौंदर्याची ' शिकार ' करावयास निघालेला काचनगौरीचा पति रतिलाल हा मागें मोहनच्या वेषांत आपल्याला ' मुखवटे ' या कादंबरींत भेटला होता. किंबहुना, असेंहि म्हणतां येईल कीं, अनिरुद्ध, राधामोहन, मुकुंद, मोहन, रंगा व रतिलाल या सर्वांचा एकच नमुना ( type ) आहे. ' भंगलेल्या देवळा ' तील अनू पुरुषांच्या ' शिकारी ' आणि ' भटक्या ' स्वभावाबद्दल तक्रार करते.

अनिरुद्धाच्या अतृप्त भोगलालसेमुळें तिचा कसा छळ होतो हेंहि आपण पाहिलें आहे. जी गोष्ट अनूची तीच गोष्ट 'मुखवटे' कादंबरींतील रोजची. तिला पुरुषाच्या 'भेसूर पशुत्वाची' प्रतीति येते. तात्पर्य, हे वर उल्लेखिलेले सारे पुरुष पराकाष्ठेचे लंपट व कामुक आहेत. त्यांच्यांत स्वतःचें असें स्वतंत्र व्यक्तित्व नसल्यामुळें परिणामकारकतेच्या दृष्टीनें हा 'टाइप' अधिकाधिक नीरस व कंटाळवाणा होत चालला आहे असें दिसून येईल. जीवितांतील अनंत अनुभवांपैकीं कोणताहि अनुभव आविष्कारासाठीं निवडण्यास, त्याचप्रमाणें अनंत मानवी व्यक्तींपैकीं कोणत्याहि व्यक्ति निवडण्यास लेखकाला हरकत नाहीं. पण, तीच व्यक्ति फार थोड्या फरकानें पुनः पुनः येऊं लागली, तेच प्रसंग पुन्हां येऊं लागले, त्याच त्या भावनांचें कंटाळा येईल इतकें चित्रण होऊं लागलें म्हणजे तें आक्षेपार्ह होऊं लागतें. माडखोलकरांच्या कादंबऱ्यांच्या बाबतींत असेंच झालें आहे हें अगदीं स्पष्ट आहे. पुरुषी प्रेमाचा जसा एका नमुना माडखोलकरांनीं निर्मिला आहे तसाच असल्या भोगासक्त पुरुषांच्या वासनेचें खेळणें होऊन बसलेल्या स्त्रियांचा सुद्धा एक नमुना त्यांनीं बनविला आहे. उदाहरणार्थ, अनू, सुलोचना, रोज इत्यादि स्त्रियांचा टाइप पुन्हा 'डाकबंगला' या कादंबरींत कांचनगौरीच्या रूपानें अवतीर्ण झाला आहे. तीहि प्रथम रतिलालच्या, नंतर प्रेमरूप स्वामीच्या, नंतर स्वतःच्या सासऱ्याच्या आणि शेवटीं त्या मुशाफिराच्या वासनांचें खेळणें होऊन बसलेली आहे. आणि पुरुषांच्या असल्या या भोगलोलुपतेमुळें व त्या लोलुपतेला बळी न पडण्याइतपत सामर्थ्य अंगीं नसल्यामुळें शेवटीं तिला आत्महत्या देखील करावी लागली आहे.

'डाकबंगला' ही कादंबरी १९४२ च्या जुलै महिन्यांत प्रसिद्ध झाली. 'नवे संसार' लिहिल्यानंतर पूर्ण वर्षानें ही कादंबरी प्रसिद्ध झाली. या एक वर्षांत देशामध्यें जीं विविध आंदोलनें झालीं, जनतेला ज्या यातना भोगाव्या लागल्या त्यांची एवढीशी सुद्धां छटा या कादंबरींत नाहीं. "आतां या यातना लवकर संपण्याचें चिन्ह कांहीं दिसत नाहीं. किती दिवस आतां तें राजकारण, त्या चर्चा, तीं राजकीय व सामाजिक प्रवचनें, ती क्रांति, ते संप इत्यादि नीरस गोष्टींचा काथ्याकूट करावयाचा ? त्यापेक्षां तापी नदीच्या

कांठीं जाऊन एखाद्या नागकन्येला गाठावें किंवा एखाद्या डाकबंगल्यांतील शृंगाराचें अवलोकन करावें व आपणांस जीं कमनीय दृश्यें दिसलीं तीं वाचकांनाहि दाखवून त्यांच्याहि दुःखी कष्टी मनाला थोडेंतरी रिझवावें" असे विचार कदचित् माडखोलकरांच्या मनांत आले असतील. आणि म्हणून 'त्रिविध तापें पोळलेल्या' प्राण्याला त्यांनीं 'मदिर' स्वप्नसृष्टींत नेऊन सोडलें असेल.

श्री. माडखोलकरांनीं अनेकदा आपले मित्र श्री. भेंडे यांच्याजवळ पुढील उद्गार काढले आहेत ( असें स्वतः श्री. भेंडे हेच सांगत आहेत.) --"मला...बदलत्या परिस्थितीचं आकलन झालं पाहिजे, नवीन पिढीशीं समरस होतां आलं पाहिजे. तरच माझ्या कादंबऱ्या वाचल्या जातील, मी आपल्या परतंत्र, अवनत समाजाला कांहीं सागूं शकेन." ('डाकबंगला,' प्रस्तावना, पृ. १३ ). माडखोलकराचे हे उद्गार खऱ्या तळमळीचे व प्रामाणिकपणाचे निदर्शक असतील असें आपण त्यांच्या समाधानासाठीं घटकाभर गृहीत धरून चालूं. हे उद्गार खरे असतील तर 'नागकन्या' व 'डाकबंगला' या अगदीं आणीबाणीच्या काळात लिहिलेल्या कादंबऱ्यांतून माडखोलकरांनीं आपल्या परतंत्र आणि अवनत समाजाला काय सागितलें आहे असा माझा स्पष्ट प्रश्न आहे. नवीन पिढींतील कोणत्या लोकांशीं माडखोलकर या कादंबऱ्यात समरस झाले आहेत? रंगा आणि मदिया, रतिलाल, धनंजय आणि कांचनगौरी या व्यक्ति कोणत्या समाजाच्या प्रतिनिधि आहेत? हिंदुस्थानावर केव्हां शत्रूचा हल्ला होईल याचा नेम नसतां, मोठमोठ्या शहरांत विमानहल्ल्याचीं प्रात्यक्षिकें चालूं असतां, ब्लॅक आउटमुळें रात्रींचा सारा तेजस्वी प्रकाश नाहींसा होऊन अमावास्येचा काळोख दाटला असतां, लक्षावधी लोकांना जगण्याची विवंचना पडली असतां माडखोलकराचे स्त्री पुरुष काय करीत आहेत? सर्व वस्त्रें झुगारून देऊन पाण्यांत मस्त साठमारी खेळत आहेत! अथवा डाकबंगल्यांत उन्मत्त भोग भोगीत आहेत! ज्या नवीन पिढीशीं समरस होण्याची माडखोलकरांना अनावर ओढ लागली आहे ( असें ते स्वतःच सागतात म्हणून आपण खरें मानावयाचें.) त्या तरुण पिढीचीं १९४१-४२ मधील प्रतीकें कोणतीं? तर रंगा, मदिया, कांचनगौरी आणि

धनंजय ! आणि या तरुण पिढीची ‘ कर्मभूमि ’ कोणती ? तर तापी नदीकांठचें निर्जन अरण्य, सुनील पाण्यानें युक्त असलेला व मदिर चंद्रप्रकाशानें शोभायमान झालेला तापीचा प्रवाह, अथवा एकान्त टेकडीवरील वैभवशाली महाल आणि त्याच टेकडीच्या पायथ्याशीं असलेला रम्य जलाशय !

माझा मुद्दा असा कीं, माडखोलकरांना प्रामाणिकपणानें नव्या पिढीशीं समरस व्हावयाचेंच नाहीं मुळीं ! क्रांतीचें केवढेंहि महत्त्व त्यांनीं वर्णिलें, राजकीय प्रवचनें कितीहि वक्तृत्वपूर्ण रीतीनें दिलीं तरी या गोष्टींत त्याचें मन खरें रमत नाहीं. तो केवळ देखावा आहे. ‘ मी नवीन पिढीच्या आकांक्षांशीं समरस होऊं शकतो ’ हें आग्रहानें पटविण्यासाठीं आणलेलें तें उसनें अवसान आहे. आणि तसेंच म्हणावयाचें झालें तर, बदलत्या परिस्थितीचें कोणतें यथार्थ आकलन त्या परिस्थितीशीं सर्व अर्थांनीं प्रामाणिकपणें समरस होऊन त्यांनीं केलें आहे ? १९४२ च्या अभूतपूर्व चळवळीचें ‘ प्रमद्वरा ’ या जुजबी १२५ पानांच्या कादंबरींत केलेलें वर्णन ? ही ‘ प्रमद्वरा ’ कादंबरी नवीन पिढीच्या आकांक्षांशीं समरस होऊन माडखोलकरांनीं लिहिली आहे कीं केवळ कांहीं ‘ बदलतें जीवन ’ वर्णावें या इच्छेनें पूर्णपणें अलिप्त राहून लिहिली आहे ? समरसता जर नसेल तर, अवलोकन कितीहि सूक्ष्म असलें तरी, घटनांचें कौशल्यपूर्ण वर्णन करण्यापलिकडे कलावंताला अन्य कांहींहि शक्य होत नाहीं. माडखोलकरांचें नेमकें हेंच झालें आहे. ४२ च्या चळवळीच्या अद्भुत दृश्यांत त्यांना खरें आकर्षण वाटत नसून तें नागकन्येंत किंवा मत्स्यकन्येंतच वाटतें हें अगदीं सत्य आहे ! तरीसुद्धां बदलत्या परिस्थितीचें आकलन करून घेण्याची व नवीन पिढीशीं समरस होण्याची आपली महत्त्वाकांक्षा माडखोलकर ‘ उच्चैरुद्घुष्य ’ सांगतच आहेत ! हें सांगणें परमार्थानें घेण्याचें कारण नाहीं. तें कांहींसें ‘ परिहासविजल्पित ’ समजावें !

# १०

## चंदनवाडी

'डाकबंगला' लिहिल्यानंतर तेरा महिन्यांनीं 'चंदनवाडी' प्रसिद्ध झाली. या कादंबरींत माडखोलकरांनीं पूर्वीच्या कादंबऱ्यांतील विलासी आणि राजकारणी लोकांच्या सहवासाचा त्याग केला आहे व अगदींच निराळ्या वातावरणांत ते आले आहेत. एका काळीं देशमुखीचें सारें वैभव उपभोगलेल्या पण दुर्दैवानें घरादाराला मुकावें लागल्यामुळें सर्वस्वीं दीन झालेल्या अनाथ सास्वासुनांचें हें चरित्र आहे. सून गिरणींत दिवसभर काबाडकष्ट उपसून सासू व मुलगी चंदन यांच्या पोटाला तुकडा घालीत आहे. सासू येसू व सून रखमा या दोघी विधवांचा सारा जीव चंदनमध्यें केंद्रित झाला आहे. या अत्यंत साध्या कुटुंबात घडलेल्या घटना माडखोलकरांनीं मोठ्या सफाईनें रंगविल्या आहेत.

येसूचा नवरा नंदू मालगुजाराला चंदनवाडीची इस्टेट विकतो. नवऱ्याच्या पश्चात् येसू वीस वर्षें तेथेंच कुंभारवाड्यांत राहते. तिचा मुलगा किसन गिरणींत अपघातानें मरतो. रखमा ही किसनची बायको आणि येसूची सून. या रखमाला नवसासायासानें जी मुलगी झाली होती तीच कथानकाचा नायिका चंदन.

पूर्वीचे मालगुजार मरून त्यांचे चिरंजीव दादासाहेब याच्या हातीं मालगुजारीची सारीं सूत्रें आलीं. हातीं अधिकार आल्यावर ते फारच शेफारले व एकदा आपल्या शेतावर कामावर येणाऱ्या रखमाशीं त्यांनीं लगट केली. तिनें त्यांना खेटरल्यामुळें तिच्यावर व येसूवर त्यांचा फार दांत असतो. शेवटीं, देणें फिटत नाहीं या सबबीवर येसूच्या घरावर ते जप्ती आणतात. रखमा पुन्हां कामावर येत असेल तर जप्ती उठविण्याचें आमिषसुद्धा ते दाखवतात. येसूचा अभिमान जागा होतो व नेसत्या वस्त्रानिशीं रखमाला व चंदनला घेऊन, जेथें पिढ्यानपिढ्या देशमुखीचा रुबाब उपभोगला ती चंदनवाडी सोडून ती नागपूरला जाते. नागपूरला गेल्यानंतरहि आपण केव्हां तरी आपली चंदनवाडी परत मिळवूं व तेथें पुन्हां रहावयास जाऊं

ही तिची आशा कांहीं सुटत नाहीं. रखमाला मात्र झालेल्या दुष्ट घटनांमुळें चंदनवाडीची शिसारी बसली ती कायमचीच.

चंदनवाडीला नदीकांठीं निसर्गरम्य वातावरणांत आनंदानें वाढलेल्या येसूला व रखमाला नागपुरांतील उंटखान्याजवळच्या घाणेरड्या वस्तींतील जीवन भारी तापदायक झालें. तिचा देशमुखीचा सारा रुबाब त्या ओंगळ वस्तींत अक्षरश: खड्डयांत गेला !

गिरणींतील कामाचा पहिला दिवस हें रखमाच्या आयुष्यांतील एक एक दिव्यच होतें. पण सासू व मुलगी यांच्याकडे पाहून कांहीं न बोलतां सारें सहन करावयाचें तिनें ठरविलें.

घराजवळच्या मिशनमधील संध्याकाळच्या घंटेच्या मंजुळ आवाजानें चंदनला एकदा कुतूहल वाटलें व ती हळूच मिशनच्या आवारांत शिरली. तेथल्या ख्रिस्ती जोगिणी तिच्याशीं भारी प्रेमळपणानें वागल्या. त्यांनीं तिच्या शाळेची व्यवस्था केली व तिला पाटीपुस्तकें घेऊन दिलीं. आणि अशा प्रकारें चंदनच्या शिक्षणाला सुरवात झाली. हें सारें भल्यासाठींच झालें असें येसूला वाटतें. पण तिला बाटवून ख्रिस्ती करतील अशी रखमाला भीति वाटते.

याच शाळेंत चंदनची हिराशीं ओळख होते. चंदन तिला ओढून आपल्या घरीं घेऊन जाते. येसू तिच्याशीं प्रथम प्रेमळपणानें बोलते व तिला खावयासहि देते. पण त्या मुलीची जात महार आहे असें कळतांच येसूचा जळफळाट होतो. देशमुखाच्या घरीं महारानें जेवायचें म्हणजे काय ? आजीनें असला त्रागा केलेला पाहून चंदमला अगदीं विरघळल्या-सारखें होतें. त्या चिमुकल्या मुलीचें व्यक्तित्व जागृत होतें आणि ती एकदम म्हणते, ' मी जाऊं देणार नाहीं तिला.' तिचे ते शब्द येसूच्या हृद-याला भेदून गेले.

कांहीं दिवसानीं चंदन कॉन्व्हेंट हायस्कूलमध्यें दाखल होते. रखमा दिसण्यांत सुरेख, रहाणींत नीटनेटकी, कामांत हुशार पण अगदीं अबोल होती. तिच्या देखणेपणामुळें गिरणींतील पगारदार गुंडांचे डोळे तिच्याकडे निर्लज्जपणानें वळत असत. तरी तिच्या वाटेला जावयाचा धीर मात्र कधीं कुणाला झाला नाहीं. चंदनचा मिशनशीं असलेला संबंध रखमाला

कधींच फारसा रुचला नाहीं; व त्यासंबंधीं एखाद दुसरा प्रतिकूल शब्दहि ती मधून मधून सासूशीं बोले. पण, येसूची चंदनवर खरोखरच सक्त नजर आहे, अशी जेव्हां तिची खात्री झाली, तेव्हांपासून त्याहि बाबतींत मन घालण्याचें तिनें सोडून दिलें.

येसूचा सारा जीव लहानग्या नातींत गुंतलेला आहे. ती बाटेल अशी येसूला कधींच भीति वाटली नाहीं. तिच्यात इतर मुलींपेक्षां जी अगदीं निराळीच हुशारी आणि तडफ दिवसेंदिवस दिसूं लागली होती तिचें येसूला मोठेंच कौतुक वाटे. आपली नात इंग्रजी शिकेल, तिला मोठी नोकरी लागेल; व चांगला नवरा मिळेल आणि तिनें पुन्हां चंदनवाडीचा ताबा घेतल्यावर आपण वर्धेच्या कांठीं आपल्या आयुष्याचे शेवटले दिवस सुखा-समाधानानें काढूं, असा विश्वास तिला चंदनकडे पाहून वाटूं लागला होता.

येसूला जितकें चंदनवाडीचें प्रेम वाटे तितकाच रखमाला तिचा द्वेष वाटत असे. ज्या वाडीच्या पायीं आपला नवरा ऐन तारुण्यांत गिरणीच्या पट्ट्यांत सांपडून मेला व ज्या वाडींत आपल्यावर इतके मानहानीचे प्रसंग आले, त्या चंदनवाडीचें नांवहि सासूनें मुलीसमोर काढलेलें तिला खपत नसे. येसूला चंदनवाडी ही सजीव, सचेतन व्यक्ति वाटे; पण एखाद्या चेटकिणीची, अपशकुनी कृत्येची जशी एखाद्याच्या मनांत कायमची धास्ती बसावी तशी धास्ती रखमाच्या मनानें घेतली होती.

चंदन अंगच्या हुशारीमुळें भराभर वर चढत जाते. हायस्कूल एंट्रन्स परीक्षेंत व मॅट्रिकमध्यें ती पहिली येते. तिला स्कॉलरशिप मिळते व ती कॉलेजांत जाऊं लागते. आणि अशा प्रकारें तिच्या म्हाताऱ्या आजीचें एक स्वप्न खरें होतें.

ज्या हिरा नांवाच्या मैत्रिणीला तिच्या आजीनें फार पूर्वीं ती महार होती म्हणून पानावरून उठविलें होतें व जिच्यासाठीं ती आपल्या आजीशीं भांडली होती त्या मैत्रिणीची व तिची पुढें दृढ मैत्री होते. अभिमन्यू हा हिरेचा भाऊ. त्याच्याशींहि हिरेमुळें तिचा दाट परिचय होतो. अभिमन्यू हि अस्पृश्यांसाठीं ठेवलेल्या स्कॉलरशिपांमुळें शिकतो व कॉलेजांत जातो.

हिरेच्या घरीं अवधूत नांवाच्या अभिमन्यूच्या मित्राशीं चंदनची ओळख होते. योगायोग असा कीं, चंदनवाडी बळकावून येसूच्या घरावर जप्ती

आणणाऱ्या दादासाहेब मालगुजाराचा अवधूत हा मुलगा. चंदनला तो कोण हें ठाऊक नव्हतें; व तिच्या आईच्या बाबतींत आपल्या वडिलांनीं केवढा मोठा अपराध केला होता हें त्यालाहि माहीत नव्हतें.

अवधूत व चंदन यांचा परिचय अत्यंत मंद गतीनें वृद्धिंगत होत जातो. तिच्याशीं सलगी वाढविण्याचें तो टाळीत असे. पण ती त्याच्याकडे आकृष्ट व्हावयाची ती झालीच. दोन-अडीच वर्षें त्यांचा स्नेह झपाट्यानें वाढत गेला. या गोष्टीची तिच्या आईला व आजीला थोडीसुद्धां कल्पना नव्हती. तो तिच्या घरीं कधींहि गेला नव्हता आणि तिनेंहि त्याला कधींहि बोलावलें नव्हतें. पण हिरेच्या घरीं त्याची आठवड्यांतून एकदोनदा तरी भेट होई. हिरेच्या घरीं आपण कोणत्या दिवशीं जातों हें त्यानें लक्षांत ठेवलें असावें असें अनेक वेळां तिला वाटे. आपल्याला भेटण्यासाठीं तो मुद्दाम तेथें येत असावा असें तिला वाटे. पण तो तिच्याशीं इतका जपून वागत असे कीं, आपल्याविषयीं त्याच्या मनांत कांहीं विशेष भावना निर्माण झाली आहे असें समजावयास अजून तरी तिला जागा सांपडली नव्हती. तरीसुद्धां घरीं जेव्हा जेव्हा तिच्या लग्नाचा विषय निघे तेव्हां तेव्हां अवधूतची आठवण होऊन तिला कसेसेंच वाटे.

अवधूतला समाजवादाचीं तत्त्वें बव्हंशीं मान्य आहेत. यामुळें समाजवाद्यांच्या अनेक चळवळींत तो नेहमीं उत्साहानें भाग घेतो. पुलगांवच्या संपात अनेक वेळां अवधूतनें भाषण केल्यामुळें माधवदासशेठजी त्याचे वडील मालगुजार दादासाहेब देशपांडे यांना गिरणीच्या व्यवस्थेंतून काढून टाकतो. अवधूत जर असाच संपाच्या चळवळींत भाग घेत राहिला तर आपल्या गांवावरहि जप्ती येईल अशी दादासाहेबांना भीति वाटूं लागते. यामुळें बापलेकांत वितुष्ट येऊं लागतें. दादासाहेबांनीं खूप कर्ज केलेलें असतें. चंदनवाडी विकली असती तर सारें कर्ज फिटून कांहीं शिल्लक राहिली असती. पण दादासाहेबांना चंदनवाडी विकण्याची कल्पनासुद्धां सहन होत नाहीं. आणि ते अवाढव्य खर्चहि कमी करीत नाहींत, पूर्वींचाच नबाबी थाट चालू ठेवतात.

आणि एक दिवस अवधूतचा चंदनवाडीशीं असलेला संबंध चंदनला समजला; व तेव्हांपासून तिच्या मनांत एका निराळ्याच भीतीनें घर

केलें. 'आपली' चंदनवाडी व ती 'आपल्या' घराण्यापासून बळकावून घेणारे देशपांडे यांचा उल्लेख येसूच्या बोलण्यांत आला नाहीं असा बहुधा एकहि दिवस गेल्या दहा बारा वर्षांत गेला नव्हता. खरें म्हणजे, देशपांड्यांविषयीं वैरबुद्धि हा येसूच्या जीवनाचा जणु एक महत्त्वाचा भाग होऊन बसला होता. रखमा त्या विषयावर सहसा बोलत नसे. पण, आपली आई ज्या विषयावर कधीं कांहीं बोलत नाहीं, त्या विषयाबद्दलचा तिच्या मनातला दंश अत्यंत जालीम असतो हें चंदनला चांगलें माहीत होतें. यामुळें आजीच्या बडबडीपेक्षा तिला आईच्या मौनाचीच जास्त दहशत वाटे. देशपांडयांचें नाव कोणी उच्चारलेलें रखमाला खपत नसे. अवधूतनें पुलगावच्या संपांत भाषण केल्याची बातमी येसूनें जेव्हां तिला मोठ्या उत्साहानें सांगितली तेव्हां कोणताहि मनोविकार न दाखवितां अगदीं संथपणें येवढीं दोनच वाक्यें तिनें उच्चारलीं– "सापाच्या पिलाचा भरंवसा धरतां कामा नये कधीं. संपामध्यें त्यानं अशा रीतीनं भाग घेण्यांतसुद्धां कांहीं डाव असेल त्या बापलेकांचा!"

आणि रखमा ज्याला 'सापाचें पिलूं' म्हणत होती त्याच्याशींच, तिच्या हाडवैऱ्याच्या प्रत्यक्ष मुलाशींच, तिच्या लाडक्या आणि एकुलत्या एक मुलीचा स्नेह झपाट्यानें वाढत चालला होता!

पण त्याला ती आपल्या घरीं मात्र कधींच घेऊन गेली नव्हती इतक्या दिवसांत. तिनें असा हेका याबाबतींत कां धरावा हा विचार अवधूतच्या मनाला नेहमीं त्रास देत असे. पण पुन्हां त्यानें तिला याबाबतींत कांहीं विचारलें नाहीं. तिनें कॉलेजात जावें, लग्न न करतां पुष्कळ शिकावें हा अवधूतचाच आग्रह! त्यांचें आपल्यावर प्रेम असलें पाहिजे असें तिला वाटे. आपल्याविषयीं त्याला कांहीं विशेष प्रकारचें आकर्षण वाटतें हा विचार तिला जितका सुखकर वाटे तितकाच तें प्रेम कदाचित् अनर्थाला कारणीभूत होईल हा विचार तिला दुःखदायक वाटे. ज्या दिवशीं चंदनचा मॅट्रिकचा निकाल लागला त्या दिवशीं अवधूतच्या बोलण्यांत तिच्याविषयीं जी एक नाजुक भावना व्यक्त झाली, त्या भावनेनें 'तुझ्या जीवनांतला यौवनाचा बहर सुरू झाला आहे' असें तिच्या रोमांचित शरीराला

प्रथमच सांगितलें, आणि तिच्या हृदयांतल्या साऱ्या मूक भावनांच्या तारा उन्मत्तपणें छेडल्या.

ते दिवस १९३९ मधील होते. युद्ध सुरू झाल्यानंतर एक महिन्याच्या आंतच नागपूर मिलमधील संपाच्या सभा सुरू होतात. या सभांतून अवधूत प्रामुख्यानें भाग घेऊं लागतो. कामगारांना महागाईच्या प्रमाणांत महागाईभत्ता मिळावा अशी अवधूतची चळवळ सुरू होते.

आणि चंदनचा व अवधूतचा निकटचा संबंध असून तो सारखा वाढतच आहे हें रखमाला कळते व ती भयंकर रागावते. खरें म्हणजे ती चंदनला कांहींहि बोलली नाहीं. पण ती जेव्हां कांहीं न बोलतां अगदीं स्वस्थ बसते तेव्हां तिच्या मनाचा फार कठोर निश्चय होत असतो हें चंदनला चांगलें ठाऊक होतें. त्यामुळें ती फार बावरली.

त्याच्याशीं मुळींच संबंध न ठेवण्याची कल्पना तिला असह्य आणि अन्याय्यहि वाटली. आपली आई आणि आजी समजतात त्याप्रमाणें अवधूतचे वडील अत्यंत दुष्ट असतीलहि; त्याच्याच दुष्टाव्यामुळें आपल्या कुटुंबावर देशोधडीला लागण्याचा प्रसंग गुदरला असलेहि ! पण ते वाईट असले तरी त्यामुळें अवधूत कसा वाईट ठरतो ? आणि त्यांच्या दुष्टपणामुळें आलेला राग बिचाऱ्या अवधूतवर काढण्यांत तरी काय मतलब आहे ? उलट, कामगार चळवळींत तो भाग घेत असल्यामुळें त्याच्या वडिलांचा जो राग त्याच्यावर झाला आहे त्यावरून त्याच्यापेक्षां त्याची दृष्टि आणि वृत्ति अगदीं भिन्न आहेत असेंच सिद्ध होत नाहीं काय !—इत्यादि अनेक प्रश्नांनीं प्रेमवेड्या चंदनच्या मनांत अगदीं काहूर केलें.

पण हा न्याय–अन्याय यांचा प्रश्न सोडून दिला तरी, त्याचा संबंध तोडून टाकावयास आईनें खरोखरीच सांगितलें तरी आपण तें मुळींच ऐकूं नये, त्यासाठीं वाटेल तो त्रास सोसावा, वाटेल तो त्याग करावयास तयार व्हावें असें तिचें मन तिला बजावूं लागलें. आई जो त्रास देईल तो सारा सहन करण्याची तिची केव्हाहि पूर्ण तयारी होती. पण, आपण आईचें न ऐकल्यास स्वत:च्याच जिवाला ती जो त्रास करून घेईल त्याची वाट काय ? तिचें तर आईवर विलक्षण प्रेम होतें. आणि आईनें तिच्यासाठीं काय करावयाचें बाकी ठेवलें होतें !

तिच्या मनाची अशी संभ्रांत अवस्था झाली. आजी आपल्या आणि अवधूतच्या स्नेहसंबंधाच्या आड येणार नाहीं असें तिला वाटे. पण, त्याचा संबंध सोडून टाकावयाचा आईनेंच जर निक्षून आग्रह केला तर आजी आपल्याला पाठीशीं घालील का ? आणि आपला कैवार घेऊन आईशीं भांडेल का ? तिला ही गोष्ट अशक्य वाटली.

संपांतल्या सभांमध्यें अवधूत विशेषच भाग घेऊं लागल्यामुळें त्यानें आतां वेगळें रहावें असें दादासाहेब त्याच्यामागें टुमणें लावतात. चंदन अवधूतच्या घरीं गेली असता तिला हें अवधूतकडूनच कळतें. ती घरांतून बाहेर पडत असतां दादासाहेब तिला ओझरती पाहतात. ती कोण हें त्यांना कळतें. त्याबरोबर ते भयंकर संतापतात व 'या मुलीशीं तूं संबंध ठेवतां कामा नये' असें त्याला बजावतात.

मागचा इतिहास कांहींच माहीत नसल्यामुळें, वडिलांनीं असा विचित्र आग्रह का धरावा हेंच अवधूतला समजत नाहीं. तो बुचकळ्यांत पडतो. दादासाहेबांचा तर आग्रह असा कीं, दुसऱ्या कोणत्याहि मुलीनें त्याच्याकडे आलेलें चालेल पण या मुलीनें मुळींच येतां कामा नये. याचें कारण काय असावें ? चंदनला याविषयीं स्पष्टपणें विचारावें का ? ती सांगेल का ? इत्यादि विचारांमुळें अवधूतचेंहि डोकें अगदीं सुन्न होऊन जातें.

वडिलांचा विचित्र आग्रह अखेर अवधूत धीर करून चंदनला कळवतो. आणि तिनें सारें मोकळ्या मनानें सांगावें अशी तिची तो विनवणी करतो. दादासाहेबांनीं चंदनवाडींतील आपल्या घरावर जप्ती आणल्यामुळें आपल्याला चंदनवाडी सोडून नागपुरास यावें लागलें हें तिला माहीत होतें. पण दादासाहेबांनीं प्रत्यक्ष आपल्या आईशीं हलकटपणा केला होता व आईनें त्यांचा अपमान केला होता याची मात्र कांहींच माहिती तिला नव्हती. यामुळें दादासाहेबांचा आपल्या आईवर कां राग असावा हें तिला उमजत नाहीं. ती म्हणते, "तुमच्या वडिलांनीं माझ्याशीं संबंध ठेवावयाची मनाई तुम्हांला कां करावी हें कळत नाहीं मला. माझ्या आईचा न् आजीचा त्याच्यावर राग असावा हें स्वाभाविक आहे. पण त्यांचा राग त्या दोन निराधार विधवांवर कां असावा आणि त्यांनीं तुम्हाला माझ्याशीं संबंध ठेवायला मनाई कां करावी हें कोडें कांहीं उलगडत

नाहीं मला." आपल्याला माहीत असलेल्या माहितीपेक्षां कांहींतरी जास्त हकिकत असली पाहिजे असें त्या दोघांनाहि वाटतें.

आपण नाहींतरी यापुढें वडिलांपासून वेगळेच राहणार असल्यानें वाटेल तें करावयाला मोकळे आहोंत असें तो तिला म्हणतो. थोडा धीटपणा धारण करून तिनेंहि आपल्याबरोबर घरांतून बाहेर पडावें असें तो तिला सुचवतो. तिचें त्याच्यावर अमर्याद प्रेम आहे यांत शंकाच नाहीं. पण तिच्यासाठीं विलक्षण खस्ता ज्यांनीं आतांपर्यंत काढल्या होत्या अशा आई-आजींना दुखविण्याचें सामर्थ्य तिच्यामध्यें नाहीं, आणि हें ती मोकळेपणानें कबूल करते. "तुमचा ध्येयवाद, तुमचं सामर्थ्य माझ्यांत नाहीं; आई-आजीच्या मायेचे धागे तोडून टाकायला जो मनाचा निग्रह, जो निष्ठुरपणा हवा तो माझ्याठिकाणीं नाहीं. त्यांच्या आयुष्याचे थोडे दिवस उरले आहेत आतां. ते दुखःमय करण्याची माझी इच्छा नाहीं." अवधूतचें आपल्यावर अपरंपर प्रेम असलें तरी त्याचें जीवन आपल्यावर अवलंबून नाहीं, त्याच्या आकांक्षांचा आपण कांहीं एकमेव आधार नाहीं हें ती जाणते. उलट, ती मात्र आईचा व आजीचा एकुलता एक आधार आहे. "मी जर माझ्या आईला न् आजीला सोडलें तर त्यांचं कसं होईल ? त्यांना दुसरं कोण आहे ? त्यांच्या आयुष्यांत दुसरं काय आहे ? नाहीं, नाहीं, मी त्यांना सोडूं शकत नाहीं." आई व आजी यांच्याकडील ओढा व अवधूतवरील प्रेम अशा कात्रींत तिचें मन सांपडलें आहे.

रात्रीं ती उशीरा घरीं परत आली तेव्हां आजी तिच्यावर खूपच रागावली. यांत आईच्याहि रागाचा बराचसा भाग असावा याची तिला जाणीव होती. पण, 'पुन्हा असं करणार नाहीं' असें ती म्हणताच इतकी चिडलेली ती म्हातारी ताबडतोब विरघळली.

आईच्या अबोल रागांतला जहरी अंश आजीच्या रागांत कां दिसत नाहीं असा तिला प्रश्न पडे. अवधूतच्या वडिलांनीं त्याला आपल्याशीं संबंध ठेवावयास मनाई केली आहे हें चंदननें अखेर रखमाला सांगून टाकलें. गोष्टी या थराला आल्यावर, मालगुजारानें आपला विनयभंग कसा केला तें रखमाहि चंदनला सांगून टाकते. वास्तविक गोष्ट अगदीं नाजूक. पण अगदीं नाइलाजानें रखमा मुलीशीं इतक्या स्पष्टपणानें बोलते. जें कोडें

चंदनला बरेच दिवस उलगडत नव्हतें तें कोडें आतां एकदम उलगडलें. पण अवधूतशीं तावडतोब संबंध तोडून टाकण्याविषयीं मात्र ती चंदनला बजावते. " ज्या माणसानं आमची बेइज्जत करून आम्हांला देशोधडीला लावलं, त्याच्या मुलावर तुझं प्रेम जडावं हें खरोखरीच दुर्दैव आहे आमचं, " असें उद्वेगानें म्हणून रखमा चंदनजवळून वचन मागते.

चंदन वचन देत नाहीं असें दिसल्याबरोबर रखमा कडाडते,—" चांडाळणी,त्याच्या बापाच्या वासनेला बळी पडायच मी नाकारल्यामुळें घरादाराला मुकावं लागलं आम्हाला; न् तू त्याच्याशीं बाशिंग बांधायला धादावली आहेस का ?...त्याच्या बापाची रखेली व्हायचं मी नाकारलं आणि तू त्याची रखेली होणार का त्याच्याशीं संबंध ठेवून ! यापेक्षां मेलीस कां नाहीं तू उपजल्याबरोबर?"

म्हाताऱ्या येसूला आपल्या अल्लड नातीची दया येते. पण रखमाचा राग मात्र कमी होत नाहीं. " आपल्या बापाचा खून आणि आईची बेइज्जत करणाऱ्या इसमाच्या पोराच्या गळ्यात पडायला निघालेली ही अवदसा जगली काय न् मेली काय मला सारखीच आहे."

अवधूतची भेट झाल्याबरोबर घडलेला सारा प्रकार चंदन त्याला सांगते. त्याच्या वडिलांची पापवासना तृप्त करावयाचें रखमानें नाकारलें याबद्दल त्या सारवामुनावर त्यांचा राग आहे हें त्याला ती स्पष्टपणें सांगते. तें ऐकून त्याला धक्काच बसतो.

पण पुढें काय ? प्रश्न तिच्या आजीचा नाहीं. ती म्हातारी तत्काळ विरघळते हे तिला ठाऊक होतें. खरा प्रश्न रखमाच्याच रागाचा होता. आणि होतेंहि तसेंच. घरांत रखमा व चंदन यांचा अबोला सुरू होतो. पण त्या अबोल्याकडे दुर्लक्ष करून मनाला विरंगुळा वाटावा म्हणून ती कामगार चळवळींत विशेष भाग घेऊं लागते. आईविषयीं चंदनचें मन विटून गेलें होतें तरी तिचा घराकडला ओढा मात्र मुळींच कमी झाला नाहीं. तिच्या दृष्टीनें दिवसेंदिवस झपाट्यानें थकत चाललेली तिची म्हातारी आजी हेंच तिचें खरें घर होतें.

अवधूत वडिलांपासून वेगळा राहूं लागल्यापासून त्याचें व चंदनचें साहचर्य वाढतच जाऊं लागलें. दिवसभर ती त्याच्याबरोबर असे; पण सूर्यास्ताच्या आंत मात्र घरीं येत असे.

अवधूतच्या संपविषयक चळवळीमुळें त्याला अटक होणार अशी दाट अफवा गांवांत पसरली. लोक म्हणतात त्याप्रमाणें अवधूतला खरोखरच अटक झाली आणि चागला दीड दोन वर्षें तो तुरुंगांत डांबला गेला तर त्याचा आणि चंदनचा संबंध आपोआपच तुटेल असा विचार रखमाच्या मनांत केव्हां केव्हां चोरपावलांनीं डोकावून जाई. असा विचार मनांत आला म्हणजे तिची तिलाच अतिशय शरम वाटे. पण मनात सतत डोकावणाऱ्या त्या चोरट्या कल्पनेमुळेंच आपल्याला यावेळीं संपाविषयीं फाजील उत्साह वाटत आहे हें तिचें तिलाहि कळून चुकलें होतें.

चंदन दिवसां उजेडीं घरीं येत असे तोंपर्यंत येसू फारसें बोलत नसे तिला. पण तिच्या तक्रारी पुढें रोज वाढूं लागल्या. सार्वत्रिक संपाची घोषणा झाल्यापासून चंदनच्या बाहेर राहण्याला कांहींच धरबंद उरला नाहीं. त्यामुळें येसू अगदीं वैतागून गेली. खूप टाकून बोलून बाहेर जाण्याचीच तिला मनाई करावी असेंहि येसूला एकदा वाटलें. पण चंदनच्या लोभस, लडिवाळ वागण्यामुळें येसूला तेवढा धीर झाला नाहीं. अखेर अतिरेक झाल्यावर एक दिवस येसू तिला खडसावतेच. पण चंदन अत्यंत मऊ-पणानें आणि लडिवाळपणें बोलूं लागतांच येसूचा पहिला आवेश कमी होतो, व ती अगदीं नरम सूर काढते. तिनें अवधूतशीं अजिबात संबंध ठेवूं नये असें तिचें म्हणणें नाहीं. पण, 'पोरीच्या जातीला' रात्रीं वाटेल तेव्हां कुठें तरी जाऊन बसणें शोभतें का येवढाच तिचा सवाल आहे. चंदनहि नरमते. "या उप्पर तूं जर नको म्हणालीस, तर लग्न करणार नाहीं मी त्यांच्याशीं. पण मग तू दुसऱ्या कोणाशींहि लग्न करायचा आग्रह करतां कामा नयेस मला" असें चंदन म्हणतांच येसू पुन्हां विरघळते. चंदननें इतका समजूतदारपणा दाखविल्याबरोबर येसूचा पहिला अवेश कितीतरी कमी होतो व ती अगदीं हळुवारपणें म्हणते, "आम्ही म्हाताऱ्या काय आज आहोंत न् उद्या नाहीं. आमच्या समजुतीसाठीं तू का करून घेतेस आपल्या मान्या जन्माचा सत्यानाश?" म्हातारी इतक्यावरच थाबली नाहीं. अवधूतशीं लग्न करायलासुद्धा तिनें परवानगी दिली. चंदननें फक्त आपल्या आईचा राग सांभाळला म्हणजे झालें इतकेंच तिचें म्हणणें.

संपाच्या आदल्या दिवशींच लग्न लावायचा त्या दोघांचा बेत ठरतो.

रात्रीं ती सभेसाठीं बाहेर पडते. रात्रीं अडीच वाजेपर्यंत ती अवधूतच्या खोलीवरच राहते. तेथें 'भलतेंच कांहीं तरी' होतें. अपरात्रीं परत घरीं आल्याबरोबर येसू तिच्यावर कडाडते. पण चंदन तिच्या कुशींत शिरतांच ती म्हातारी नेहमींप्रमाणें विरघळते. तिच्या अंगावर प्रेमानें हात फिरवून ती म्हणते, "किती गरम लागतंय ग अंग तुझं आज न् श्वास तरी किती जोरानें चाललाय." रखमाची तिला भीति फार वाटत होती. पण ती एक अक्षरहि बोलली नाहीं.

लग्नाच्या आदल्या रात्रींच अवधूतला अटक होते. ही बातमी कळल्याबरोबर चंदनला घेरी येते. आपल्याला अटक झाल्याची बातमी अवधूतनें मोठ्या हिकमतीनें तिला कळवली होती. रखमानें तो कागदाचा कपटा वाचला आणि तिच्याहि डोळ्यांत अश्रु आले. पण ते अश्रु दुःखाचे आहेत; कीं आनंदाचे आहेत हेंच तिला कळेना.

चंदन कुढूं लागली, खंगूं लागली. आईचा पूर्ण अबोला होता. तिच्या त्या विलक्षण मौनाचा चंदनला अर्थ कळेना. पण, रखमाचें तें मौन एक दिवस अचानक संपलें. 'खरा प्रकार काय आहे तो सारा मला सांग' असें ती रोखठोक विचारते. मुलीनें त्या रात्रीं जो घोर प्रमाद केला होता तो आईला कळतो. आपल्या करंट्या नशिबानें अखेर सूड उगवलाच हें कळल्याबरोबर तिचें मातृहृदय खचतें. मुलीला क्षमा करण्याचा उपयोग काय होता आतां ? पुढचा उपाय काय करायचा ! अवधूत तुरुंगांतच आपल्याशीं लग्न करणार आहे हें चंदननें कितीहि जीव तोडून सांगितलें तरी रखमाचा त्यावर विश्वास बसणेंच शक्य नव्हतें. मुलीनें स्वतःचा गळा कापला व आपलाहि गळा कापला याविषयीं तिला शंकाच रहात नाहीं. आणि कांहींतरी भयंकर विचार डोक्यात आल्यामुळें तिचा चेहरा भकास होतो. सासूला ही गोष्ट कळवूं नको असें चंदनला सांगून रखमा 'उपाय' शोधून काढण्याच्या मार्गाला लागते.

अवधूत तुरुंगांतूनच लग्नाची नोटीस देणार आहे ही बातमी कळतांच चंदनला हर्षातिरेक होतो. त्या आनंदाच्या भरात कितीतरी दिवसांनीं ती पोटभर जेवते. अवधूतला अटक झाल्यापासून प्रथमच तिला गाढ झोप लागते. रखमा तिला झोपेंतून उठवते व तिला तें 'औषध' देते. त्याचा

उग्र दर्प आल्यामुळें चंदन प्रथम तें घेत नाहीं. पण रखमा ऐकत नाहीं. ती जवळ जवळ तिला औषध पाजतेच. चंदननें औषध घेतल्याबरोबर रखमाच्या ' उदास चेहऱ्यावर समाधानाची चमत्कारिक तिरीप उमटून गेली. '

त्या औषधामुळें चंदनला भयंकर रक्तस्राव होतो. चर्चमधील सिस्टर तिला तपासते. तिला कांहीं विलक्षण शंका येते. ' तुझ्या मायनें कांहीं औषध दिलें कां ? ' असें ती अगदीं कळवळून चंदनला विचारते. आठवें पुसून चंदन म्हणते, " नाहीं मावशी, मायनें कांहींहि दिलें नाहीं मला—" बरेंचसें कोयनेल घेतल्याची थाप ती मारते. पुन्हां पुन्हां ती हेंच सांगते. चंदनची परिस्थिति इतकी बिघडलेली पाहतांच येसू घाबरते. तिला भ्रमल्यासारखें होतें. चंदनवाडीला तिला घेऊन जाण्याचा ती धोशा धरते. तिला ती हॉस्पिटलमध्यें नेऊं देत नाहीं. ' मोठ्या मायला नाराज करून ' कांहींहि करूं नका असें तसल्या भयंकर अवस्थेंतहि ती बजावते. चंदनची प्राणज्योत आतां मालविण्याच्या बेतांत आलेली आहे. आणि थोड्याच वेळांत ' मोठ्या मायला अंतर देऊं नकोस ' असें सिस्टरला बजावून चंदन प्राण सोडते.

## तीन आकर्षक व्यक्तिरेखा

राजकारणी चर्चा किंवा उन्मादक सौंदर्याचीं कामुक वर्णनें यांची मदत न घेतांहि माडखोलकरांनीं चंदनवाडी मोठी आकर्षक केली आहे यांत शंका नाहीं. येसू आणि रखमा या दोन व्यक्तिरेखा हाच या कादंबरीचा महत्त्वाचा भाग आहे. या दोन व्यक्तिरेखांखेरीज चंदनची स्वभावरेखाहि आकर्षक उतरली आहे. अशिक्षित, खेडवळ, मोलमजुरी करून पोट भरणाऱ्या, पण एका काळीं देशमुखी रुबाबांत वाढलेल्या या दोन अनाथ विधवाच्या साऱ्या भावना, त्यांचे सारे मनोविकार माडखोलकरांनीं मोठ्या कौशल्यानें उकलून दाखविले आहेत. मानवी मनोविकार, मानवी भावना इत्यादींचें इतकें हळुवारपणें माडखोलकरांनीं इतरत्र कोठेंहि वर्णन केलें असेल असें वाटत नाहीं. अत्यंत साधीं माणसें, त्यांची पराकाष्ठेची साधी परिस्थिति, त्यांच्या आयुष्यांतील साध्याच घटना

या साऱ्या गोष्टी कलावंताचा हात लागल्याबरोबर किती आकर्षक होतात हें या कादंबरींत दिसून येईल.

दादासाहेब देशपांडे यांनीं केलेला अन्याय ही गोष्ट येसू व रखमा यांच्या बाबतींत समान असली तरी अवधूनच्या बाबतींत मात्र त्यांच्या मनोवृत्ति अगदीं भिन्न आहेत. नातींत सारें लक्ष गुंतून राहिल्यामुळें व तिच्याविषयीं खरा जिव्हाळा वाटत असल्यामुळें तिच्या अपराधांकडे डोळे झाक करण्याइतपत ती अनेक वेळां विरघळते; इतकेंच काय पण, अवधूतशीं लग्न करावयास देखील तिला एकदा संमति देते. रखमाचें मुलीवर प्रेम नसतें असें नाहीं; पण, अपत्यप्रेमापेक्षां देशपांड्यांविषयींचा तिरस्कार ही भावना तिच्या मनांत कितीतरी अधिक प्रबळ आहे. आणि यामुळेंच, अवधूत तुरुंगांत जाणार या कल्पनेनें तिला बरें वाटतें; व तो तुरुंगांत गेला असें कळल्यावर आपल्या वैऱ्याच्या मुलाशीं चंदनला यापुढें संबंध ठेवतां येणार नाहीं या विचारानें तिला कितीतरी हायसें वाटतें. शेवटीं, आपल्या मुलीनें जें करूं नये तें केलें हें कळल्याबरोबर तिच्या मनाचा झालेला भयंकर संताप, मुलीचा तिला आलेला तिरस्कार, आणि आतां तिचा दुर्लौकिक तरी होऊ नये या हेतूनें तिनें मुलीला दिलेलें जहाल औषध या साऱ्या गोष्टी रखमाच्या स्वभावाला अगदीं अनुरूपच आहेत. स्वतःच्या मुलीच्या सुखापेक्षां तिला वैऱ्याचा तिरस्कार महत्त्वाचा वाटतो, आणि तिच्या प्राणापेक्षांहि तिला दुर्लौकिकाचें महत्त्व अधिक वाटतें. वैर व दुर्लौकिक या गोष्टींपेक्षां स्वतःच्या मुलींतच तिचें सारें लक्ष केंद्रित झालें असतें तर तिच्या आग्रही आणि हेकेखोर वैरभावनेला बिचारी चंदन हकनाक बळी पडली नसती ! या तिच्या मनोवृत्तीमुळेंच जीव जात असतांहि चंदनचें सारें लक्ष म्हाताऱ्या आजीमध्येंच गुंतलेलें आहे. आईचें ती नांवहि काढीत नाहीं.

रखमा आणि येसू यांच्या मनोवृत्तींतील फरक आपल्याला पहिल्यापासूनच दिसत आहे. चंदनवाडीचें नांव काढलेलेंहि रखमाला सहन होत नसे. उलट, चंदनवाडीलाच पुन्हां जाऊन रहावयाचें अशी येसूला तळमळ लागून राहिली आहे. मिशनच्या शाळेंत जाऊन चंदन बाटेल अशी रखमाला भीति वाटते तर येसूला तसें कांहीं वाटत नाहीं. चंदन म्हणजे

येसूचा जीव कीं प्राण आहे. रात्रीं चंदन उशीरां परतल्याबरोबर कडाड-णारी येसू तिच्या लाघवी वागण्यानें क्षणार्धांत विरघळून जात असे; उलट, रखमा मात्र दिवसचे दिवस अबोला धरीत असे, व शेवटीं तर तिनें चंदनशीं बोलणेंच सोडून दिलें. देशपांड्यांचा मुलगा संपाच्या सभेंत बोलला ही बातमी येसू मोठ्या उत्साहानें रखमाला सांगते; पण, सापाच्या पिल्लावर माणसें जितका विश्वास ठेवतील तितकाहि विश्वास रखमा अव-धूतच्या चांगुलपणावर ठेवावयास तयार नाहीं. चंदनविषयींच्या प्रेमानें वैरभावनेवर मात केल्यामुळें येसू अखेर चंदनला अवधूतशीं लग्न कराव-यासहि परवानगी देते; पण, अवधूत तुरुंगांत जावा अशीच रखमाची इच्छा आहे. तात्पर्य, या सास्वासुनांच्या मनोवृत्तींत असा मूलभूत फरक असल्या-मुळेंच चंदनचा सारा ओढा आजीकडे आहे.

चंदनसुद्धां मोठी लाघवी मुलगी आहे. अवधूतचा व तिचा प्रणयसंबंध वळवाच्या पावसासारखा नाहीं. तिचा त्याचा परिचय अगदीं संथपणें वाढत गेलेला आहे. परिचय पुष्कळ वाढल्यानंतरहि ती त्याला आपल्या घरीं बोलावीत नाहीं. पण त्याच्यावरील तिचें प्रेम मात्र अत्यंत दृढ व प्रामाणिक आहे. अवधूतच्या वडिलांनीं आपल्या कुटुंबावर फार मोठा अन्याय केला आहे हें कळल्यानंतरहि आईनें आणि आजीनें अवधूतविषयीं गैरसमज करून घ्यावा हें तिला अन्याय्य वाटतें. अखेरीस, दादासाहेब देशपांड्यांनीं केलेल्या हलकटपणाचें खरें स्वरूप सांगून त्यांच्या मुलाशीं कसलाहि संबंध न ठेवण्याचें वचन रखमा चंदनजवळ मागते. पण चंदन तें वचन देत नाहीं आणि आईचा भयंकर रोष पत्करते. घरांत आईनें विलक्षण अबोला सुरू केल्यानंतर स्वाभाविकच ती खूप उशीरापर्यंत बाहेर राहते. तिचें मन एक प्रकारें बंडच करतें. पण अवधूत जेव्हां तिला आपल्या-बरोबर घराबाहेर पडण्याची सूचना करतो तेव्हां आपल्यावाचून आईला व आजीला कोणीहि नसल्यामुळें आपण हें करूं शकत नाहीं असें ती स्पष्टपणें अवधूतला सांगते. एका बाजूला आई व आजी यांच्यावरील प्रेम व दुसऱ्या बाजूला अवधूतवरील प्रेम अशा द्विधा अवस्थेंत ती सांपडलेली आहे. पण आई व आजी यांच्यावरील प्रेमापेक्षां अखेर तारुण्याचा ‘ उन्माद ’ प्रभावी ठरला तर त्यांत अस्वाभाविक असें कांहींहि नाहीं.

चंदनचें या दोन मानसिक अवस्थांतील आंदोलन माडखोलकरांनीं मोठ्या कौशल्यानें वर्णिलें आहे.

अगदीं पहिल्या प्रकरणांत दादासाहेब देशपांड्याच्या हीन कामुक वृत्ती-मुळें चिडून गेलेल्या येसूचें आकर्षक चित्र दिसेल. रखमाशीं वाह्यात्पणा केल्यावर व तिनें उलट खरडपट्टी काढल्यावर संतापलेला मालगुजार येसूच्या घरावर जप्ती आणतो. प्रसंग खरोखरीच बांका आहे. पण त्या म्हातारीचें सारें व्यक्तित्व अगदीं उठावदारपणें प्रकट झालें आहे. "मी आपल्या शेतावर कामाला राह्यला तयार आहे दादासाहेब, पांच वर्षांच्या बोलीनं." असें ती मालगुजाराला विनवते. पण मालगुजाराला म्हातारी कामावर यावयास नको आहे. तरण्याबांड रखमानेंच कामासाठीं शेतावर यावयास पाहिजे. "रखमाचा तरी माझ्या शेतावर काम न करण्याचा एवढा हट्ट का असावा?" असें तो रागानें विचारतो. रखमा कामावर यावयास तयार असेल तर दादासाहेब तावडतोब जप्ती उठविण्यास तयार आहेत. पण, त्याच्या मनांत काय चाललें आहे हें कळल्याबरोबर त्याच्या नजरेला नजर भिडवून रखमा अगदीं शांतपणें म्हणाली, "नाहीं, ती येणार नाहीं कामाला शेतावर तुमच्या." देशपांडे भयंकर संतापून तिला दमदाटी करूं लागल्यावर ती पुन्हां एकदा अगदीं निकरानें म्हणाली, "तुम्ही आज आम्हाला देशोधडीला लावाल. पण, लक्षांत ठेवा, तुमच्या रिठावर दिवा लावायला शिल्लक राह्यचं नाहीं कुणी." इतकें बोलून ती लगेच घरीं जाते आणि सुनेला व नातीला बरोबर घेऊन नेसत्या वस्त्रानिशीं जिकडे वाट फुटेल तिकडे जाऊं लागते. ज्या चंदनवाडीमध्यें तिनें एका काळीं देशमुखीचें सारें वैभव भोगलेलें होतें व जियें तिचा सारा जीव गुंतलेला जीव होता ती चंदनवाडी मोठ्या करारीपणानें सोडून जातांना तिच्या मनाला कसल्या भयंकर वेदना झाल्या असतील! पण उन्मत्त व पैसेवाल्या मालगुजाराच्या आमिषाला बळी पडून तिनें आपला व सुनेचा अध:पात करून घेतला नाहीं यांतच तिच्या व्यक्तित्वाचा प्रकर्ष झालेला आहे!

अशा प्रकारें या कादंबरींत येसू, रखमा व चंदन हीं तीन अत्यंत प्रभावी व्यक्तिचित्रें आपणांस पहावयास सापडतील. येथें चर्चासाठीं चर्चा नाहींत, लांबलांब व्याख्यानें पात्रें केवळ हौशीसाठीं बडबडत नाहींत,

निसर्गवर्णनें कादंबरींत मधून मधून आलींच पाहिजेत या संकेताला बळी पडून निसर्गाचीं वर्णनें लेखकानें केलेली नाहींत;—फक्त मानवी मनो-भावनांचा रम्य विलास त्यानें दाखविला आहे. आणि यासाठीं ज्या व्यक्ति यावेळीं माडखोलकरांनीं निवडल्या आहेत त्यासुद्धा वैभवशाली महालांत सुखासीन होऊन राजकारणी चर्चा करणाऱ्या पर्यंकपंडितांपैकीं अथवा त्याच ऐश्वर्यशाली समाजांत जन्मलेल्या, त्यांतच वावरणाऱ्या व त्याचे सारे दुर्गुण ज्याच्या अंगीं अगदीं मुरलेले आहेत अशा भोगलोलुप चंडोलां-पैकीं नसून देशोधडीला लागलेल्या व पोटासाठीं काचाडकष्ट करणाऱ्या दोन अनाथ विधवा आहेत. मानवी भावनांचें यथातथ्य वर्णन करावयाचें असल्यास फक्त एकाच विशिष्ट वर्गांतील एकाच प्रकारच्या व्यक्ति निवडल्या पाहिजेत असें मुळींच नाहीं. पुनरुक्तीमुळें असल्या व्यक्तींच्या चित्रांतील आकर्षण फार वेळ टिकणें शक्य नाहीं हें उघड आहे. या एकाच कादं-बरींत माडखोलकर जीर्ण संस्कृतींत वावरणाऱ्या लब्धप्रतिष्ठितांच्या किंवा सुखवादी लोकांच्या टोळींतून बाहेर पडले आहेत!

## कलात्मक संयम व व्यंजना

संस्कृतप्राचुर्यामुळें दुर्बोध, क्लिष्ट व कृत्रिम झालेल्या भाषेचाहि या कादंबरींत लेखकानें बराचसा त्याग केला आहे. येथें उन्मादक, आणि मदिर विलासी वातावरण आढळणार नाहीं; वाचकांच्या सुप्त विषयवासना उचंबळून सोडणारीं नग्न स्त्रीदेहाचीं गहिरीं वर्णनें आढळणार नाहींत, राजकारणांतील घटनांची अथवा राजकारणी चर्चांचीं व्यक्तिनिरपेक्ष, काल-निरपेक्ष आणि स्थलनिरपेक्ष वर्तमानपत्री 'कात्रणें' आढळणार नाहींत·— थोडक्यात, या कादंबरीला 'काता' कादंबरीप्रमाणें अभ्यासमंडळाचें किंवा चर्कीव्याख्यानाचें स्वरूप आलेलें नाहीं. नायक व नायिका याच्या प्रणयाचें स्वरूप अत्यंत सोज्वळ असून त्याचीं वर्णनेंहि अगदीं संयत आहेत. त्या प्रणयाचा विकासहि अतिशय संथपणें दाखविलेला असल्यामुळें त्यांत उन्मत्तपणाचा लेशहि आढळणार नाहीं. अर्थात् जें उन्मत्त करीत नाहीं तें प्रेम नव्हेच हा 'दुहेरी जीवन' मधील मुकुंदाचा सिद्धांत मान्य करावयाचें ठरविलें तर चंदन व अवधूत यांचें प्रेम ही एक

नीरस आणि रूक्ष बाबत ठरेल यांत शंका नाहीं. पण मुकुंदाच्या उन्मत्त, बेशरम प्रेमापेक्षां हें नीरस प्रेम शतपटींनीं बरें! लेखकानें सर्वच बाबतींत उत्कृष्ट संयम पाळल्यामुळें येथें 'शाप'मधील 'असनीचा उन्माद' नाहीं, किंवा बेशुद्ध पडलेल्या तरुणीच्या 'गोंडस जंघा'चें काव्यमय वर्णनहि नाहीं. लेखकानें वापरलेल्या संयमाचा आणि सूचकतेचा ( Suggestion ) किंवा व्यंजनेचा एक उत्कृष्ट नमुना या कादंबरींत आहे. अवधूतच्या खोलींत चंदन रात्रीं अडीच वाजेपर्यंत राहते. जबाबदारीची जाणीव दोघांनाहि त्या एकांतांत राहिली नाहीं तर त्यांत अस्वाभाविक असें कांहीं नाहीं. रात्रीं एकांतांत राहिल्यामुळें जें होणें अपरिहार्य होतें तेंच नेमकें झालें. या साऱ्या घटनेचा उल्लेख देखील न करतां काय घडलें असेल तें वाचकांच्या तर्कावर सोंपवून माडखोलकर मोकळे झाले आहेत व त्यासाठीं एक उत्कृष्ट सूचना दिली आहे. चंदन घरीं येऊन निजल्यावर म्हातारी येसू तिच्या अंगावरून हात फिरवून सहजच म्हणते, "किती गरम लागतंय ग अंग तुझं अन् श्वास तरी किती जोरानं चाललाय.' या एका व्यंजनेमुळें जें कलात्मक वैभव निर्माण झालें आहे तें त्या प्रणयी युगलाच्या एकांतांतील अतिप्रसंगाचें उन्मादक ( किंवा अगदीं साध्यासुद्धां ) वर्णनानें कधीं तरी निर्माण झालें असतें कां?

या कादंबरींत माडखोलकरांचीं नित्याचीं राजकारणी व इतर व्याख्यानें जवळ जवळ नाहींत असें आतांच विधान केलें. दोनतीन व्याख्यानें आहेत. पण तीं फार संयत व त्रुटित आहेत हें कबूल केलें पाहिजे. व्यक्तींच्या मानसिक आंदोलनाचें व विचार–विकारांचें वर्णन हेंच या कादंबरीचें वैशिष्ट्य आहे असें म्हटलें तरी चालेल. शिवाय बहुतेक प्रमुख व्यक्ति ( अवधूत सोडून ) मूळच्याच निकृष्ट ( उदाहरणार्थ, हिरा व अभिमन्यु या अस्पृश्य समाजांतील व्यक्ति आहेत. ) समाजांतील अथवा परिस्थितीमुळें निकृष्ट बनलेल्या ( येसू आणि रखमा ) असल्यामुळें माडखोलकरांच्या जवळ जवळ इतर सर्व कादंबऱ्यांतील विलासी व ऐश्वर्यपूर्ण वातावरण किंवा व्यभिचारी व्यक्तींचा कलात्मक धांगडधिंगा या गोष्टींना कंटाळलेल्या मनाला जरा प्रसन्नता येते व मानवी जीवनाचें एक नवीन दालन माडखोलकरांना उशीरां का होईना पण दिसलें या विचारानें समा-

ध्यान होतें. याच्या जोडीला ख्रिस्ती मिशनमधील वातावरण, व तेथील ब्रह्मचारिणींचें व्रतस्थ जीवन यांचें वर्णन हाहि या कादंबरींतील एक विशेष दिसून येतो.

नायक अवधूत हा गिरणीकामगारांच्या संपाचा पुढारी असला तरी तो आपल्या मित्रासमोर उगीचच व्याख्यान झोडीत बसत नाहीं, अथवा (‘कांता’ कादंबरींत आहे त्याप्रमाणें) स्वतःच्या कार्यक्रमाचें विवेचन करण्यासाठीं एखाद्याला आठदहा पानांचें लांबलचक पत्रहि लिहीत नाहीं. जीं एकदोन प्रेमपत्रें आहेत तींहि अगदींच त्रोटक आहेत. मजुरांच्या सभेंत अवधूत जीं भाषणें करतो त्यांच्या साग्रसंगीत रिपोर्टानें कादंबरीचीं कितीतरी पानें (डॉ. केतकरांच्या ‘विचक्षणा’ या कादंबरींतील बाळोबानें नेबरहुड हाउसमध्यें दिलेल्या व्याख्यानाच्या रिपोर्टाप्रमाणें) सहज अड-वितां आलीं असतीं. पण या ठिकाणीं असल्या व्याख्यानांना, रिपोर्टांना, पत्रांना, संवादांना व तात्त्विक चर्चांना माडखोलकरांनीं खूपच पायबंद घातलेला आहे. अभिमन्यु (अस्पृश्य), अवधूत (स्पृश्य), व सिराज (मुसलमान) या तिघांमध्यें त्रिराष्ट्रवादासंबंधीं जी चर्चा होते तेवढीच एक महत्त्वाची चर्चा या कादंबरींत आहे (पृ. ९०). पण ही चर्चाहि थोड्याच वेळांत आटोपली आहे व कोणीहि व्यासपीठावर उभा राहिल्या-प्रमाणें आवेशपूर्ण लांबलचक व्याख्यान झोडीत नाहीं हेंहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे!

## त्रिराष्ट्रवाद

अभिमन्यूची तक्रार अशी आहे कीं अस्पृश्य वर्गांतील मनुष्य कितीहि शिकला, कितीहि सुधारला, कितीहि पगारदार झाला तरी उच्च जातीचे हिंदु त्याच्याशीं तुसडेपणानेंच वागतात. अस्पृश्यांना हीन लेखणें यांत स्पृश्य हिंदु भूषणच मानतात. अशा प्रकारें हीन समजून बाहेर टाकलेल्या समाजाभोंवतीं हिंदूंच्या वाईटावर असलेल्या लोकांचा जर गराडा पडला तर तो दोष कोणाचा असा त्याचा बिनतोड सवाल आहे. हिंदुसमाज इतका अवाढव्य आहे कीं, त्याच्या एका टोंकाला काय चाललें आहे याचा दुसऱ्या टोंकाला पत्ता नसतो. यामुळें मुसलमान व ख्रिस्ती या दोन्ही

धर्माचें अस्पृश्य समाजावर केवढें आक्रमण झालें आहे याची उच्च जातींतल्या लोकांना कल्पनाहि नाहीं असें अभिमन्यूचें म्हणणें आहे. मुसलमानांचा 'आडदांड' धर्मप्रसार व ख्रिस्ती मिशनऱ्यांचा 'सूक्ष्म, सौम्य व सर्वव्यापी' धर्मप्रसार यांतील विरोध अभिमन्यूनें फार छान स्पष्ट केला आहे. "शाळा, कॉलेजें, रुग्णालयें, अनाथाश्रम, कंगालखाने वगैरें नानाविध संस्थातून हे ख्रिस्ती मिशनरी ज्या सात्त्विक पद्धतीनें आपल्या धर्माचा प्रसार अप्रत्यक्ष रीतीनें सारखा करीत आहेत, त्याची जाणीव आपल्याला तीव्रतेनें होत नाहीं व म्हणून त्याला प्रतिकार करण्याची कल्पनाहि आपल्या मनांत येत नाहीं. त्यांचा आश्रय, त्यांचीं औषधं, त्यांच्या शिष्यवृत्त्या, त्यांचीं पुस्तकं, त्यांचं सौजन्य या सगळ्यांतून त्यांचा धर्म भरलेला असतो न् तो सारखा कळत न कळत आपल्यावर आक्रमण करतो." (पृ. ९१) ख्रिस्ती धर्मप्रसाराचें अभिमन्यूनें केलेलें हें विश्लेषण अत्यंत मार्मिक आहे.

यानंतर अभिमन्यूनें एक तापदायक कल्पना मांडली आहे. हिंदूंपेक्षां अस्पृश्य अगदींच निराळे आहेत असें त्याचें म्हणणें आहे. हिंदु व अस्पृश्य याच्यामध्यें कांहींहि समान नाहीं, दोघांचे हितसंबंध भिन्न आहेत दोघांचे समाज भिन्न आहेत, धर्मग्रंथ निराळे आहेत, देवळें वेगळीं आहेत, फार काय, मेल्यानंतर शेवटची गति घेण्याचें स्मशानसुद्धां एक नाहीं इत्यादि मुद्दे आपल्या समर्थनार्थ मांडून अभिमन्यु विचारतो, "हिंदुत्वाचा असा कोणता हक्क आम्हाला मिळाला आहे कीं, ज्याच्या अभिलाषानं आम्ही स्वत:ला हिंदू म्हणवून घ्यावं?" अभिमन्यूचे हे विचार वाचून, महंमदअल्ली जिना यांनीं मुसलमान हे प्रत्येक बाबतींत हिंदूंपेक्षां अगदीं भिन्न कसे आहेत हें दाखविण्यासाठीं जें विवेचन कांहीं दिवसांपूर्वीं केलें होतें त्याची आठवण झाल्यावाचून राहणार नाहीं. हिंदूंनीं हजारों वर्षें अस्पृश्यांना हीनपणें वागविलें असल्यामुळें त्यांचा व अस्पृश्यांचा कोणताच लागाबांधा नाहीं आणि म्हणून अस्पृश्यांचें 'स्वतंत्र राष्ट्र' आहे असा अभिमन्यूचा आग्रह आहे. "...... हिंदु आणि मुसलमान हे जितके एकमेकांपासून विभक्त असतात, तितकेच आम्ही हिंदूंपासून विभक्त आहोंत, आमचेहि आचारविचार विभिन्न आहेत. म्हणून मुसलमानांचं

जसं हिंदुस्थानांत हिंदूंहून अगदीं वेगळं असं स्वतंत्र राष्ट्र आहे, तसंच आमचंहि हिंदूंहून वेगळं असं स्वतंत्र राष्ट्र आहे." (पृ. ९४)

अस्पृश्यांना आज स्वतःचा धर्म नाहीं, स्वतःची संस्कृति नाहीं, त्यांचा स्वतःचा जो धर्म असेल अथवा जी संस्कृति असेल ती सारी हिंदूंनीं गाडून टाकली असून अवाढव्य हिंदु समाजाच्या पोटांत अस्पृश्य समाज मृतप्राय स्थितींत आज सडत पडलेला आहे अशी अभिमन्यूची तक्रार आहे. त्याचा स्वाभिमान आणखी जागृत होतो व तो आवेशानें म्हणतो, "माझं समाधान आमचा समाज हा महाराष्ट्राचा नुसता बलाढ्य घटक होऊन भागणार नाहीं. ही महाराष्ट्र भूमि मूळची आमची आहे. महाराष्ट्रांत सर्रास रूढ असलेली नागपूजा आणि नागनामं हीं आम्हां नागवंशी भूमिजनाकडून घेतलीं आहेत मागाहून या भूमीचं आक्रमण करणाऱ्या आर्यांनीं. ...हा महादेव आर्यांचा, ब्राह्मणांचा देव नव्हे. हा आमचा, आह्मा आदिवासी भारतीयांचा देव आहे...हिंदूंनीं आमचं हें भव्य दैवत आमच्यापासून हिरावून घेतलं आणि आमच्या जन्मभूमींत आम्हाला गुलाम बनवून टाकलं—" (पृ. ११७).

ही कादंबरी १९४३ च्या जूनमध्यें प्रसिद्ध झाली. त्यानंतर गेल्या पावणेचार वर्षांच्या काळांत ज्या घटना घडल्या व आजहि आपल्या डोळ्यांसमोर घडत आहेत त्या नीट लक्षांत घेतल्या तर अस्पृश्यांचें स्वतंत्र राष्ट्र आहे या अभिमन्यूच्या सिद्धांतांतील मर्म तावडतोब कळून येईल. 'हिंदू हे याठिकाणीं मुसलमानांइतकेच उपरे आणि परके आहेत' अशासारखें विधान एका अस्पृष्ट सभासदानें नुकतेंच कन्स्टिटयुअंट असेंब्लींत केलें होतें हें वाचकास आठवत असेलच.

## साहित्य आणि टीका

प्रस्तुत कादंबरींत एकदोन ठिकाणीं साहित्याचें व टीकेचें कार्य याविषयीं थोडीशी चर्चा आलेली आहे. टीकाकाराच्या दृष्टीनें तिचें महत्त्व असल्यामुळें येथें तिचा उल्लेख करीत आहे. साहित्यिक टीकेच्या बाबतींत भारी हळवे असतात; स्वयंपाक बिघडला असें कोणी म्हटलें तर, 'तुम्हीच स्वयंपाक करा' असें स्वयंपाक करणारानें म्हणावें त्याप्रमाणें टीकाकारानें

एखाद्याच्या साहित्यावर टीका केली तर लगेच तो साहित्यिक म्हणतो, 'मग तुम्ही लिहून दाखवा कीं.' आणि यामुळेंच, साहित्यिक लोक टीकेच्या बाबतींत हळवे असतात अशी अवधूत तक्रार करीत आहे. अभिमन्यूची बहीण आणि चंदनची मैत्रीण हिरा अवधूतच्या या तक्रारीला उत्तर देते व साहित्यिकांची बाजू मांडते. " त्याचें कारण आहे. साहित्यिकांनीं कसंहि लिहिलं, तरी तुमची तोंडं उघडतात तीं त्याना नांवं ठेवण्यासाठींच उघडतात. " ( पृ. १९६ ) टीकाकारांची भूमिका केवळ दोषदर्शनाचीच असते, गुणग्रहणाचें सामर्थ्य त्यांच्यांत नसतें, साहित्यिक जें कांहीं करील त्याच्याबरोबर उलट बोलणें हेंच काम टीकाकार करीत असतात असें हिराचें म्हणणें आहे.

## साहित्याचें कार्य

मागें 'शाप' या कादंबरींत कलेचें स्वरूप व कलावंताची भूमिका याची चर्चा येऊन गेली होती हें वाचकास आठवत असेलच. कलेच्या स्वरूपाविषयीं व कार्याविषयीं निशिकातानें सांगितलेलें तत्त्वज्ञान पाहिल्यानंतर आता आपण अवधूतनें साहित्याच्या कार्याचें जें विवेचन केलें आहे तें पाहूं. यापुढें नुसती कलात्मकता, अथवा अवलोकनचातुर्य असून भागणार नाहीं; क्रांतीच्या कार्याला चालना देणें व समाजाच्यापुढें ध्येयें व आदर्श ठेवणें हीं कामें यापुढें साहित्याला करावीं लागणें अपरिहार्य आहे असें अवधूतचें मत आहे. तो म्हणतो, " साहित्यिक जोंवर निव्वळ भूतदया आणि सुधाणा यांवरच भर देत राहतील, तोंवर समाजांत क्रांतीला अवश्य असलेली ईर्ष्या उत्पन्न करण्याचं प्रभावी कार्य त्यांच्या हातून होणं अशक्य आहे......साहित्यिक हा नुसता अखबारनवीस असून भागणार नाहीं; नुसता प्रेक्षक, नुसता कथक असून चालणार नाहीं. मी त्याच्याकडे क्रांतीचा अग्रदूत, भविष्याचा द्रष्टा म्हणून पहातो. " याविषयीं अधिक विवेचन पुढें करावयाचें असल्यामुळें अवधूतनें साहित्याच्या कार्याविषयीं केलेलें हें विवेचन मला संपूर्णपणें मान्य आहे इतकेंच याठिकाणीं नमूद करून ठेवतों.

११

# प्रमद्वरा

‘ चंदनवाडी ’ प्रसिद्ध झाल्यानंतर अवघ्या पांचच महिन्यांनीं १९४३ च्या ऑक्टोबरमध्यें ‘ प्रमद्वरा ’ ही कादंबरी प्रसिद्ध झाली. एव्हांना ९ ऑगस्ट ४२ च्या प्रसिद्ध चळवळीचें एक पर्व केव्हांच संपून गेलें होतें, व हिंदी राजकारणांत एक प्रकारची विचित्र निश्चलता उत्पन्न झाली होती. अशा काळांतील ही कादंबरी तत्कालीन राजकीय परिस्थितीवर आधारलेली आहे. ‘ चंदनवाडी ’ लिहींत असतांच ऑगस्ट-चळवळीची पहिली विलक्षण लाट माडखोलकरांनीं डोळ्यांनीं पाहिली होती. त्या लाटेचे तुषार कोणत्याहि प्रकारें त्यांच्या स्वत:च्या अंगावर उडण्याचा संभव नसला तरी त्या लाटेचा आवेश त्यांना दिसला होता. ‘ चंदनवाडी ’ मध्यें या घटनांचा उल्लेख नाहीं हें खरें आहे. पण, चळवळ सुरू होण्यापूर्वीं जवळजवळ दीड महिना अगोदर त्या कादंबरीचें लेखन माडखोलकरांनीं सुरू केलें होतें हें कारण त्यांच्या वतीनें सांगतां येईल. पण १९४३ च्या ऑक्टोबरमध्यें लिहिलेल्या कादंबरींत या घटनांचें वर्णन येणें अपरिहार्य आहे असें मानलें तर माडखोलकरांनीं आपली ती अपेक्षा एका बाबतींत पूर्ण केली आहे असें म्हणावें लागेल. युद्धकाळांत लिहिलेल्या ‘ नवे संसार ’ या कादंबरींत युद्धामुळें झालेला मनाचा क्षोभ व्यक्त करणें माडखोलकरांना अपरिहार्य वाटलें; मग १९४२ सालीं प्रत्यक्ष डोळ्यांसमोर घडलेल्या अभूतपूर्व घटनांमुळें त्यांच्या हृदयाचा थोडा तरी क्षोभ झाला असण्याचा संभव आहे आणि तो क्षोभ कादंबरींत त्यांनीं व्यक्त करावा हेंहि स्वाभाविकच आहे !

१९४२ च्या ९ ऑगस्टनंतर झालेल्या धामधुमीची ही कहाणी आहे. गोळीबार, लाठीमार, जाळपोळ इत्यादि भयानक गोष्टींची अक्षरश: धुमश्चक्री चालू असतां प्रमद्वरा, तिची मैत्रीण मालती, मंगला आणि स्वामीजी यांनीं त्या चळवळींत केलेल्या गोष्टींचें या कादंबरींत वर्णन आलें आहे.

प्रमद्वरेचा पति प्रमोद हा वकील आहे. वास्तविक कोणत्याहि चळवळींत कसलीहि प्रत्यक्ष कृति करण्याचें सामर्थ्य त्याच्या ठायीं मुळींच नसलें तरी त्याचा कम्युनिस्टांकडे विशेष ओढा असल्यामुळें एकाच घरांत राजकारणाचे दोन पंथ निर्माण झाले आहेत. बायको ऑगस्ट चळवळींत प्रत्यक्ष भाग घेणारी आणि नवरा कम्युनिस्टांचा 'तात्त्विक' चेला असा हा समरप्रसंग आहे! प्रमद्वरा ही कट्टी काँग्रेस कार्यकर्त्री असून गुप्त चळवळींत तिचा बराचसा भाग आहे. प्रमोद कम्युनिस्ट विचारसरणीचा असल्यामुळें त्याच्याकडे अनेक भाईमंडळी (मार्क्सच्या तत्त्वज्ञानाची चर्चा करण्यासाठीं) जमत असत. चर्चा करतां करतां या भाईंनीं आपल्या कुवतीप्रमाणें व वकूबाप्रमाणें हेरगिरी करण्याची कामगिरीहि जोरांत चालू ठेवली असून या हेरगिरीचा प्रमद्वरेच्या व तिच्या सहकाऱ्यांच्या मार्गांत मोठाच अडथळा निर्माण झालेला आहे.

स्वामीजी प्रमद्वरेच्या घरीं लपून छपून आले असतां असल्याच हेरगिरीमुळें पोलिसांना त्याचा सुगावा लागतो. रात्रीं पोलिस स्वामीजींना धरण्यासाठीं प्रमद्वरेच्या घरीं आले असता मागच्या दारानें भर पावसांत तुडुंब भरलेला नाला ओलाडून मालतीबाईसह स्वामीजी पसार होतात. पोलिसाच्या तावडींतून अशा प्रकारें सुटल्यावर मालतीबाई तडक आपल्या घरीं जातात. परंतु अंबाझरीच्या ओसाड बंगल्यांत मंगलाबेन नावाची कार्यकर्त्री एकटीच होती. तिच्यावरील सकट टाळण्यासाठीं पुढच्या अडचणींचा डोंगर दिसत असतांहि स्वामीजी धीरानें व कर्तव्याच्या जाणीवेनें तिकडे जातात. पोलिस माग काढीत तिकडेहि जातात. त्याना चुकविण्यासाठीं मागच्या झाडींतून पसार होत असतांच पोलिसाची गोळी लागून स्वामीजी घायाळ होतात व अखेर कामीं येतात. मंगलाबेनलाहि पोलिस पकडतात.

आपल्या घरांत स्वामीजींना राहता आलें नाहीं आणि यामुळेंच त्यांच्या जिवाला धोका उत्पन्न होणार याची जाणीव होताच प्रमद्वरा दुःखातिरेकानें हाय खातें. नवऱ्याकडे येणाऱ्या कम्युनिस्ट हेराचेंच हें काम आहे तिला कळून चुकतें.

## स्वप्नरंजन

येथपर्यंत कादंबरीचा कथाभाग सत्यसृष्टींतच घडत आहे याविषयीं कसलीच शंका नाहीं. पण, यापुढें मात्र सारें स्वप्नरंजन आहे. स्वामीजी प्रमद्वरेकडून अपरात्रीं मागच्या दारानें पळून गेल्यावर पहाटे तीनच्या सुमारास त्यांना पोलिसांची गोळी लागते व ते मरतात. बरोबर याच क्षणाला अर्धवट गुंगींत असलेल्या प्रमद्वरेला स्वामीजींनीं रस्त्यावरून मार-लेली हाक स्पष्टपणें ऐकूं येते. ती ताबडतोब उठते, दार उघडते व त्यांना आंत घेते. त्याचे कपडे रक्तानें चिंब झाले आहेत असें प्रमद्वरेला दिसून येतें. ती त्यांना बसावयास सांगते व चहा करून देते. ते चळवळीच्या स्वरूपाविषयीं व यशापयशाविषयीं तिच्याशीं भरपूर बोलतात व बोलणें ऐन रंगांत आलें असतांनाच एकदम अदृश्य होतात. प्रमद्वरा घाबरते व मोठ्यानें ओरडते. तिचा नवरा जागा होतो. स्वामीजी नुकतेच येऊन गेल्याचें ती त्याला सांगते. विचारांच्या अतिरेकामुळें तिचें डोकें भ्रमल्या-सारखें झाले आहे असें त्याला वाटतें.

## पतीचा हृदयपालट

दुसऱ्या दिवशीं रात्रीं तीन वाजतां ( म्हणजे स्वामीजींच्या मृत्यूनंतर बरोबर चोवीस तासांनीं ) काल रात्रीं याचवेळीं प्रमद्वरा झोपेंत ओरडली होती याची प्रमोदला आठवण झाली व तो तिच्याजवळ गेला. तिला फार तहान लागलेली होती. सातआठ चमचे पाणी प्याल्यावर ‘ तुम्ही एक गोष्ट कराल माझ्यासाठीं ! ’ असें ती प्रमोदला विचारते. तो तिच्यासाठीं यावेळीं काय वाटेल तें करावयाला तयार आहे. ती म्हणते, “ मला एकच गोष्ट हवी आहे तुमच्यापासून. तुमचं न् माझं आयुष्य भिन्न होतं. त्यामुळें काल स्वामीजींना आपल्या घरांतून निघून जावं लागलं; न् त्यांचा अंत झाला तशा रीतीनं. मी माझं आयुष्य त्यांच्या कार्याला वाह्यलंय. तुम्हीहि आपलं वहावं अशी इच्छा आहे माझी. ”

तो तिला एकदम उत्तर देत नाहीं, थोडासा कचरतो. कारण, कार्याला वाहून घेण्यासाठीं लागणारें मनाचें सामर्थ्य आपल्या ठायीं अगदींच नाहीं

असें त्याला वाटतें. पण ती आपला आग्रह सोडीत नाहीं. त्याच्याहि मनावर परिणाम होतो व अखेर तो म्हणतो, " माझं आयुष्य मी तुला, तुझ्या कार्याला दिलं प्रमा, आजपासून--"
संपली प्रमद्वरेची कहाणी !

## वीरमृत्यूची दाहक स्मृति

९ ऑगस्टनंतर अचानक भडकलेल्या वणव्याचें वर्णन माडखोलकरांनीं नेहमींप्रमाणेंच आकर्षक रीतीनें केलें आहे. चळवळींत भाग घेऊन वाटेल तो त्याग, वाटेल तें दिव्य करावयास तयार झालेल्या प्रमद्वरेच्या मनाचा कठोर निश्चय झालेला आहे. लोकक्षोभाचा वणवा इतका भडकविण्यास राज्यकर्तेच जबाबदार आहेत; आणि निरपराध लोकांचें रक्त सांडल्यामुळें त्याचे भीषण परिणाम राज्यकर्त्यांना भोगावे लागल्याशिवाय राहणार नाहींत. लोकांचें हें रक्त वाया जाणार नाहीं, बदला घेतल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं, इत्यादि जळजळीत विचार ती स्पष्टपणें बोलून दाखवीत आहे. सुरू झालेली चळवळ यशस्वी झाली नाहीं तरी पुढच्या अधिक भीषण आणि परिणामकारक चळवळीला त्यायोगें उत्तेजन मिळेल, ज्यांनीं बलिदान केलें असेल त्याचें तें बलिदान कधींहि वाया जाणार नाहीं अशी तिची खात्री आहे. " प्रत्येक घरातून जेव्हां एकएक बळी या लढ्यांत पडेल, तेव्हांच त्या वीरमृत्यूची दाहक स्मृति पारतंत्र्याविषयींची चीड आपल्या हृदयांत सदैव धगधगत ठेवील. आणि, हा लढा जरी कदाचित् आपल्या कमनशिबानं फसला, तरी पुढल्या अधिक भीषण लढ्याना लागणारं इंधन त्या स्मृतींतून भावी पिढ्यांना मिळेल."

ज्या पद्धतीनें ही चळवळ सुरू झाली ती पद्धत गांधीजींनीं अगोदर ठरवून दिली होती काय, किंवा त्यांना ती पसंत पडण्यासारखी तरी आहे काय असे प्रश्न प्रमोद तिला विचारीत आहे. यावर तिचें म्हणणें असें कीं, सर्व व्यवहार बंद पाडून राज्ययंत्राला खीळ घालण्याची गांधीजींची कल्पना आणि सरकारी रोषाला कॉंग्रेस बळी पडल्यावर प्रत्येकानें स्वतःची मनोदेवता सांगेल त्याप्रमाणें वागण्याची त्यांनीं लोकांना दिलेली मुभा या गोष्टींचा शक्य तोच अन्वय लावून लोक या चळवळींत पडले आहेत.

आणि उद्या कदाचित आपल्याला ही चळवळ मान्यच नव्हती असें त्यांनीं जाहीर केलें तर लोक फशी पडणार नाहींत का असा तो पुन्हा प्रश्न विचारतो. गांधीजींनीं खरोखरच असें जाहीर केलें तरी प्रमद्वरा त्यांना दोष देण्यास तयार नाहीं. परिस्थिति विलक्षण बिघडली असल्यामुळें, कोणीहि नेता न उरल्यामुळें, लोकांनीं आपल्या बुद्धीप्रमाणें वर्तन केलें तर त्यांत कांहींहि बिघडलें नाहीं असें ती आग्रहानें म्हणते. "जगांत आपद्धर्म म्हणूनहि कांहीं असतोच ना! आमचे सगळे पुढारी एकदम उचलून तुरुंगांत टाकल्यावर जें निर्नायक (?) निर्माण झालें, त्यांतून आमच्या बुद्धीप्रमाणं प्रतिकाराचा मार्ग काढला आहे आम्ही हा." लोकांनीं स्वतः-च्या बुद्धीला योग्य वाटेल तें केल्यामुळें गांधीजींनीं चळवळ अमान्य केली तरी तिचे सारे परिणाम लोक मुकाट्यानें भोगतील असें प्रमद्वरेचें म्हणणें आहे.

प्रमद्वरेच्या कोमलतेंतच एक प्रकारची 'काव्यमय क्रूरता' आहे, तिच्या अबलतेंतच एक प्रकारचें 'मोहक बल' भरलेलें आहे. कच्च्या दिलाच्या नवऱ्याला ती सडेतोडपणें म्हणते, "पुरुष मेणचट आणि शेळपट झाले असतां त्यांचं पौरुष चेतविण्यासाठीं स्त्रीला क्रूर बनल्याशिवाय गत्यंतर उरत नाहीं."

प्रमद्वरेला गांधीजींविषयीं वाटणाऱ्या अमर्याद भक्तीमुळें व काँग्रेसच्या अत्याचारी चळवळींत ती महत्त्वाचा भाग घेत असल्यामुळें तिचे नव-ऱ्याशीं नेहमीं खटके उडतात. एकाच घरांत दोन राजकीय पंथ असण्याचा हा अपरिहार्य परिणाम आहे. ऑगस्टच्या चळवळीचा पहिला भर ओस-रल्यावर सगळीकडे एकप्रकारची निश्चल अवस्था निर्माण झाली. या गोष्टीचा फायदा घेऊन प्रमोद प्रमद्वरेची हेटाळणी करण्याची एकहि संधि वाया जाऊं देत नाहीं. नवऱ्याच्या या क्षुद्र व तिरस्करणीय मनोवृत्तीचा राग येऊन प्रमद्वरा एकदा चिडून म्हणते, "तुमची फत्ते झाली खरीच. या देशांत गेलीं हजार वर्षें तुमच्यासारख्या पराभूत मनोवृत्तीच्या लोकांची फत्ते होत असल्यामुळेंच त्याचं डोकं पारतंत्र्याच्या गर्तेतून वर निघणें अशक्य झालें आहे."

## ध्येयवादी नायिका व ध्येयहीन नवरा

या कादंबरीची नायिका अत्यंत करारी व ध्येयवादी आहे; आणि ती आपल्या निष्क्रिय, ध्येयशून्य व उगाच गप्पा मारणाऱ्या नवऱ्याला ध्येयवादी व कार्यप्रवण बनविते. ‘कांता’ कादंबरींत जी परिस्थिति आहे तिच्या बरोबर उलट परिस्थिति आहे ही. असामान्य कर्तबगार व ध्येयवादी पुरुषाच्या संसारांत स्त्री सुशिक्षित असली तरी तिची कशी कुचंबणा होते. व तिच्या मनाचा कसा कोंडमारा होतो याचें चित्र ‘कांता’ कादंबरींत पहावयास मिळेल. कांतेची जी अवस्था तीच माडखोलकरांच्या इतर नायिकाचीहि थोडीफार आहे. यामुळें या सर्व नायिकांपेक्षां निष्क्रिय व ध्येयशून्य नवऱ्याला स्वतःच्या कार्याकडे खेचून घेणारी प्रमद्वरा अगदीं निराळी वाटते.

## स्वामीजींचीं प्रवचनें

कर्तव्यतत्परता, धाडस, प्रखर ध्येयवाद व करारीपणा या गुणांचें स्वामीजींत उत्कृष्ट मिश्रण झालें आहे. स्वभावलेखनाच्या दृष्टीनें ही व्यक्तिरेखा चांगली आहे. पण माडखोलकरांना स्वामीजींचे राजकीय विचार व ज्या चळवळींत ते हिरीरीनें पडले होते त्या चळवळीच्या अपयशाची त्यांनीं केलेली मीमांसा या गोष्टी त्यांच्या साहसापेक्षां व ध्येयवादापेक्षां खास अधिक महत्त्वाच्या वाटत असल्या पाहिजेत. कारण, गांधीजींच्या राजकारणाची, तत्त्वज्ञानाची व त्यांच्या चळवळीची हेटाळणी करण्याची माडखोलकरांना जी विचित्र आवड आहे ती या कादंबरींत त्यांनीं गांधीजींच्या चळवळींत अंग मोडून काम करणाऱ्या त्यांच्या एका अनुयायाच्याच मदतीनें पूर्ण करून घेतली आहे.

मार्क्सवादाच्या अपुरेपणाविषयीं स्वामीजींचें काय म्हणणें आहे तें प्रथम पाहूं. मार्क्सवादाची मौलिक उपयुक्तता त्यांना पटलेली आहे. आणि याच कारणामुळें मार्क्सवादातील सर्वांगीण समतेची राष्ट्रीयत्वाच्या जुन्या कल्पनांना जोड देऊन त्यायोगें आपल्या जीवनांतील सर्व प्रकारचें पारतंत्र्य आणि सर्व प्रकारची विषमता यांच्यावर शस्त्र धरणाऱ्या राष्ट्रीय

क्रांतिवादाचें सर्वथैव योग्य असें तत्त्वज्ञान त्यांना प्रसृत करावयाचें आहे. पण, मार्क्सवादांतील 'भौतिक' समतेपेक्षां स्वामीजींना आपल्या उपनिषदांतील 'आध्यात्मिक समतावाद' सगळयाच दृष्टींनीं अत्यंत उच्च व पूर्ण वाटतो.

मार्क्सवादातील उणीव दाखवून झाल्यावर स्वामीजी ४२ च्या चळवळीच्या अपयशाची मीमांसा करीत आहेत. युद्ध सुरू झाल्यापासून गांधीजींचें धोरण सर्वच बाबतींत धरसोडीचें आहे अशी त्यांची तक्रार आहे. "धड सहकार नाहीं किंवा धड असहकार नाहीं, धड युद्धकार्याला व्यवहारबुद्धीनं पाठिंबा नाहीं, किंवा धड अहिंसेच्या तत्त्वासाठीं खणखणीत युद्धविरोध नाहीं." गांधीजींच्या मनाची अशी डळमळीत आणि अनिश्चित अवस्था होती. आणि यामुळें त्यांनीं सामुदायिक चळवळीची उठावणी करण्याचें ठरवतांच आतां आपल्याला काय करतां येईल तें करावें या भावनेनें स्वामीजी त्या चळवळींत पडले होते.

परंतु सदरहू चळवळ यशस्वी होईल असें मात्र स्वामीजींना मुळींच वाटत नाहीं. 'या चळवळीच्या मागें कोणत्याहि प्रकारची योजना नाहीं किंवा संघटनाहि नाहीं' हें चळवळीच्या अपयशाचें कारण स्वामीजी देतात. फार मोठ्या प्रमाणावर सामुदायिक चळवळ सुरू करण्यापूर्वी अनुयायांना त्याविषयीं निश्चित सूचना द्याव्या लागतात, कार्यक्रम ठरवावा लागतो. या चळवळीच्या बाबतींत गांधीजींनीं असें कांहींच केलें नाहीं आणि आपल्या 'नेहमींच्या साक्षात्कारी पद्धतीनें' तिला चालना दिली अशी स्वामीजींची तक्रार आहे. "देवावर भार टाकून गेले सहा सात महिने ते नुसता 'हिंदुस्थान सोडून जा' हा महामंत्र जपत राहिले. त्या मंत्राची प्रक्रिया, त्याचं पुरश्चरण कांहीं शेवटपर्यंत त्यानीं कुणाला सांगितलें नाहीं, किंवा आपल्या स्वतःच्याहि मनाशीं कांहीं ठरवलं नाहीं." तात्पर्य, गांधीजींनीं ही चळवळ अगदीं आंधळेपणानें सुरू केली असल्यामुळें ती यशस्वी होणें शक्य नाहीं असें स्वामीजींना वाटतें.

आयर्लंडमध्यें जी सिनफेन चळवळ झाली होती त्या पद्धतीची चळवळ हिंदुस्थानांत सुरू करावी अशी स्वामीजींची कल्पना होती. पण त्या चळवळीला हिंसेचा वास येण्यासारखा असल्यामुळें गांधीजींना ती मानवणें

शक्य नाहीं असें त्याना वाटलें. सिनफेन चळवळीच्या मागें जसा ‘ पद्धतशीर कार्यक्रम ’ आणि ‘ पोलादी स्वयंसेवकदल ’ होतें तसें गांधीजींच्या चळवळीच्या मागें कांहींहि नसल्यामुळें सेनानायक पडल्यावर शिस्तीच्या व मार्गदर्शनाच्या अभावीं मोठमोठ्या फौजा घाबरून रणांगणांतून पळत जाव्यात त्या सारखाच प्रकार गांधीजींच्या चळवळीचा झाला आहे असें स्वामीजी म्हणत आहेत. शिस्त व संघटना यांच्या अभावीं जें पारतंत्र्य आपल्या कपाळीं आलें आहे त्यापासून कोणताहि धडा आपण घेतला नाहीं हेंच चळवळीच्या ‘ अशास्त्रीय प्रवर्तनानें ’ सिद्ध झालें आहे असें विवेचन करून स्वामीजी म्हणतात, “ गेलं सबंध वर्ष बापू लोकक्षोभ सारखा चेतवीत होते. पण हा चेतविलेला लोकक्षोभ कशा रीतीनें कार्मी लावावयाचा हें त्यांनीं स्वतः शेवटल्या क्षणापर्यंत निश्चित केलं नाहीं. त्यामुळें आतां ही प्रभावी चळवळ, रानांतल्या वणव्याप्रमाणें, यदृच्छेनं घडेल तें विध्वंसक कार्य करीत अखेर आतल्या आंत धुमसत दबून जाणार आहे. ”

गांधीजींच्या कार्यक्रमांतील अनेक उणीवा अगोदरच स्वामीजींच्या लक्षांत कां आल्या नाहींत अशी कोणाला शंका आल्यास स्वामीजींनीं त्या शंकेचें निरसनहि केलें आहे तें लक्षांत घ्यावें. ( स्वामी गोळी लागून मेल्यावर प्रमद्वरेच्या घरीं येतात व तेथें वरील राजकीय व्याख्यान प्रमद्वरेला ऐकवितात. हें स्वप्नरंजन आहे हें वाचकांनीं विसरूं नये. ) स्वामीजींचें म्हणणें असें कीं, गेलीं पंचवीस वर्षें गांधीजींच्या निकट सांनिध्याचे असे कांहीं विलक्षण संस्कार त्यांच्या शरीरावर, मनावर व बुद्धीवर झाले होते कीं, पार्थिव देह नष्ट होऊन त्यांचा आत्मा जेव्हां त्या संस्कारांतून मुक्त झाला तेव्हां एकदम दिव्य दृष्टि प्राप्त झाल्याप्रमाणें त्यांना गांधीजींचे सारे दोष अगदीं लख्ख दिसूं लागले. ( गांधीजींच्या अत्यंत निकट सांनिध्यांत असलेल्या लोकांना त्यांचे दोष केवळ मृत्यूनंतरच कळतील असें तर माडखोलकरांना स्वामीजींच्या तोंडून सुचवावयाचें नाहीं ना ! )

‘ पार्थिव देहाची खोळ पडून जाऊन ’ स्वामींचा आत्मा गांधीजींच्या विविध संस्कारांतून जेव्हां मोकळा होतो तेव्हां त्यांना गांधीजींच्या तत्त्वज्ञानाची आणि कार्यपद्धतीची अशास्त्रीयता आणि अपूर्णता अगदीं स्पष्ट

दिसूं लागते. आणि आपलें भाषण ते पुढीलप्रमाणें संपवितात. "म्हणून म्हणतो कीं त्यांनीं आपल्या अहंनिष्ठ साक्षात्कारी पद्धतीनं सुरू केलेली ही अशास्त्रीय चळवळ यशस्वी होण्याची यत्किंचितहि शक्यता नाहीं." भाषण आटोपल्याबरोबर स्वामीजी एकदम अदृश्य होतात व प्रमद्वरा किंचाळते.

वाचकाच्या लक्षांत आलेंच असेल कीं, निधनोत्तर (post mortem) स्वामीजींनीं केलेल्या या भाषणांतील 'अहंनिष्ठ साक्षात्कारी' पद्धत व 'अशास्त्रीय चळवळ' हे शब्द अगदीं थोड्या फरकानें 'मुखवटे' या कादंबरींतील प्रियदर्शनानेंहि वापरले आहेत. ('मुखवटे' पृ. ३५० व ३६० पहावीं.) गांधीजींची अहंनिष्ठा व अहंकार याविषयीं त्या कादंबरींतील उत्तमरावांनींहि वक्तृत्वपूर्ण विवेचन केलेलें वाचकांस आठवत असेलच. गांधीजींच्या राजकारणावरील ही टीका माडखोलकरांच्या कादंबऱ्यांत इतकी ठराविक झाली आहे कीं, केवळ स्वतःच्या मनांतील मळमळ काढून टाकण्यासाठींच माडखोलकरांनीं निरनिराळ्या कादंबऱ्यांतील पात्रांचे मुखवटे धारण केले आहेत याविषयीं मला तरी कांहींच शंका वाटत नाहीं.

## विनायकं प्रकुर्वाणः......

१९४२ च्या अभूतपूर्व लोकक्षोभाचा मसाला मिळाला असून अवघ्या शंभर पृष्ठांच्या या चोपड्यांत माडखोलकरांची प्रतिभा आटून गेली आहे. याचें कारण काय असावें? त्या चळवळीविषयीं, तिच्यांतील घटनांविषयीं व तिच्यांत कायावाचामनेंकरून भाग घेणाऱ्या व्यक्तींविषयीं कसलीहि सहानुभूति, कसलाहि जिव्हाळा त्यांना वाटत नाहीं हेंच खरें कारण आहे. जिव्हाळा असलेल्या एखाद्या कलावंतानें त्या प्रचंड चळवळींतून अक्षरशः महाभारत रचलें असतें! पण, चळवळींत किंवा चळवळ करणाऱ्या व्यक्तींत माडखोलकरांचें मन रमत नसून तें गांधीजींच्या राजकारणाची व तत्त्वज्ञानाची नीरस चर्चा करण्यांतच रमतें हें उघड आहे. व्यक्तींत ज्यांचें मन रमत नाहीं अशा कलावंतांनीं घटनांचें कितीहि कौशल्यपूर्ण वर्णन केलें तरी त्यांचा तटस्थपणा, अलिप्तपणा मुळींच झाकत नाहीं हें माडखोकरांनीं पुन्हां एकदा स्पष्ट केलें आहे!

# १२

## माडखोलकरांच्या कादंबऱ्यांतील स्त्रीजीवन

" Who ordered, that their longing's fire
Should be, as soon as kindled, cool'd ?
Who renders vain their deep desire ?
A God, a God their severance ruled
And bade betwixt their shores to be
The unplumb'd, salt, estranging sea. "

**Matthew Arnold**

माडखोलकरांच्या नायिकांच्या जीवनाचा इतिहास म्हणजे त्यांची अनू म्हणते त्याप्रमाणें– 'स्त्रीजातीच्या मानसिक गुलामगिरीचा' इतिहास होय. त्यांच्या साऱ्याच नायिका थोड्याफार प्रमाणांत या मानसिक गुलामगिरीला बळी पडलेल्या आहेत. पतीच्या इच्छा, आकांक्षा, विकार यांना स्वेच्छेविरुद्ध शरण जाणें भाग पडल्यामुळें त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा निर्घृण कोंडमारा झालेला पाहणें आपल्या नशिबीं आलें आहे. आणि इतकें करूनहि त्या बिचाऱ्यांचें मानसिक स्वाथ्य अगदींच क्षणभंगुर ठरलें आहे, हा मोठाच दैवदुर्विलास होय !

या सर्व नायिकांच्या व त्यांच्या मैत्रिणींच्या जीवनाकडे पाहिलें असतां एक गोष्ट प्रामुख्यानें नजरेंत भरते. ती ही कीं, 'शाप' मधील सुहास, 'नवे संसार' मधील मुक्ता, 'चंदनवाडी' तील येसू व रखमा आणि 'प्रमद्वरा' कादंबरींतील प्रमद्वरा यांचीं उदाहरणें सोडून दिलीं तर ज्याला व्यक्तिमत्त्व म्हणतात तें एकीच्याहि ठिकाणीं आढळत नाहीं. नुसतें सुशिक्षण व सुसंस्कृतता म्हणजे कांहीं खरें व्यक्तिमत्त्व नव्हे. सर्वजणी 'अमर्याद इच्छा करणाऱ्या निराश मनाला' विरंगुळा उत्पन्न करण्याची व्यर्थ धडपड करीत आहेत. सुहास, मुक्ता व प्रमद्वरा सोडून दिल्या तर दौर्बल्य हा बहुतेक सर्वांचा स्थायीभाव आहे खरोखर. सर्वांनींच आपल्या इच्छांचा निर्दयपणें चुराडा केलेला आहे, स्वतःच्या दौर्बल्याची व परवशतेची स्वमुखानें

जाहीर कबुली दिली आहे. सुहाससुद्धां निशिकांताच्या इच्छेपुढें शेवटीं मान लववितेच. तात्पर्य, सुहास व प्रमद्वरा यांचे अपवाद वगळले तर जिचें व्यक्तिमत्त्व प्रकर्षानें खुलून दिसेल अशी एकहि नायिका माडखोलकरांनीं निर्मिली नाहीं. पराकाष्ठेचा दुबळेपणा व हळवेपणा या दोन गोष्टींमुळें बहुतेकांची अनुकंपनीय अवस्था झाली आहे.

स्त्री कितीहि सुशिक्षित व सुसंस्कृत झाली तरी तिचें सारें सुशिक्षण, तिची सारी सुसंस्कृतता पुरुषाच्या इच्छेपुढें विफल होते हाच एक संदेश माडखोलकरांच्या बहुतेक नायिका देत आहेत. अभिजात संस्कृतींत वाढलेली व पराकाष्ठेची बुद्धिप्रधान अशी कांता पतीच्या इच्छेपुढें प्रत्येक वेळीं मस्तक नमविते, आणि 'मन मारून' स्वतःच्या आकांक्षांचा होम करिते. "पुरुष ज्यावेळीं एखाद्या हट्टाला पेटतात तेव्हां स्त्रीचे समजुतीचे किंवा विनवणीचे शब्द निरुपयोगी पडत असतात त्यांना आळा घालायला." 'मुक्तात्म्या'मधील केशवची आई पार्वती हेंच गाऱ्हाणें वेशीवर आहे—"माझ्या जीवनाचा, माझ्या आकांक्षांचा, माझ्या अभिरुचींचा अगदीं कोंडमारा झाला." पार्वतीच्या कलासक्त मनाचा कोंडमारा होत असलेला पाहून तिचे दीर भगवंतराव यांना अतिशय वेदना होत असत. पतीपुढें आपण अत्यंत दीन आहोंत ही स्पष्ट कबुली ही 'कलासक्त' पार्वती देत आहे— "स्त्रीला निदान आपल्या समाजांत तरी दुसरी गति नाहीं." या वृत्तीमुळें पतीचें अथवा प्रियकराचें एखादें कृत्य पूर्णपणें नापसंत असूनहि त्या कृत्याला संमति देणें माडखोलकरांच्या नायिकांना भाग पडतें. विजया कान्तेला म्हणते— "स्त्रियांचा हा स्वभावच आहे मुळीं कीं, आपल्या प्रियकराचं कृत्य त्यांना मनांतून कितीहि नापसंत असलं तरी शेवटीं तें त्या गोड करून घेतात" या त्यांच्या स्वभावामुळें प्रियकराच्या महत्त्वाकांक्षांशीं त्यांना समरस होतां आलें नाहीं तरी त्या 'मन मारून' साऱ्या गोष्टी करीत असतात. स्त्रीची प्रबल इच्छा सुद्धां पुरुषांच्या महत्त्वाकांक्षांच्या आड येऊंच शकत नाहीं, ही कान्तेची तक्रार आहे— "पुरुषांचं मन आणि महत्त्वाकांक्षा या किती विलक्षण चिजा आहेत तें लग्न झाल्याशिवाय कळणार नाहीं तुला!—तीरावरल्या झाडांचीं पानं प्रवाहांत पडल्यानं त्यांचा वेग कधी कमी झाला आहे कां!"

पुरुषांचीं मनें अत्यंत कठिण असल्यामुळें आणि त्यांच्या महत्त्वाकांक्षांना आवर घालणें दुरापास्त झाल्यामुळें माडखोलकरांच्या नायिकांना स्वतःचेंच जीवन खुरटें वाटूं लागल्यास नवल नाहीं. 'मुखवटे' या कादंबरींतील रोज म्हणते– "स्त्रियांना पुष्कळदां पुरुषांचा जो हेवा वाटतो, तो त्यांच्या जीवनाच्या खुरटेपणामुळं, कोतेपणामुळं तर नव्हे ? स्त्रीचं जीवन संकुचित असल्यामुळंच ती अंतर्मुख होते." पतीच्या इच्छाशीं, आकांक्षांशीं व मनोविकारांशीं समरस होतां येत नसूनहि बळेंच तसें करावें लागल्यामुळें होणाऱ्या दारुण वेदना लपविणें किती कठिण असलें पाहिजे तें अनूच्या पुढील उद्‌गारांवरून स्पष्ट होईल– "स्त्री ही काय नदीसारखी कुणाशीं तरी सर्वस्वानं समरस होण्याकरिता, कुणाच्या तरी जीवनांत स्वतःच्या जीवनाचा विलय करून घेण्याकरितां का जन्माला येत असते !"

या दारुण वेदनांचें पर्यवसान मन मारण्यांत, त्याचा कोंडमारा करून घेण्यांत होत असतें; अर्थात् नाइलाजाच्या पोटीं हें सारें घडत असतें–आणि त्यामुळें मन पराकाष्ठेचें कमकुवत बनलें नाहीं तरच आश्चर्य ! एकदा कमकुवत बनलेलें मन स्वत्वाची हानि करणाऱ्या वाटेल त्या गोष्टीला संमति देईल. संसारांत पडलेल्या सुशिक्षित मुलींनीं स्वतःचें मन मारलें नाहीं तर त्यांचे संसार कधींहि सुखाचे होणार नाहींत, हें निश्चित मत पराकाष्ठेची बुद्धि-प्रधान व सुसंस्कृत असलेली कांता प्रतिपादीत आहे, हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. हे पहा तिचे विचार–"आपल्या सुशिक्षित मुलींचं इथंच चुकतं सारं. स्वतःचं मन मारून टाकायला त्या तयार नसतात, म्हणूनच सुखाचे संसार होत नाहींत त्यांचे !...निसर्गाचीच मुळीं अशी योजना दिसते कीं, संसाराचा भार स्त्रीनं मुकाटयानं वाहावा ! तो भार वाहतांना जी कुरकुर करील, स्वतःच्या अस्तित्वाचा न् व्यक्तित्वाचा बळी जी आनंदानं देणार नाहीं, ती स्त्री नव्हे;–माता आणि कांता होण्याचा तिला हक्क नाहीं !"

प्रियकराच्या अथवा पतीच्या जीवनाशीं समरस होण्याची अशक्यता सर्वच नायिकांना व्यथित करीत आहे. त्यांच्या या वृत्तीमुळें नायकांना स्त्री ही प्रतिबंधक शक्ति वाटणें साहजिक आहे. "स्त्री ही पुरुषाच्या जीवनां-तील त्याच्या साहसी वृत्तीला पायबंद घालणारी साहसी शक्ति आहे," असें कांतेच्या पतीला–प्रियदर्शनाला–सारखें वाटत असतें. स्वतःच्या जीव-

नाशीं कांता समरस होत नाहीं, स्वतःच्या ध्येयाविषयीं बेफिकिरी दाखविते, म्हणून तिच्यावर प्रियदर्शनाचा रोष आहे; पतिपत्नींमधील गूढतेचा पडदा त्यामुळें कांहीं केल्या दूर होऊं शकत नाहीं. आतां ' दुहेरी जीवना ' चा नायक मुकुंद काय म्हणत आहे तें पहा—" पण माझ्या जीवनाची जीं अंगें तिला अज्ञात होतीं किंवा जीं लपवून ठेवण्याचा मी प्रयत्न करीत असे, त्यांच्यावरील गूढतेचं आवरण फाडण्याची धडपड तिनें कधींहि केली नाहीं. त्यामुळें आमच्यांतलं अंतर, माझी तिच्याविषयींचीं भीति वाढत गेली." कांता व सुलोचना पतीच्या जीवनाची चौकशी करीत नाहींत म्हणून पतीपासून त्यांचें अंतर वाढत जातें; पण ' मुखवटे ' या कादंबरींतील रोज पतीच्या जीवनाशीं समरस होण्याची विलक्षण धडपड करीत आहे, त्याच्या घराबाहेरील जीवनाचीं विविध अंगें माहीत करून घेण्याचा प्रयत्न करीत आहे, म्हणून मोहन तिच्यापासून दुरावतो. कांता आपल्या ध्येयजीवनाशीं समरस होत नाहीं म्हणून प्रियदर्शन पराकाष्ठेचा कष्टी आहे, आणि सुलोचना पतीच्या खाजगी जीवनाची चौकशी करीत नाहीं म्हणून त्या दोघांमधील अंतर वाढत जातें, आणि त्याला तिची भीति वाटते. उलट, ' मुखवट्यां ' मधील मोहन तर पतिपत्नींचें व्यक्तिमत्त्व स्वतंत्र राहावें यासाठीं धडपडत आहे. त्याच्या मतें, " स्त्री कितीहि शिकलेली असली तरी ती पुरुषाच्या जीवनाशीं कधींच समरस होऊं शकत नाहीं. " त्याचें असेंहि स्पष्ट मत आहे कीं, " एकमेकाचं व्यक्तित्व, विशिष्ट जीवन न गमावतां त्यांना साहचर्याचं सुख भोगतां आलं पाहिजे. "

यावरून एकच गोष्ट स्पष्ट होते कीं, पतीच्या जीवनाशीं समरस होण्याची शक्यताच नष्ट झाल्यामुळें कांता, सुलोचना व रोज मनांत कुढत आहेत. जी या तीन नायिकांची अवस्था तीच अवस्था 'मुक्तात्म्यां' तील ललितेची. केशवच्या जीवनाशीं, त्याच्या आकांक्षांशीं तिला समरस होतां येत नाहीं. हीच दुर्दैवी घटना सर्वांच्या बाबतींत घडली आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. " केशवशीं समरस होण्याचा थोडा जरी आपण प्रयत्न केला असता तरी त्याच्यांत आणि आपल्यांत उत्पन्न झालेलें हें विचाराचें वैषम्य या थराला आलें नसतें " असें ललितेला नंतर वाटूं लागतें. तिला ज्या विचारांनीं यातना होतात तेच विचार तिची सखी सुमति ही सुद्धां बोलून दाखविते—

" पुरुषांच्या प्रेमाला बौद्धिक सहकार्याची अपेक्षा असते......त्याच्या ( केशवच्या ) बौद्धिक जीवनाशीं तुझा काडीइतकाहि संबंध नाहीं; जर कांहीं असेल तर विरोधच आहे. "

केशवच्या बौद्धिक जीवनाशीं कांहीं संबंध नाहीं म्हणून ललिता त्याच्याशीं समरस होत नाहीं असें म्हणावें तर जिचें जीवन प्रामुख्यानें बुद्धिप्रधान आहे अशी 'भंगलेल्या देवळां' तील अनू स्वतःच्या भोगलोलुप, रंगेल पतीला बौद्धिक सहजीवनानें संतुष्ट करूं शकत नाहीं, त्याच्या उद्दाम मनोविकारांना तिचें बुद्धिवैभव कांहीं मर्यादेपलीकडे भुरळ घालूं शकत नाहीं, आणि यामुळें तिचेंहि जीवन पिचून गेलें आहे !

मीलनानंतर हृदयाच्या ऐक्याचा अभाव ही गोष्टहि या नायिकांपैकीं बऱ्याच जणींना खिन्न करीत आहे. " ज्याला हृदयाचं ऐक्य म्हणतात तें मीं कधीं अनुभवलें नाहीं " अशी 'मुक्तात्म्या'मधील पार्वतीची तक्रार आहे. ती पुढें म्हणते, " आणि स्त्रीच्या जीवनाला ज्यामुळें पूर्णता येते तें हृदयाचं ऐक्यहि मीं अनुभवलं नाहीं." पार्वतीला हृदयाचें ऐक्य प्राप्त करून घेण्याची जबर इच्छा असूनहि तें प्राप्त झालें नाहीं म्हणून ती बेचैन आहे, तर प्रणयाच्या ऊर्मींत विलीन झाल्यानंतरहि कांता स्वतःचें व्यक्तिमत्त्व विसरूं शकत नाहीं म्हणून प्रियदर्शन बेचैन आहे—" प्रणयाच्या ऊर्मींत विलीन झाल्यावर सुद्धा तिला आपल्या व्यक्तित्वाचा विसर पडल्याचा " त्याला कधीं अनुभव आला नाहीं. याउलट 'भंगलेल्या देवळां' तील अनूचें तत्त्वज्ञान पाहा—" स्वतःचें व्यक्तित्व जर मनुष्य प्रेमापायीं गमावून बसला तर मजा काय त्या प्रेमांत ! " अनू स्वतःचें व्यक्तित्व गमावण्यास मुळींच तयार नाहीं. यामुळें अनूला पराकाष्ठेचा खेद होत आहे —त्याच्या व्यक्तित्वांत स्वतःचें व्यक्तित्व विलीन करून टाकण्याची विलक्षण धडपड चालली आहे तिची. पण त्याचीच तयारी नाहीं या गोष्टीला. स्वतःचें व्यक्तित्व अबाधित राहावें, इतर कोणाच्याहि-प्रियतमेच्याहि-व्यक्तित्वांत तें विलीन होऊन जाऊं नये असें त्याला निश्चयानें वाटत आहे. 'मुखवटयां' तील रोजप्रमाणेंच अनूला मनापासून वाटत असतें कीं, प्रियकराला स्वतःच्या जीवनाहून वेगळें जीवन कधींहि नसावं. पण तिला अनुभव मात्र अगदींच निराळा येतो. " अरूला माझ्याहून वेगळं

जीवन आहे म्हणावयाचं एकंदरींत" अशी तिची तक्रार आहे. अरूला वेगळें जीवन आहे याची प्रतीति मिळाल्यावर अनूला जशा वेदना होतात तशाच वेदना मोहनला स्वतःहून वेगळें जीवन आहे हें कळल्यावर रोजला होतात. 'प्रेमसमाधीच्या क्षणींसुद्धा मनाचा कांहीं भाग अलिप्त राहतो, त्याचे चोरकप्पे बंदिस्तच राहतात' या अनूच्या उद्‌गारांप्रमाणेंच रोजचेहि उद्‌गार आहेत. रोज कळवळून म्हणते–" मला फक्त येवढंच वाटे कीं, त्यांच्या जीवनालाहि असेच बंदिस्त खाजगी कप्पे असतील का? आणि त्या शंकेनं माझं मन बेचैन होऊन जाई." पतीच्या जीवनाशीं स्वतःचें जीवन समरस करण्याची धडपड करणाऱ्या व त्याच्या व्यक्तित्वांत स्वतःचें व्यक्तित्व विलीन करण्याची अभिलाषा बाळगणाऱ्या रोजला मोहन अगदीं थेट अरूप्रमाणें तत्त्वज्ञान शिकवितो–" एकमेकांचं व्यक्तित्व, विशिष्ट जीवन न गमावतां त्यांना साहचर्याचं सुख भोगतां आलं पाहिजे."

अशा या दुर्बल नायिका आपल्या पतीच्या भोगलोलुपतेला बळी पडलेल्या आहेत. कातेचा पति प्रियदर्शन जरी भोगलोलुप नसला तरी कठोर ध्येयजीवनाच्या मागें लागलेला कर्तव्यतत्पर पुरुष असल्यामुळें " साहसी पुरुषाच्या आयुष्यांत स्त्री ही केवळ शोभेची वस्तु आणि उप भोगाचा विषय असतो एक" असें कांतेला वाटूं लागतें. कर्तव्याच्या मागें लागलेल्या ध्येयवादी पुरुषाची पत्नी हे उद्‌गार काढीत आहे. मग कोणत्याहि उच्च ध्येयाची आंच ज्यांना कधींहि लागली नाहीं असे अनिरुद्ध प्रभाकर किंवा मोहन त्यांच्या प्रेयसींना कसे वाटत असतील याचा तर्क करणें मुळींच कठीण नाहीं. अनू आणि रोज यांची खरोखर अत्यंत केविलवाणी परिस्थिति आहे. दोघीहि बुद्धिप्रधान, सुसंस्कृत व विचारी असतांहि त्यांच्या नशिबीं पुरुषांच्या निर्घृण उपभोगलालसेला तृप्त करणें येवढें एकच कर्तव्य आलें होतें, ही गोष्ट अनुकंपनीय नाहीं का? अनिरुद्धाच्या पाशवी भोगलोलुपतेला बळी पडलेली अनू म्हणते– " तारुण्याची रग जोंपर्यंत त्याच्या (पुरुषाच्या) रक्तांत कायम आहे, तोंपर्यंत त्याला तृप्ति म्हणून कशी ती माहीत नसते मुळींच...जगांतलें सारें सौंदर्य जरी त्याच्या सेवेंत अहोरात्र राबलें, तरी त्याच्या शिकारी मनाचें समाधान नाहीं व्हायचें कधीं. त्याच्या आवडत्या स्त्रीवर त्याचें

कितीहि प्रेम असलें तरी अखेर ती निव्वळ उपभोगाचीच वस्तु होऊन बसते त्याच्या या स्वभावामुळें." अनिरुद्धाच्या भोगलोलुपतेमुळें किती भयंकर यातना अनूला सोसाव्या लागल्या असतील याची कल्पना तिचे पुढील उद्‌गार आणून देतील-"मनसोक्त वास घेतल्यावर, मनमुराद हाताळल्यावर कोमेजल्यामुळें फेकून दिलेल्या फुलाच्या पाकळ्या पाहून भोगलोलुपाच्या मनाला कधीं तरी द्रव आला आहे काय? बोलूनचालून नवपुष्पावरले भ्रमर ते!" सौंदर्याचा मनसोक्त उपभोग घेतल्यावर पुरुष किती निर्दयतेनें स्त्रीचा अव्हेर करील याची पूर्ण कल्पना अनूच्या वरील उद्‌गारांनीं आली नसल्यास मोहनचे याच विषयावरील विचार पाहा—"फार वेळ हातांत ठेवलेलीं फुलं जशीं चोळवटून कोमेजून गेल्यामुळं नकोशीं वाटतात, तसंच होतं स्पर्शसुखाचं पुढं मग." पुरुषाच्या या अनिवार भोगलालसेला आणि वैचित्र्याच्या अभिलाषेला अनू, रोज, व 'दुहेरी जीवना' मधील सुलोचना या तिघींचाहि बळी मिळाला आहे. रोजला तर मोहनच्या प्रणयचेष्टांत 'पशुत्वाचा साक्षात्कार' होतो. विवाहानंतरच्या पहिल्या एकान्ताचें रोजनें केलेलें हें भीषण वर्णन पहा. "मला त्यांनीं जवळ ओढली आणि मी निःशंक मनानें त्यांच्या कुशींत शिरलें! पण त्याच क्षणीं त्याचा श्वास, तो दर्पयुक्त श्वास, माझ्या कपाळावर, डोळ्यांवर, गालांवर, ओठावर आदळला......मला एकदम शिसारी आली. आमच्या भांडणाच्या वेळीं त्यांच्या वृत्तींतलं एक पशुत्व मीं पाहिलं होतं......पण हें दुसरं पशुत्व! मला कल्पना नव्हती त्याची." मोहनच्या 'ओंगळ' प्रेमालापांची तिला शिसारी आली, आणि त्याच्या स्पर्शाची 'खंत' आली तिला. "......मी त्यांच्या आयुष्यांतली पहिली स्त्री नव्हे हें पूर्वीच कळून चुकलं होतं मला; पण स्त्री ही त्यांच्या लेखीं केवळ एक मस्तवाल, निर्घृण उपभोगाची चीज असल्याचं त्याच रात्रीं प्रथम अनुभवाला आलं माझ्या." मोहनच्या पाशवी वासनांमुळें आणि त्याच्या भोगलंपटपणामुळें खंत करणाऱ्या रोजला स्वतःच्या मोहसुलभतेची कबुली देणें मात्र भाग पडतें हें चिंत्य आहे. कारण, त्या मोहसुलभतेमुळेंच मोहनसारख्या पशूचा सहवास ती पत्करते. परस्परांविषयीं कित्येक प्रसंगीं तिटकारा व द्वेष वाटूनहि आसक्ति व अभिलाषा यांच्यामुळें तीं

दोघें पुन: परस्परांकडे येतात. "पण एकमेकांविषयींची आसक्ति, एकमेकांच्या सहवासाविषयींची आतुरता आणि अतृप्ति ही आमच्या दोघांच्याहि हृदयांतून अन् शरीरातून अद्याप पुरती गेलेली नाहीं. ती आसक्ति, ती आतुरता आणि अतृप्ति—ती पुन्हा खेचून आणते आम्हांला एकमेकांकडे." आणि इतकें करूनहि बिचारीला स्वतःच्या दुर्दैवाचा पाढा अशा अनुकंपनीय रीतीनें व्यक्त करावा लागतो—"खरोखरी त्यांच्या भोगलोलुप दृष्टीनें पाहिलं तर मी म्हणजे आतां निव्वळ मनसोक्त वास घेऊन कुस्करलेलं फूल आहे !—तें फूल त्यांना पुनः पुनः हातांत घ्यावंसं कां वाटतं ?" पतीविषयीं पराकाष्ठेची घृणा वाटूनहि त्याच्या पाशवी भोगलालसेला स्वतःच्या कोमल शरीराचा व व्यक्तिमत्त्वाचा पूर्णतया बळी देणाऱ्या मानी, बुद्धिप्रधान, सुसंस्कृत व खानदानी वातावरणांत वावरलेल्या रोजच्या मनाच्या भीषण कोंडमाऱ्याची ही अशी विचित्र कहाणी आहे ! अनिर्बंध प्रीतीच्या मागें लागलेली शेलीच्या पंथांतली ही मोहनची प्रेयसी स्वतःच्या दौर्बल्याची स्पष्टपणें कबुली देत आहे—"गेले तीन महिने अनिर्बंध प्रीतीचें तत्त्वज्ञान ते सारखे ठसवीत होते माझ्या मनावर ! मला कळायला नको होता का त्यांचा उद्देश ?...माझंच चुकलं...छे, त्यानीं मला फसवलं नाही; मीच जाणून बुजून फसलें...अनिर्बंध प्रीति ! हीच का ती अनिर्बंध प्रीति !"

जवळ जवळ हीच कहाणी 'भंगलेच्या देवळां'तील अनूची आहे. लग्न झाल्याबरोबर अनिरुद्ध अनूला म्हणतो— "आपल्या या लग्नांतलं सारं काव्य नाहींसं होणार असं वाटायला लागलं आहे मला. भरतीचं उधाण ओसरून गेल्यावर जसा किनारा उघडा पडून भयाण शून्यता तेवढी शिल्लक राहते, तसं लग्नानंतर होणार आहे कीं काय आपल्या जीवनाचं कोण जाणे !" विवाहसमारंभ उरकल्याबरोबर लगेच लेडी बायरनजवळ लॉर्ड बायरन जे प्रणयपूर्ण (!) उद्गार काढतो त्याची स्मृति होईल कोणालाहि अनिरुद्धाचे हे शब्द ऐकून. अनूला हे शब्द कृतींत उतरविले गेलेले लवकरच पाहावयास सापडले. प्रेमांतील शारीरिक आर्षणाचा अनावर उन्माद नष्ट झाल्यानंतर भोगातुर पुरुषाला स्त्रीविषयीं कशी विरक्तता उत्पन्न होते याचें अनिरुद्ध हें प्रतीक आहे. स्वतःचें व्यक्तित्व प्रियकराच्या व्यक्तित्वांत विलीन करूं इच्छिणाऱ्या अनूला तें चिरवांछित मानसिक तादात्म्य न लाभ-

त्यामुळें दारुण यातना सोसाव्या लागत आहेत. हें तादात्म्य न लाभल्या-मुळें पतिपत्नींमधील अंतर दुरावत गेल्यास नवल नाहीं. मॅथ्यू आर्नोल्डनें म्हटल्याप्रमाणें—

" Oh ! Then a longing like despair
Is to this farthest cavern sent;
For surely one, they feel we were
Parts of a single continent !
Now round us spreads the watery plain......
Oh ! might our barges meet again ! "

अनूला वेदना होतात त्या प्रणयपूर्तीनंतर स्त्रीपुरुषांमध्यें उत्पन्न होणाऱ्या परकेपणामुळें—विरक्ततेमुळें ! विवाहाच्या पूर्वी उदात्त शब्दाची पखरण करणाऱ्या पुरुषाला स्त्री ही निर्घृण उपभोगाची वस्तु वाटूं लागते यामुळें अनूला वेदना होत आहेत. " तिचें यौवन थोडें जरी डागळलें, व त्याच्या वासनांचें कोड पुरविण्यांत तिच्याकडून थोडी जरी कसूर झाली तरी लगेच मनांतून उतरते ती त्याच्या, माती होते तिच्या वैवाहिक जीवनाची. " भोगातुर पतीच्या भोगलालसेची तृप्ति न झाल्यामुळें वैवाहिक जीवन हें अनूला रखरखीत वाळवंटाप्रमाणें वाटणें साहजिक आहे. " सुंदर वस्तूंच्या चिंतनात जें सुख आहे, तें तिच्या उपभोगांत नाहीं. उपभोग म्हटला कीं त्याच्या पाठोपाठ उपरति आलीच. प्रेमी माणसांना पुष्कळदा जो एक-मेकांचा कटाळा येतो तो उपभोगानंतर प्रेमांतली जादू उडून गेल्यामुळेंच, " हें अरूचें तत्त्वज्ञान आतां तरी खास पटलें असेल तिला. कीट्स म्हणतो त्याप्रमाणें—

" Everything is spoilt by use;
Where's the cheek that doth not fade,
Too much gazed at ? Where's the maid
Whose lip mature is ever new ?
Where's the eye, however blue,
Doth not weary ? Where's the face
One would meet in every place ?

Where's tha voice, however, soft,
One would hear so very oft ?
At a touch sweet Pleasure melteth
Like to bubbles when rain pelteth. "

आणि प्रणयोन्मादाच्या पहिल्या क्षणीं ज्या प्रकारची आतुरता व धडधड प्रियकराला अनुभवावयास सांपडते—किंवा मोहनच्या भाषेंत बोलावयाचें तर, " अपेक्षा आणि उत्कंठा यांचा जो धडधडता आतुर आनंद त्या पहिल्या स्पर्शांत असतो " ती आतुरता व धडधड अनिरुद्धाच्या निर्घृण भोगलालसेला बळी पडल्यानंतर अनूला पुन: केव्हांहि अनुभवायला मिळाली नाहीं. शारीरिक आकर्षण एकदा नष्ट झाल्यानंतर 'मुक्तात्म्या' अधील सुमति म्हणते त्याप्रमाणें, 'पुरुषांच्या प्रेमाला बौद्धिक सहकार्याची अपेक्षा' खरोखरीच असते कीं काय याचा निर्णय अनिरुद्धाच्या उदाहरणावरून खास करतां येईल. अनू काय बौद्धिक सहकार्य अनिरुद्धाला द्यावयास असमर्थ होती ? मुळींच नाहीं. तें तिला केव्हांहि पूर्णपणें शक्य होतें. मग अनिरुद्धाला काय हवें होतें ! बौद्धिक सहकार्य खास नको होतें त्याला. 'नवपुष्पावरील भ्रमर' तो ! भोगलोलुपता तृप्त झाली कीं त्याचें कार्य संपलें. पत्नीच्या बुद्धिमत्तेची त्यास काय किंमत होय? तिच्या भावनांचा कोंडमारा हा असा चालला आहे— " ते जेव्हां म्हणतात कीं, मला तू सर्वस्वीं पाहिजेस, तेव्हां त्याचा अर्थ माझें जिणें केवळ त्यांच्याचसाठीं आहे असा समजायचा का ? मी जशी त्यांना सर्वस्वीं हवी आहे, तसेंच तेही मला सर्वस्वीं हवे आहेत. पण ते आपले सारे उद्योग, साऱ्या आकांक्षा, माझ्यासाठीं सोडून द्यावयाला तयार होतील का ? मग मी त्यांच्यासाठीं हें निष्क्रिय, निरुद्देश जीवन कां कंठावें ? "

बौद्धिक सहजीवन, पतीशीं समरसता इत्यादि उच्चतर आकांक्षांचा असा विध्वंस झाल्यानंतर ही 'मानिनी' संयमाचें महत्त्व वर्णीत आहे— " मानवजातीचें कल्याण स्वैराचारांत नसून संयमांत आहे, भोगांत नसून त्यागांत आहे. " विवाहामुळें स्त्रियांवर पुरुषजातीकडून घोर अन्याय होत आहे हें सत्य डोळेफाड दिसत असूनहि विवाहसंस्थेचा कैवार ती घेत

आहे. " विवाहसंस्थेनें जर कांहीं केलें असेल, तर तिनें स्त्रीपुरुषांच्या व्यवहारांत संयम आणला, स्त्रीला संरक्षणाची हमी दिली, पुरुषांना शुचितेचें महत्त्व शिकविलें आणि मुलांच्या संगोपनाची व्यवस्था केली, " असा ती पाठपुरावा करीत आहे विवाहसंस्थेचा.

तिच्या रुग्णतेचा फायदा घेऊन मनू तिची जागा घेते आणि अनिरुद्ध उघडपणें मनूबरोबर घरांत प्रणयचाळे सुरू करितो. अशा रीतीनें त्यांच्या प्रणयाचा विदारक अंत झाल्यानंतर मनूला एका शब्दानेंहि तिच्या कृत्याचा जाब न विचारतां अनू शांतपणें घरांतून बाहेर पडते व वेगळी राहते; आणि स्वतःच्या या दौर्बल्याचें भरतवाक्य पुढीलप्रमाणें म्हणते— " पुरुष स्वभावतःच बहुस्त्रीक आहे. जगांतल्या कोणत्याहि स्त्रीला विचारा. तीं तुम्हांला डोळयांत पाणी आणून सांगेल कीं, पुरुष स्वभावःतच बहुस्त्रीक आहे. " अशा रीतीनें ' स्त्री जातीच्या मानसिक गुलामगिरी'च्या इतिहासाचें हें महत्त्वपूर्ण पान उलटल्यावर ' दैन्याची, दौर्बल्याची मूर्तीच ' अशी अनू सहृदयाला अनुकंपेनें व्याकुळ करते यांत यांहीं शंका नाहीं.

'दुहेरी जीवनां'तील सुलोचना या मानानें बरीच सुखी आहे. पण ती सुखी असण्याचें कारण मात्र फार वेगळें आहे. मोहन किंवा अनिरुद्ध मुकुंदापुढें खरोखर कोण्या झाडाचा पाला! या लंपट पुरुषानें प्रणयक्षेत्रांत जो अनिरुद्ध संचार केला तसा संचार करावयास मोहनला किंवा अनिरुद्धाला दुसरा जन्म घ्यावा लागेल. त्याच्या या ' अफलातून ' प्रेमामुळें सुलोचनेला मानसिक यातनांच्या इंगळ्या डसावयास हव्यात. पण ती बिचारी त्याच्या खाजगी जीवनांत कधींच डोकावून पाहत नाहीं. तो बाहेर भटकतो, केव्हां तरी घरीं परततो, आणि ती त्याला एका शब्दानें विचारीत नाहीं—असा हा सर्व चूपचाप प्रकार चालला आहे. रात्रीं घराबाहेर राहून सकाळीं नानाप्रकारच्या थापा त्यानें तिला मारल्या तरी त्या साऱ्या तिला खऱ्या वाटतात—अथवा खऱ्या वाटल्या असा देखावा तरी ही ' मानी आणि मितभाषी ' युवती निर्माण करिते. सुलोचना बुद्धिमती होती, सुसंस्कृत होती, वादपटु होती आणि संगीतकुशल होती. पण ती स्वतःला विसरूं शकत नसे, बेभान होऊं शकत नसे, अशी मुकुंदाची तिच्याविरुद्ध फिर्याद आहे. तिच्या या अशा वृत्तीमुळें तिला ' कोणत्याहि

भावनेचा उत्कट आनंद कधींहि लाभला नाहीं.' तिच्यामुळें त्याला 'स्वतःचा विसर कधींहि पडला नाहीं, मर्यादेपलीकडे पाऊल टाकण्याचा मोह' त्याला कधींहि झाला नाहीं. सुलोचनेनें मुकुंदाला कधींहि प्रणयोन्मत्त केलें नाहीं—तरी आपलें जीवित यशस्वी व्हावयास, आपल्या गुणांचा विकास व्हावयास, तिचें 'तें संयत आणि समंजस सहजीवनच' कारण झाल्याची स्पष्ट कबुली तो देत आहे. पण हें आकर्षण म्हणजे प्रेम नव्हे असा त्याला साक्षात्कार होतो, आणि उंडारलेल्या बैलाप्रमाणें तो प्रणयक्षेत्रांत अफाट धुडगूस घालतो. ती त्याच्या वर्तनाची चुकूनहि चौकशी करीत नाहीं, त्यालाच मधून मधून तिच्याजवळ साऱ्या गोष्टींची सरळ सरळ कबुली देण्याचा मोह होतो—पण तो क्षणैकच! क्षमा देशपांडेकडे रात्रभर सुखशयनीं पहुडल्यानंतर सकाळीं जेव्हां तो घरीं परततो तेव्हां तिच्या प्रश्नांना तो जीं उत्तरें देतो त्या उत्तरांनीं तिच्या मनाचें समाधान झाल्याचें त्याला दिसत नाहीं; पण नंतर तिनें चौकशी केली नाहीं पुन्हां. त्यालाच केव्हां केव्हां तिला संशय येतो असें वाटे. "पण जणूं कांहीं तिनें आपल्या मनाशीं ठरवून टाकलें होतें कीं, हे एकदां घराबाहेर पडल्यावर यांच्या त्या बाहेरच्या आयुष्याशीं आपला कांहीं संबंध नाहीं! त्यामुळें तिच्या मनांत कांहींहि आलें तरी ती चौकशी करीत नसे एका मर्यादेपलिकडे जाऊन." 'मुखवट्यां'तील रोजला वाटत असतें—"स्त्रीचं जीवन संकुचित असल्यामुळेंच ती अंतर्मुख होते; लहानसहान गोष्टींत मन घालून झुरते......त्यापेक्षां त्यांचे व्याप त्यांच्यापाशीं आणि माझा संसार माझ्यापाशीं अशी वृत्ती कां मी ठेवू नये?" पण रोजला जें प्रयास करूनहि जमलें नाहीं तें सुलोचनेला सहज साधल्यामुळें तिच्या यातना कमी तरी झाल्या निदान! जणूं तिनें मोहनच्या पुढील उपदेशाचें अखंड पारायण चालविलें होतें!—"कुणाच्याहि जीवनांत फाजील डोकावून बघूं नये. प्रत्येकाचं व्यक्तित्व जसं भिन्न असतं, तसंच जीवनहि भिन्न असतं; अन् त्या भिन्न जीवनांत फाजील मन घालणं हें सुसंस्कृतपणाला सोडून आहे." मोहनची सच्छिष्या शोभते खरी सुलोचना!

या 'मानी आणि मितभाषी' युवतीच्या स्वाभिमानाची, बुद्धिमत्तेची व वादपटुत्वाची खरी पारख अजून व्हावयाचीच आहे. मुकुंदरावानें

अत्यंत स्पष्टपणें लिहिलेला स्वतःच्या प्रणयचेष्टांचा इतिहास जेव्हां ती वाचते तेव्हां तिला त्याचा थोडाहि राग येत नाहीं, उलट सहानुभूतीच वाटते त्याच्याविषयीं तिला. त्यानें स्वत:वर विश्वास टाकला नाहीं याचा सारा दोष ती स्वत:वरच लादते–" मी त्यांच्या विश्वासाला पात्र झालें नाहीं, विकासाला पोषक झालें नाहीं, हा माझा दोष, माझाच उणेपणा; त्यांचा नव्हे." वाः ! याला म्हणावें बुद्धिमत्ता ! वादपटुत्व म्हणतात तें हेंच !

## अनाघ्रात पुष्पें आतां संपलीं.

त्याच्या अनेक प्रेमसंबंधांबद्दल तिला मुळींच खंत वाटत नाहीं. अर्वाचीन काळांतील अपरिहार्य गोष्ट समजते ती या गोष्टीला. " प्रौढविवाहाच्या या काळांत, जिथं अनेक तरुण आणि तरुणी तिशी उलटेपर्यंत लग्न करूं शकत नाहींत, तिथं अनाघ्रात पुष्पांची अपेक्षा करणं असमंजसपणाचं नाहीं कां ठरणार ?" सुलोचनेच्या या उद्गारांशीं 'भंगलेल्या देवळां'तील अनूच्या पुढील उद्‌गारांची तुलना करावी, म्हणजे त्या दोघींच्या मनोवृत्तींचें कसें तादात्म्य झालें आहे तें दिसून येईल. अनू म्हणते–" अनाघ्रात पुष्पांची अपेक्षा करण्याचें तें युग संपलें आतां." आपल्या पतीच्या असमर्थनीय दुर्वर्तनाचें प्रत्यक्ष समर्थन जेव्हां ही सुलोचना करूं लागते तेव्हां तिला वंदन करावेंसें वाटतें. तिला स्वतःच्याच कोतेपणाची, खुरटेपणाची खात्री पटते. 'मुखवटयां' मधील रोज म्हणते–" स्त्रियाना पुष्कळदा पुरुषांचा जो हेवा वाटतो तो त्यांच्या जीवनाच्या खुरटेपणामुळें तर नव्हे ?" अगदीं थेट असेच उद्‌गार सुलोचना काढीत आहे–" त्यांच्या जीवनाला अनेक अंगें आहेत......तीं अंगें त्यांनीं आमच्यापासून लपवून ठेवलीं, ती आमच्या कोतेपणामुळं." स्वतःच्या कोतेपणाची, खुरटेपणाची ही जाहीर कबुली कांता, पार्वती, अनू, रोज, सुलोचना या साऱ्याजणी एकमुखानें देत आहेत. दौर्बल्य, पराधीनता, खुरटेपणा, कोतेपणा, गुलामगिरी, मनाचा कोंडमारा, येवढे शब्द उच्चारले कीं या स्त्रियांच्या जीविताचें सर्वस्व त्यांत आलें, असें समजण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं ! सुलोचना काय म्हणते पहा–" त्यांचें हें आत्मनिवेदन वाचून मला माझ्या अपुरेपणाची, कोत्या दृष्टीची जाणीव झाली."

आपल्या प्रियकराच्या हीन वर्तनाचें समर्थन सान्याचजणी अगदीं हिरीरीनें करीत आहेत. अनू आपल्या वडिलांना विचारते–" त्यावेळच्या तुमच्या शीलाच्या कल्पनेच्या कसोटीवर अनिरुद्धासारख्या आजच्या तरुणाचं पावित्र्य घासून पाहून त्यांना हिणकस ठरविण्याचा अन्याय तुम्हीं कांहो करितां !" आपल्या सुलोचनाबाईहि याखेरीज दुसरें काय म्हणणार ? अनूच्या सुरांत सूर मिसळून त्याहि म्हणतात–" क्षमाबाईंनीं त्यांना हिणकस म्हटलं आहे; पण तेंहि खरं नाहीं. जमिनीचा कस वाढतो तो अनेक प्रकारचं हीण तिच्यांत मिसळल्यामुळंच ना ? जीवनाचंहि तसंच नाहीं कां !" बर्नार्ड शॉची मिसेस् वॉरन् स्वत:च्या वेश्याजीवनाचें जोरदार समर्थन करते. तिच्या या समर्थनाविषयीं स्वतः शॉ म्हणतो––" Mrs. Warren's defence of herself is not only bold and specious, but valid and unanswerable." सुलोचना मुकुंदाच्या व्यभिचारी जीवनाचें वर जें समर्थन करीत आहे तें 'valid and unanswerble' आहे असें श्री. माडखोलकरांनीं म्हटल्याचें वा लिहिल्याचें ऐकिवांत नाहीं अजून ! तसें त्यांनीं एकदा म्हणून टाकावें म्हणजे वाचकांच्या बऱ्याच गैरसोयी तरी नाहींशा होतील !

## धीरोदात्त नायिका

सुलोचनेनें आपल्या पतीच्या हीन व्यभिचारी आयुष्याचें केलेलें समर्थन अथवा अनूनें अनिरुद्धाच्या विवाहपूर्व प्रणयसंबंधांचें केलेलें समर्थन यांच्या मानानें 'शाप' मधील सुहासनें केलेलें निशिकांताच्या नैतिक अध:पाताचें समर्थन नि:संशय अधिक उदात्त आहे. स्वत:च्या शापित जीवनाची झळ सुहासला लागूं नये म्हणून तिच्यावर अनिवार प्रेम असूनहि तो बळेंच सर्व वासना दडपून टाकून तिच्याशीं विवाह करावयास तयार होत नाहीं. 'पण शरीराची भूक शेवटीं मात करते साऱ्या ध्येयवादावर;' आणि क्षणैक मोहाच्या अधीन झाल्यामुळें त्याचें अध:पतन होतें–त्याचें जीवित कायमचें डागळतें. दाबून ठेवलेले मनोविकार त्याच्यावर उलटतात आणि जगाच्या दृष्टीनें तो पतित ठरतो. या पतनाचें प्रायश्चित्त त्याला अगदीं विचित्र प्रकारानें मिळतें. त्याला भयंकर रोग जडतो. त्या अवस्थेंत तिनें त्याला भेटूं

नये असा तिच्या भावाचा आग्रह असतो–आणि तसल्या त्या भयंकर परिस्थितींतहि भावाच्या आग्रहाला यत्किंचित् न जुमानतां मोठया धीरानें ती निशिकांताबरोबर राहण्याचा निश्चय दाखविते. मोहाच्या एका क्षणानें निशिकांताचा अधःपात झाला म्हणून चिरंतन मैत्रीचे धागे निर्दयपणें तोडून टाकणाऱ्या स्वतःच्या भावाची ती निर्भर्त्सना करिते–" त्यांच्या-विषयींचा सारा आदर नष्ट होण्याइतकं एवढं काय भयंकर आहे त्या प्रकारांत ? जगांत काय मोह आजवर कधीं कुणाला पडलेला नाहीं ? जगांतलीं शेंकडा नव्वद सुशील म्हणून ओळखलीं जाणारीं माणसं हीं केवळ त्यांचं शील बिघडण्यासारखी परिस्थिति त्यांच्याभोंवतीं नसते म्हणूनच सुशील राहिलेलीं असतात." सुहासनें केलेलें निशिकांताचें हें समर्थन शॉच्या भाषेंत बोलावयाचें तर ' bold and specious ' आहे. पण निशिकांताच्या परिस्थितीचा पूर्ण विचार केला असतां तें ' valid ' वाटूं लागतें. सुलोचनेच्या समर्थनाच्या मानानें तें खास किती तरी पटींनीं उदात्त आहे. स्त्रीला अनुकूल संधि मिळाली तर तीहि पुरुषाइतकीच मोहवश आहे हें दिसून येईल, असें ती निःसंदिग्धपणें प्रतिपादीत आहे. " स्त्री ही पुरुषा-प्रमाणेंच मनुष्य आहे एक. ज्या वासना अन् विकार पुरुषाच्या मनाची तीव्रतेनं गांजणूक करितात त्या स्त्रीला कमी छळतात असें नाहीं " असें म्हणून निशिकांताचा दोष तिनें अगदींच सौम्य करून दाखविला आहे. सुहासविषयीं आदर वाटतो तो केवळ ती आपल्या भावाची निर्भर्त्सना करून निशिकांताच्या अधःपाताचें भरपूर समर्थन करिते म्हणून नव्हे; तर भावाच्या आग्रहाला न जुमानतां आणि आपल्या कृत्याचें परिणाम काय होतील याची भरपूर जाणीव असताहि ती निशिकांताकडे त्याच्या त्या भयंकर परिस्थितीं-तहि ' कायमची ' राहावयास जाते यामुळें ! माडखोलकरांच्या आतांपर्यंतच्या साऱ्या नायिकांत सुहासच तेवढी पराकाष्ठेची धीरोदात्त वाटते–तिलाच काय तें खरें व्यक्तिमत्व आहे असें तिच्या या एका कृत्यावरून म्हणावेंसें वाटतें. बाकीच्या साऱ्या नायिका व्यक्तिमत्त्वशून्य, रडक्या व पराकाष्ठेच्या दुबळ्या आहेत. स्वतःच्या दुबळेपणाचा मंत्र जपण्यापलीकडे कोणीहि—' मुक्तात्म्यां ' तील सफ्रेजेट सुमतीसुद्धां–कांहींहि तेज दाखवीत नाहीं. त्या पराकाष्ठेच्या बुद्धिप्रधान व स्वाभिमानी आहेत, हें केवळ लेखक सांगतो म्हणूनच

खरें मानावयाचें. एकीचीहि कृति तें सिद्ध करीत नाहीं. रात्रंदिवस मन मारून स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचा दारुण कोंडमारा करणाऱ्या या स्त्रिया म्हणजे निर्जीव पुतळ्या वाटतात शुद्ध. त्या सर्वांचीं दुःखें थोड्याफार फरकानें तींच आहेत. आणि यामुळें चिरकाल मनावर पगडा बसवूं शकेल असें एकीचेंहि–सुहास याला अपवाद आहे–जीवन नाहीं. " The English girl is flat and crude as a face painted on a playing card; she is without depth, without range, without intricacy, " हें व्हर्जिनिया वूल्फनें केलेलें एका इंग्लिश नाटकांतील नायिकेचें वर्णन माडखोलकरांच्या बहुतेक साऱ्या नायिकांना थोड्याफार फरकानें लागू आहे. एका लहानशा जगांतील हीं चित्रें वैशिष्ट्यहीन व वैचित्र्यशून्य झालीं आहेत. स्त्रीजातीच्या मानसिक गुलामगिरीचें, पराधीनतेचें, व दुबळेपणाचें ठराविक रडगाणें गाण्यापलीकडे त्यांचें कांहींच कर्तृत्व नाहीं. उठावदार व्यक्तिमत्त्वाच्या अभावीं त्यांचे सारे चांगले विचार अरण्यरुदनवत् ठरले आहेत. त्यांची कींव येते, त्यांच्याविषयीं अनुकंपा वाटते, प्रसंगविशेषीं संताप येतो, आणि सहानुभूतीहि वाटते–पण त्या चिरस्थायी परिणाम मात्र करूं शकत नाहींत मनावर. साऱ्याच नायिका बुद्धिमती, कलावती, सौंदर्यशालिनी, अभिजात संस्कृतींत वाढलेल्या, सुशिक्षित, पराकाष्ठेच्या मानी असूनहि स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचा दारुण कोंडमारा 'मन मारून' सहन करणें त्यांना भाग पडतें–आणि त्या दौर्बल्याचीं प्रतीकें बनतात. त्याच्या या विलक्षण दुर्बलतेमुळें व त्या दुर्बलतेमुळें त्यांना सोसाव्या लागणाऱ्या हजारों दारुण वेदनांमुळें त्यांच्याविषयीं विलक्षण अनुकंपा वाटते हें मात्र अगदीं खरें !

## दौर्बल्याची मीमांसा

ज्या दौर्बल्यामुळें या नायिकांना इतक्या असह्य वेदना सोसणें भाग पडत आहे तें दौर्बल्य तरी कां उत्पन्न झालें?—आणि तें सर्वांनाच असें कां छळीत आहे? विवाहाच्या पूर्वी बुद्धिमत्तेची विलक्षण चमक दाखविणाऱ्या स्त्रिया विवाहानंतर स्वाभिमान विसरून जाऊन पतीच्या इच्छा, आकांक्षा व विचार यांच्याबरोबर स्वतःच्या इच्छांचा, आकांक्षांचा व विचारांचा प्रबळ

विरोध उत्पन्न झाला असता 'मन मारून' तो विरोध नष्ट करण्याचा येवढा विलक्षण प्रयत्न कां करीत आहेत? विवाहोत्तर पतीच्या आयुष्याशीं त्यांना समरस कां होतां येत नाहीं? ज्या सौंदर्यामुळें व बुद्धिमत्तेमुळें त्यांचे प्रियकर विवाहापूर्वी दिपून गेले होते तें सौंदर्य व ती बुद्धिमत्ता विवाहोत्तर त्यांना फार काळ कां भुरळ घालूं शकत नाहीं? ती सौंदर्याची दीप्ति जर चिरस्थायी असती तर भुरळहि चिरस्थायी असती! आणि माडखोलकरांच्या नायिकांचें खरें दुर्भाग्य हेंच आहे. बुद्धिवैभव नष्ट न झालें तरी सौंदर्य नष्ट होणें अपरिहार्य असल्यामुळें केवळ शारीरिक सौंदर्यानें आकृष्ट झालेल्या अनिरुद्ध, मुकुंद, मोहन इत्यादि भोगलोलुपांना पत्नीचें पहिलें टवटवीत सौंदर्य डागळलेलें दिसल्यानंतर तिच्याविषयीं पूर्वीचें आकर्षण वाटलें नसल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. प्रियदर्शन, निशिकांत व चंद्रशेखर ध्येयजीवनाच्या मागें लागलेले म्हणून सोडून देऊं. बाकी सारे मोहविवश पुरुष असल्यामुळें विवाहांतील शारीरिक आकर्षणाचा उन्माद नष्ट झाल्याबरोबर भ्रमरवृत्तीनें वागूं लागतात—आणि ते तसे वागूं लागल्याबरोबर त्यांच्या प्रियकरणींच्या दुर्दैवाला प्रारंभ होतो. पुरुष पराकाष्ठेचे ध्येयवादी असले तर स्त्रियांना त्यांच्या त्या ध्येयजीवनाशीं समरस होण्याइतकें सामर्थ्य नसतें म्हणून त्या दुर्दैवी, आणि पुरुष ध्येयवादी नसून केवळ भोगलंपट असले तर विशिष्ट मर्यादेच्या पलीकडे त्या शारीरिक सौंदर्याचें प्रभुत्व त्याच्यावर गाजवूं शकत नाहींत म्हणून त्या दुर्दैवी! अशा रीतीनें पतीच्या जीवनाशीं समरस होणें त्यांना केव्हांच शक्य होत नाहीं. प्रथममीलनानंतर होणारा आनंद टिकूं शकत नाहीं. आणि पतीच्या व्यक्तिमत्त्वांत स्वतःचें व्यक्तिमत्त्व विलीन करून घेण्याची शक्यता निरंतर नष्ट झाल्यामुळें परस्परांतील अंतर जें वाढत जातें तें पुनः कधींहि कमी होत नाहीं. साहसी पुरुषांच्या आयुष्यांत स्त्री ही एक चैनीची गोष्ट असते, असें कांतेचें गाऱ्हाणें आहे; तर निर्घृण उपभोगानंतर स्त्रीची कुस्करलेल्या फुलासारखी अवस्था होते, असा आक्रोश अनू व रोज करीत आहेत. अशा स्थितींत परस्परांचें जीवन एकरूप कसें व्हावें!' परस्परांचें जीवन एकरूप न झाल्यामुळें त्यांना वेदना होतात याचें मुख्य कारण म्हणजे त्या साऱ्या पराकाष्ठेच्या बुद्धिप्रधान आहेत हें होय. त्या

जर बुद्धिमती नसत्या तर पतीच्या जीवनाशीं स्वतःला समरस होतां आलें नाहीं म्हणून त्यांना खेदहि झाला नसता. त्यांची बुद्धिमत्ता त्यांना पतीच्या जीवनाशीं स्वतःला समरस करून घेण्याचा आदेश देत आहे–पण निसर्गानेंच त्यांच्या ठायीं उत्पन्न केलेला कमकुवतपणा पुरुषांच्या उद्दाम भ्रमरवृत्तीला पायबंद घालूं शकत नाहीं. अशा या द्वंद्वांत सांपडलेल्या नायिका दुबळ्या झाल्या आणि मन मारावयास शिकल्या तर तें अपरिहार्यच आहे. पण मग त्या मन तरी कां मारतात? 'मन न मारतां' पतीच्या जीवनाला त्यांना प्रबळ विरोध कां येत नाहीं? या प्रश्नाचें उत्तर अनेक वेळां त्यांनीं दिलेलें आहे. पुरुष कसेहि वागले– त्यांनीं कितीहि भ्रमरवृत्ति दाखविली तरी स्त्रियांनीं घर सोडतां कामा नये असें कांतेचें म्हणणें आहे. "पुरुष घरांत राहोत वा न राहोत, ते जोपर्यंत घर अजिबात सोडून जात नाहींत, तोंपर्यंत त्यांची आणि घराची आपल्याकडून होईल तितकी काळजी घेणं हें काम आहे बायकाचं." अनूचेंहि जवळ जवळ असेंच म्हणणें आहे. आणि त्याचें असेंहि होतें कीं, प्रेम ही पुरुषाला करमणुकीची गोष्ट असते एक,–पण स्त्रीला मात्र तें सर्वस्व असतें. त्यामुळेंहि स्त्रीला दौर्बल्य पत्करून मन मारावें लागतें; आणि, म्हणून पुरुष कसेहि वागले तरी प्रणयिनी त्यांच्यावर प्रेमाचा अविरत वर्षाव करीत राहतात, असें या नायिका स्वतःचें समर्थन करितात. बायरनचें तें प्रसिद्ध वाक्य 'मुक्तात्म्यां' तील केशव व 'शाप' मधील निशिकांत यांना फार आवडतें तें उगाच नाहीं. "प्रेम ही पुरुषाच्या जीवनांतील अनेक गोष्टींपैकीं फक्त एक गोष्ट असते, पण स्त्रीचं मात्र तें जीवनसर्वस्व असतं." पुरुषाच्या प्रणयविषयक कल्पनेपेक्षां स्त्रीची प्रणयविषयक कल्पना अत्यंत भिन्न असल्यामुळें दोघाच्या मनोवृत्तींत असा भयंकर विरोध येत असतो. ललिता स्त्रीप्रेमाविषयीं म्हणते–"स्त्रीचें प्रेम! तें प्रेमविषयाशिवाय दुसऱ्या कशाला मुळीं ओळखीतच नाहीं, दुसऱ्या कशासाठीं मुळीं जगतच नाहीं." स्त्रीची प्रणयविषयक कल्पना अशी असल्यामुळेंच पुरुषाच्या कोणत्याहि दुर्गुणाकडे ती दुर्लक्ष करूं शकते. हें पुरुषाला कधींच जमायचें नाहीं. आणि यामुळेंच मोहनला रोज म्हणते–"तुम्ही कसेहि असा आणि कसेहि वागा! माझ्या

तुमच्यावरल्या प्रेमाचा तुमच्या वर्तनाशीं कांहीं संबंध नाहीं." स्त्री कितीहि बुद्धिप्रधान असली तरी ती अशी अगतिक होते, हेंच माडखोलकरांच्या नायिका घोष करून सांगत आहेत. पुरुष भ्रमरवृत्तीनेंच वागायचा आणि स्त्री त्याच्याशीं निष्ठेनेंच वागायची, हेंच सार नाहीं का सर्व नायिकांच्या इतिहासाचें ? फ्रेड्रिक एंगेल्स म्हणतो त्याप्रमाणें—" What is considered a crime for women and entails grave legal and social consequences for them, is considered honorable for men or in the worst case a slight moral blemish born with pleasure "* माडखोलकरांचे नायक एंगेल्सचें म्हणणें सप्रमाण सिद्ध करीत असल्यामुळें त्यांच्या बुद्धिमती नायिका असहाय व दुर्बल बनल्या आणि स्वत:च्या मनाचा कोंडमारा करून घेऊं लागल्या तर त्यांत विचित्र असें काय आहे ? त्यांच्या मनोरचनेंतील कमकुवतपणाचाच तो अपरिहार्य परिपाक नाहीं का ?

## बौद्धिक मैत्रीण

' नवे संसार ' या कादंबरींतील नायिका मिरा हिची व्यथा जरा निराळ्या प्रकारची आहे. तिचा पति विद्याधर हा सुसंस्कृत, सोज्वळ आणि निर्व्यसनी आहे. आपल्या बायकोनें स्वत:च्या गरिबीच्या संसाराला स्थैर्य प्राप्त व्हावें यासाठीं केलेले कष्टहि त्याला माहीत आहेत. अनिरुद्ध, मोहन व मुकुंद यांच्याप्रमाणें तो लंपट व भोगलोलुप नाहीं. उलट, कांहीं ध्येय त्याच्या डोळ्यांपुढें आहे व तें ध्येय कृतींत उतरवितां यावें अशीहि त्याची प्रामाणिक इच्छा आहे. तात्पर्य, अनू, सुलोचना अथवा रोज यांच्याप्रमाणें तिची अवस्था नाहीं. तरीसुद्धां विद्याधराच्या जीवनांत मुक्ताचें आगमन झाल्याबरोबर त्याच्या सुखी संसारांत बिघाड उत्पन्न होऊं लागतो. मुक्ता व विद्याधर यांच्या रोज वाढत चाललेल्या परिचयामुळें त्यांच्याविषयीं तिला नानाप्रकारच्या शंकाकुशंका येऊं लागतात व ती चिडूं लागते. मुक्ताशीं आपला वाईट संबंध नाहीं हें त्यानें जीव तोडून सांगितलें तरी तिचा

* Engels–" *The Origin of Family.*" p. 90

त्याच्यावर विश्वास बसत नाहीं. नवरा आपल्या हातांतून निसटून चालला हें तिला स्पष्ट दिसूं लागलें; व अशा प्रकारें पति-पत्नींमधील अंतर दिवसें-दिवस वाढतच गेलें.

विद्याधराची ‘ बौद्धिक ’ मैत्रीण मुक्ता ही माडखोलकरांच्या स्त्रीव्यक्ति-रेखांपैकीं एक आकर्षक व्यक्तिरेखा आहे. तिचें व्यक्तित्व सुहासच्या व्यक्तित्वाप्रमाणेंच प्रभावी आहे. स्त्रीत्वाचें साफल्य व्हावें अशी तिला तळमळ लागणें स्वाभाविक आहे. परंतु ज्या पुरुषाशीं तिचा सहवास झाला तो तर विवाहित होता. त्याच्यावर तिचें उत्कट प्रेम होतें व त्याच्या सहवासाची तिला ओढ लागे हें खरें. पण त्याच्यावर खरा अधिकार त्याच्या पत्नी-चाच आहे, आपण केवळ आगंतुक आहों या गोष्टीची जाणीव होतांच तिला आपण कांहींतरी अपराध करीत आहों असें वाटूं लागे व ती ओशाळी होई. मिरेच्या संसाराचा विध्वंस करण्याचा आपल्याला कसलाहि हक्क नाहीं हें ती आपल्या मनाला वारंवार बजावीत असे. यामुळें विद्या-धरावरील उत्कट प्रेम आणि मिरेला अन्याय न व्हावा ही तळमळ या दोन भावनांच्या द्वंद्वात तिचें मन सांपडलें आहे. पण शेवटीं कर्तव्याची भावना वासनांवर मात करते. विद्याधराच्या भावना अनेक वेळां मर्या-देच्या बाहेर जाण्याच्या बेतात असतात; पण तीच त्याला परिस्थितीची जाणीव करून देते व त्याला मर्यादेबाहेर जाऊं देत नाहीं. भावनावशतेच्या जोडीला व्यवहारी शहाणपणा व धोरण याहि गोष्टी तिच्याठायीं असल्यामुळें विद्याधरानें कटांत सामील होण्याचें धाडस करूं नये यासाठीं ती खूप खटपट करते व त्याचीं ऑफिसांत असलेलीं खाजगी पत्रें वेळींच जाळून टाकते. विद्याधराला कटांत सामील होण्याच्या बेतापासून परावृत्त करण्याची ती धडपड करीत असली तरी तें जमलें नाही व त्याच्यावर कांहीं संकट आलें तर त्याच्यासाठीं वाटेल तें करावयास ती तयार आहे. विद्याधर मिरेपासून कितीतरी दुरावलेला आहे हें स्पष्ट दिसत असूनहि ती आपल्या भावनांना धीरानें आवर घालते आणि विद्याधर खटल्यांतून मोकळा झाल्यावर त्याला ती मिरेच्या हवालीं करते व तिला मार्मिकपणें म्हणते, “ आतां संभाळा तुम्ही आपल्या पतिराजांना.........पण आतां त्यांचा पाय संसारांत टिकणं न टिकणं हें सर्वस्वीं तुमच्यावर अवलंबून आहे. ”

मुक्तेच्या ठिकाणीं स्वतःचें असें स्वतंत्र व्यक्तित्व आहे व तें आकर्षक आहे यांत शंका नाहीं ! सुशिक्षित व सुसंस्कृत अशा पुरुषांचा कांहींतरी कारणांमुळें स्वतःच्या पत्नीखेरीज दुसऱ्या एखाद्या स्त्रीशीं निकट परिचय झाला आणि त्या दुसऱ्या स्त्रीच्या मोहानें पुरुष स्वतःच्या निरपराध पत्नीचा मानसिक छळ करूं लागला तर त्या दुसऱ्या स्त्रीनें काय करावें ? ज्या पुरुषावर आपलें प्रेम असेल त्याच्या पहिल्या पत्नीच्या त्याच्यावरील अधिकाराकडे पूर्ण दुर्लक्ष करून त्याला शक्य तेवढें आपल्या मोहपाशांत गुंतवावें व शेवटीं त्याच्याशीं लग्न करून पहिलीला घराबाहेर काढावें ? अथवा समजूतदारपणा धरून आपण आपल्या भावनांना वेळींच पायबंद घालावा व त्याच्या पत्नीला अन्याय न करतां आपणच बाजूला व्हावें ? या प्रश्नांचीं उत्तरें शोधणारांना मुक्तेच्या वर्तनांत कांहीं महत्त्वाचें हातीं लागण्याचा संभव आहे !

## सुखवादी विलासिनी

'नागकन्या' कादंबरींतील मदिया ही बोलून चालून प्रीतीला तारुण्यांतील एक क्रीडा मानणारी व शक्य असेल तेव्हां व शक्य असेल तितका विलास करावा हें सुखवादी तत्त्वज्ञान प्रमाण मानणारी चपला आहे. प्रीति हा तारुण्याचा अगदीं अल्पसा भाग ती मानीत आहे. यामुळें प्रीतीच्या बावतींत भावनावश होऊन आपल्या साहसवृत्तीचा पुरुषानें कधींहि त्याग करू नये असें तिचें मत आहे. मदिया ही पाश्चात्य संस्कृतींत वाढलेली असल्यामुळें तिचे हे विचार आपल्या कुढणाऱ्या स्त्रियांच्या पचनीं पडावयास आणखी कांहीं दशकें तरी गेलीं पाहिजेत.

## शिकारी पुरुषांचा बळी

'डाकबंगला' या कादंबरींतील कांचनगौरी ही देखील अनू व रोज यांच्याप्रमाणें पुरुषांच्या अतृप्त भोगलालसेला बळी पडली आहे. पूर्वीच्या आयुष्यांत पुरुषाच्या लंपटपणाचा भरपूर अनुभव असूनहि ती पुन्हां एकदां पुरुषाच्या वासनेच्या आहारीं जाते व आत्महत्त्याहि करते. पुरुषांच्या शिकारी व भटक्या वृत्तीला बळी पडणाऱ्या स्त्रियाचा जो नमुना

माडखोलकरांनीं तयार करून ठेवला आहे त्याबरहुकूम ही व्यतिरेखा निर्मिली असल्यामुळें तिच्याठिकाणीं कसलेंच व्यक्तित्व आढळलें नाहीं तर त्यांत नवल काय ?

## दोन करारी विधवा

'चंदनवाडी' मधील म्हातारी येसू व तिची तरूण सून रखमा या दोन मोठ्या करारी आणि तेजस्वी स्त्रिया आहेत. धनवान मालगुजाराच्या वासनेला बळी न पडतां आपला तेजस्वी स्वाभिमान प्रकट करणारी रखमा व तितकाच करारीपणा दाखवून तावडतोब घरदार सोडून परागंदा होणारी म्हातारी येसू या दोन बायांचें व्यक्तित्व अगदीं रसरसलेलें आहे. कोणत्याहि प्रकारचें शिक्षण नाहीं, उच्च संस्कृतीची ओळख नाहीं, पैसा नाहीं अशा या दोन अनाथ विधवा आपला करारीपणा व स्वाभिमान सोडीत नाहींत हें पाहिलें म्हणजे प्रतीक्षणीं मन मारून कुढत बसणाऱ्या आपल्या सुशिक्षित स्त्रियाच्या परिस्थितीची योग्य जाणीव होते. आजी व आई यांच्यावरील प्रेम व प्रियकरावरील प्रेम या द्वंद्वांत दुसरें प्रेम विजयी झालें तरी स्वतःच्या कर्तव्याची शेवटपर्यंत जाणीव ठेवणारी व आचरणांत अगदीं नाइलाज होईपर्यंत संयम ठेवणारी चंदनसुद्धां आपलें मन वेधून घेते.

## लढाऊ नायिका

प्रमद्वरा ही स्त्री माडखोलकरांच्या इतर कादंबऱ्यांतील सुशिक्षित सुसंस्कृत परंतु पतीच्या ध्येयवादाशीं समरस होतां न आल्यामुळें आपण हीन आहोंत असें मानून कुढत बसणाऱ्या अथवा पतीच्या कामवासनेला बळी पडल्यामुळें चिडलेल्या स्त्रियांपेक्षां अगदीं निराळी आहे. तिच्यांत धडाडी आहे, करारीपणा आहे, निर्भयपणा आहे व प्रखर ध्येयवाद आहे. आपला ध्येयवाद तर ती कृतींत उतरवितेच. पण स्वतःमध्यें कर्तबगारी नसलेल्या, निष्क्रिय, परंतु कृति करणाऱ्या लोकांचे पाय विनाकारणच ओढणाऱ्या आपल्या नवऱ्याला सुद्धां स्वतःच्या ध्येयवादी पंथांत ओढण्याइतपत पराक्रम दाखविते. माडखोलकरांच्या बऱ्याच नायिकांच्या दुबळेपणाकडे पाहिलें तर प्रमद्वरेचा पराक्रम अलौकिक आहे असेंच म्हणावें लागेल !

# १३

## फलश्रुति

१९२० ते १९४५ या पंचवीस वर्षांच्या कालखंडांतील महाराष्ट्रीय कादंबरीकारांत माडखोलकरांचें स्थान पहिल्या पंक्तींत आहे यांत कोणतीच शंका नाहीं. आजतरी फडके, खांडेकर व माडखोलकर हीं तीनच नांवें कादंबरीच्या क्षेत्रांत अगदीं ठळकपणें दिसत आहेत. संख्येचाच विचार केला तर या तीन कादंबरीकारांपेक्षां इतर कांहींनीं अधिक कादंबऱ्या लिहिल्याहि असतील. पण महाराष्ट्राचे आजचे सर्वश्रेष्ठ कादंबरीकार कोणते असा प्रश्न एखाद्या परप्रांतीय रसिकानें विचारला तर आपल्यांतील सामान्य मनुष्य व जाणता मनुष्य हे दोघेहि काय उत्तर देतील ? वर उल्लेखिलेले तीन कादंबरीकार हेच कादंबरीक्षेत्रांतील महाराष्ट्राचे आजचे प्रतिनिधि या बाबतींत त्यांचें एकमतच आहे असें आपल्याला दिसून येईल. तात्पर्य, कादंबरीक्षेत्रांत माडखोलकरांचें श्रेष्ठ स्थान निश्चित झालें आहे. माडखोलकरांनीं लघुकथा लिहिल्या आहेत, बरीचशी टीकाहि केली आहे, ते वृत्तपत्रकारहि आहेत. पण या सर्व भूमिकांपेक्षां कादंबरीकार हीच भूमिका त्यांनीं गेलीं बारा वर्षें तन्मयतेनें वठविली असल्यामुळें लघुकथाकार, टीकाकार अथवा वृत्तपत्रकार यापेक्षां कादंबरीकार माडखोलकर हीच भूमिका रसिकांच्या दृष्टीनें विशेष आकर्षक झालेली आहे. दुसरें असें कीं, गेलीं पंधरा सोळा वर्षें हिंदुस्थानच्या राजकीय व सामाजिक इतिहासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची ठरतील. या काळांत गांधीवादी राजकारणाचा सर्वांत मोठा आविष्कार दिसून आला; सामुदायिक सत्याग्रहाच्या कांहीं फार मोठ्या चळवळी या काळांत झाल्या; १९३५ ची घटना याच काळांतली; प्रख्यात दांडीमोर्चा, मिठाचा सत्याग्रह व जंगलसत्याग्रह इत्यादि गोष्टी याच काळांत घडल्या; दुसरें भीषण महायुद्ध याच काळांत सुरू होऊन अजूनहि त्याचे परिणाम हिंदुस्थानाला भोगावे लागत आहेत; नवीन घटनेप्रमाणें प्रांतांचा कारभार लोकनियुक्त मंत्रिमंडळांच्या ताब्यांत येऊन सात प्रांतांत कॉंग्रेस मंत्रिमंडळें याच काळांत स्थापन झालीं आणि थोड्याच दिवसांत

राजीनामा देऊन बाहेरहि पडलीं; युरोपांतील युद्धासाठीं सर्व प्रकारचें सहकार्य मिळावें यासाठीं ब्रिटिश सरकारनें याच काळांत शिकस्त केली; सर स्टॅफर्ड क्रिप्स यांची इतिहासप्रसिद्ध शिष्टाईहि याच काळांत झाली; आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे ८ ऑगस्ट १९४२ चा काँग्रेसचा प्रसिद्ध ठराव पास होतो न होतो तोंच काँग्रेसच्या बहुतेक साऱ्या श्रेष्ठ व कनिष्ठ पुढाऱ्यांची एकदम सार्वत्रिक धरपकड झाल्यानंतर सर्व हिंदुस्थानांत झालेला हुलकल्लोळ---अत्याचार, जाळपोळ, गोळीबार, खून, बलात्कार, दरवडे इत्यादि अभूतपूर्व गोष्टी व त्यानंतर ब्रिटिश सरकारनें आपल्या साऱ्या प्रयत्नांची शिकस्त करून काँग्रेसची चळवळ दडपून टाकल्यावर सर्व देशांत उत्पन्न झालेली पराकाष्ठेची उदासीन निष्क्रियता आणि निश्चलता; जपानची हिंदुस्थानावरील स्वारी व नेताजी सुभाषचंद्रांची आझाद हिंद सेनेची अद्‌भुत चळवळ आणि बंगालमधील भीषण दुष्काळ इत्यादि घटना प्रस्तुत कालखंडांत अगदीं अलिकडेच होऊन गेलेल्या. तात्पर्य, माडखोलकरांच्या अकरा कादंबऱ्या ज्या काळांत लिहिल्या गेल्या तो गेल्या पंधरा वर्षांचा काळ हिंदुस्थानच्या इतिहासांत सर्वच दृष्टींनीं, विशेषतः राजकीय घटनांच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा ठरलेला आहे. राजकीय घटना अत्यंत महत्त्वाच्या आहेत यांत कांहीं शंका नसली तरी सामाजिक बाबतींतहि याच काळांत अनेक बाजूंनीं संथपणें का होईना, महत्त्वाचे बदल होत आहेत हें काळजीपूर्वक पाहणारास सहज दिसून येईल. विशेषतः महाराष्ट्रापुरतेंच बोलावयाचें झालें तर, सुशिक्षित मध्यम वर्ग आणि संपन्न व सुस्थितींत असलेला उच्च वर्ग या दोन वर्गांतील स्त्रीपुरुषांना कांहीं नवीनच प्रश्नांना तोंड देणें आतां भाग पडूं लागलें आहे. जे प्रश्न गेल्या पिढींतील स्त्रीपुरुषाना अगदीं अपरिचित होते ते दिवसेंदिवस बलवत्तर होऊं लागले आहेत व यापुढच्या काळांत ते उग्र स्वरूप धारण करतील असें वाटूं लागलें आहे. मीं या ठिकाणीं मध्यमवर्गाचा व उच्च वर्गाचाच उल्लेख केला याचें कारण माडखोलकर या वर्गांतील आहेत.

माडखोलकरांनीं ज्या काळांत कादंबऱ्या लिहिल्या त्या काळाचें राजकीय व सामाजिक स्वरूप वर मुद्दाम वर्णिलें आहे. माडखोलकर हे महाराष्ट्राचे पहिल्या रांगेंतील श्रेष्ठ कादंबरीकार असल्यामुळें या राजकीय

आणि सामाजिक घटनांचा आविष्कार त्यांनीं कोणत्या प्रकारें केला आहे; त्यांनीं स्वतः या घटनांचा अर्थ कोणता लाविला आहे; याबाबतींत त्यांचे स्वत:चे असे कोणते विचार आहेत; कोणतीं राजकीय व सामाजिक ध्येयें व तत्त्वें त्यांना आदरणीय वाटत आहेत; जो मध्यमवर्ग त्यांनीं आपल्या कलाविलासासाठीं निवडला आहे त्यांतील व्यक्तींच्या कोणत्या आकांक्षा व अपेक्षा त्यांनीं समजावून घेतल्या आहेत व त्यांना शब्दस्वरूप दिलें आहे; कोणत्या सामाजिक भावनांत व राजकीय घटनांत त्यांना खरा जिव्हाळा वाटतो; कोणत्या विशिष्ट मनोविकारांच्या व्यक्तींत त्याचें मन खरेंखुरें रमतें; समाज आणि साहित्य किंवा समाज आणि कला यांचा परस्परसंबंध व समाज आणि व्यक्ति यांचा परस्पर संबंध या महत्त्वाच्या प्रश्नांसंबंधीं त्यांचें विचार कोणते आहेत; आणि सर्वांत महत्त्वाचें म्हणजे ज्या जगात ते वावरत आहेत त्या जगाकडे पाहण्याची त्यांची दृष्टि कोणती आहे व त्या जगाला आशेचा आणि चैतन्याचा कोणता ठेवा त्यानीं दिला आहे, आणि प्रचलित काळाचे ते प्रतिनिधि आहेत काय इत्यादि सार्‍या गोष्टींचा अगदीं साक्षेपानें आपणांस विचार करावा लागेल आणि आपली रसिकता अत्यंत चिकित्सक व मर्मग्राही आणि तितकीच उदार व विशालहि आहे हें सिद्ध करून द्यावें लागेल !

## माडखोलकरांची कलात्मता

कोणत्याहि ललितलेखकाच्या कृतींचा साकल्यानें विचार करताना त्यांच्या त्या कृतींत कलेचा अंश कितपत आहे हें प्रथम पहावें लागतें. कलात्मता हा ललित वाङ्मयाचा मूलभूत गुण आहे हें कधींहि विसरतां येणार नाहीं. हा मूलभूत गुण जर वाङ्मयांत नसेल तर यापेक्षां अधिक महत्त्वाचे गुण त्याच्यामध्यें प्रकट होण्याचा संभव नष्ट होतो. म्हणून कलात्मक सौंदर्य कोणत्या रीतीनें व कोणत्या प्रमाणांत प्रकट झालें आहे हें पाहिल्यावाचून आपल्याला इतर निकषांचा विचारच करावयाचा नाहीं. कलात्मक सौंदर्य विविध प्रकारांनीं प्रकट होऊं शकतें. पण, उत्कृष्ट शब्दांची परिणामकारक निवड, सुश्लिष्ट रचना, थोडक्यांत, आपण जिला शैली म्हणतो तिच्या द्वारें मुख्यतः हें कलात्मक सौंदर्य प्रकट होत असतें. या

कलात्मक सौंदर्याच्या दृष्टीनें माडखोलकरांच्या अकरा कादंबऱ्यांचा साकल्यानें विचार करावयाचा आहे.

संस्कृतप्राचुर्याचा व अत्यंत प्रौढ व प्रगल्भ गौडी रचनेचा माडखोलकरांना सुरवातीला विलक्षण हव्यास होता. उत्तरोत्तर त्यांचें संस्कृतप्राचुर्य कमी होत गेलें आहे हें खरें असलें तरी प्रगल्भ व प्रौढ रचनेची त्यांची आवड कायम राहिली आहे असें दिसून येईल. भाषेच्या लालित्यापेक्षां त्यांना तिची प्रौढता अधिक महत्त्वाची वाटते हें अगदीं स्पष्ट आहे. ही प्रौढताहि आकर्षक आहे यांत मात्र शंका नाहीं. एक प्रकारचा घोटीवपणा व सुबकपणा त्यांच्या भाषेंत ठायीं ठायीं आढळतो. संस्कृत कवींपैकीं भवभूति व आधुनिकांपैकीं गडकरी यांच्या रचनेचें जें स्वरूप आहे तेंच बरेंचसें माडखोलकरांच्या रचनेचेंहि आहे. अगदीं सोज्वळ भाषा त्यांनीं फक्त ‘ चंदनवाडी ’ या एकाच कादंबरींत मुक्त हस्तानें वापरली आहे.

माडखोलकरांच्या शैलीला सुबकपणा येण्याचें एक महत्त्वाचें कारण म्हणजे त्यांची शब्दयोजना. अगदीं वेचक आणि गोंडस शब्द शोधून काढण्यासाठीं ते भारी खबरदारी घेत असतात. कित्येक वेळां त्यांच्या अपेक्षेला उतरेल असा शब्द त्यांना रूढ भाषेंत सापडला नाहीं तर जुन्या सस्कृत साहित्यांत वापरलेले परंतु आतां वापरांतून गेलेले किंचित् अपरिचित व क्वचित् चमत्कारिक वाटणारेहि शब्द ते वापरतात. पण कित्येक वेळां या शब्दान्वेषणाच्या विचित्र हव्यासामुळें ते क्लिष्ट शब्द वापरतात व असे शब्द फार झाले म्हणजे रचनेला एक प्रकारचा बोजडपणा व कृत्रिमपणा विनाकारणच येतो. विशेषतः मृदु व कोमल भावना व्यक्त करीत असतां असली कृत्रिम रचना परिणामाच्या दृष्टीनें हिणकस ठरते.

‘ मुक्तात्मा ’ या पहिल्या कादंबरींत कृत्रिम व अपरिचित शब्द आणि क्लिष्ट संस्कृतप्रचुर रचना याचा अगदीं अतिरेक झाला आहे. प्रौढ व प्रगल्भ गौडी रचनेचा त्यांनीं अगदीं अंत पाहिला आहे. सामान्यतः इतर कोणीहि मराठी ललितलेखक ( खुद्द गडकरीसुद्धां ) जे शब्द वापरीत नाहींत त्यांचा माडखोलकरांनीं सढळ हातानें उपयोग केला आहे. ज्या कल्पना अगदीं साध्या शब्दांत अथवा सोप्या संस्कृत शब्दांत मोठ्या कौशल्यानें व्यक्त करता आल्या असत्या त्यांसाठीं माडखोलकर अपरिचित

संस्कृत शब्दांचा व बळेंच बनविलेल्या सामासिक शब्दांचा उपयोग करितांना पाहून मोठी मौज वाटते. त्याचप्रमाणें, विशेषणें वापरतांनाहि ते गडकऱ्यांच्या संक्रमित विशेषणांच्या ( transferred epithets ) पद्धतीचा कांहीं वेळां कौशल्यानें आणि अनेक वेळां निरर्थक उपयोग करितात. पण अशीं विशेषणें वापरण्याचा त्यांना एक प्रकारच्या हव्यासच जडलेला आहे. आणि हा हव्यास त्यानीं गडकऱ्यांपासून उचललेला आहे यांत कोणतीहि शंका नाहीं. संक्रमित विशेषणाचा उपयोग मोठ्या कौशल्यानें मराठी भाषेंत प्रथम गडकऱ्यांनींच केला व त्यांच्या पश्चात् कोणाहि लेखकाला, —माडखोलकरांनासुद्धां—आतांपर्यंत त्यांचें कसब साधलेलें नाहीं. फक्त ‘ मुक्तात्मा ’ या कादंबरीचा विचार केला तरी त्यांत आतांच उल्लेखिलेले अपरिचित संस्कृत शब्द व संक्रमित विशेषणें यांचीं वाटेल तेवढी उदाहरणें सांपडतील. उदाहरणार्थ, ईषदरुण तेज, करुणाच्या सांद्र रेषा, अंतर्गूढ आर्द्रता, सौंदर्याचा अनघ आविष्कार, निष्प्रभ प्रकाश, सुकोष्ण पाटल प्रभा, ईषदरुण, पीनोन्नत उरोभाग, स्मितसुंदर आविष्ट ( ? ) मुखमंडल, क्षितिजावर आबद्ध दृष्टि, स्नेहार्द्रशीतल स्पर्श ( हे भवभूतीचेच शब्द आहेत ), दाहक आर्द्रता, उदास माधुरी, भीषण कटुता, सपर्ण फूल, सांद्र भावना, स्मृतिसंबद्ध आलोक ( म्हणजे आठवलेलीं दृश्यें, दुसरें कांहीं नाहीं ), आंतरिक तृष्णा, निद्रेचा नीरव ( म्हणजे शांत ) प्रदेश, विवेकानें येणारी परुषता ( म्हणजे कठोरपणा ), भुवयांची ईषद्‌वक्रता, रोषगर्भ व्याजस्मित, प्रमाथी बुद्धि इत्यादि इत्यादि. उदाहरणें द्यावयाचीं तरी किती? प्रत्येक पानांत वाटेल तितकीं सांपडतील. कांहीं शब्द माडखोलकरांनींच प्रथम रूढ केले व आतां ते बरेचसे वापरण्यांतहि येऊं लागले आहेत. सुषमा, नीलिमा, धवलिमा, अबोध, विवशता, संयत, अशरणता, अनघता, नीरवता, उरोज, मदिर, असीम, अकलंक, सकंप, सहकंपा, सुनील, भावजीवन, भावतरंग, भावलहरी, कलंदर, प्रमाथी इत्यादि शब्द गडकऱ्यांनींसुद्धां वापरले नव्हते. माडखोलकरांनीं सर्रास वापरल्यामुळें आतां हे शब्द बरेचसे रूढ होऊं लागले आहेत. पण माडखोलकरांनीं याबाबतींत केलेल्या अतिरेकाचें मात्र कोणीहि अनुकरण केलें नाहीं हें महाभाग्य होय. या बाब-

तींत माडखोलकर अतिरेक कसा करितात हें जाणण्यासाठीं पुढील कांहीं उदाहरणें पुरेशीं होतील. मोटारींची ' स्तिमित ' रांग हें काय प्रकरण आहे ? ' आविष्ट ' मुखमंडल म्हणजे काय ? ' कितवाचा सावध अनुनय ' म्हणजे काय ? ' सभय भ्रांततेची सूक्ष्म छटा ' म्हणजे काय ?

पण असले शब्द वा शब्दसमुच्चय वापरण्याची माडखोलकरांची हौस ' मुक्तात्मा ' याच एका कादंबरींत अक्षरशः शिगेला पोंचली आहे. पुढच्या कादंबऱ्यांतून ती त्यांनीं खूपच आटोक्यात ठेविलेली आहे. त्यांची एकंदर रचना प्रौढ व प्रगल्भ असली तरी वर उल्लेखिलेला प्रकार पुढें कमी होत गेला आहे हें खरें आहे !

गडकरी छापाचे उपमा, उत्प्रेक्षा व दृष्टान्त इत्यादि अलंकारहि ' मुक्तात्मा ' या कादंबरींत विपुलतेनें दिसतात. पुढच्या कादंबऱ्यांतून अलंकार नाहींत असें नाहीं. पण त्यांचें प्रमाण पुष्कळच कमी झालें आहे. माडखोलकरांचें अलंकार अनेक प्रसंगीं सांकेतिक व संस्कृत साहित्यांत अनेक वेळां वापरलेले असतात हें खरें असलें तरी मधून मधून ते एखादी सुंदर उपमा देतात. उदाहरणार्थ, " चंद्रोदयाच्या वेळीं सुटलेल्या वाऱ्याच्या झुळकेनें क्षितिजावर सांचलेले अभ्रखंड पागले जावें, त्याप्रमाणें भगवंतरावांच्या कपाळावरील आठ्या साऱ्या दूर झाल्या ' ( मुक्तात्मा, पृ.१ ); ' त्या कोंडमारा झालेल्या प्रेमानें, भूगर्भांतील उष्णतेनें आंतर वस्तुजात भाजून काढावें त्याप्रमाणें, माझ्या सर्व शक्तींची आहुती घेतली '; ' नदीच्या पृष्ठभागावरील पाण्याचें जरी गोठून बर्फ झालें, तरी त्या बर्फाच्या थराखालीं जशी तिच्या प्रवाहाची हालचाल चालू असते, तशी त्या उग्रतेच्या आवरणाखालीं त्याच्या हताश हृदयाच्या दुखावलेल्या अतृप्त भावनांची तळमळ सारखी चाललेली असे '; ' पंख फुटून नुकतेंच उडायला लागलेलें पांखरू, चुकून भलत्याच घरट्याजवळ गेलें असतां, जसें गांगरून माघारें फिरावें, तशी माझी अवस्था होत असे;' ' काळोखांत झाडांच्या फांद्यांचे हेलकावे पाहात असतां लहान मुलाला भुतांचा भास व्हावा, त्याप्रमाणें रूढ कल्पनांच्या रहाटींत रुळलेल्या आपल्या मनाला केव्हां केव्हां नाहक भीति वाटते; ' ' सुईच्या अग्राएवढी जरी अनुकूल भूमि त्याला लाभली, तरी तटाच्या भेगेंतील चिमूटभर मातींत उगवून पुढें त्याचा

विध्वंस करणाऱ्या अणुमात्र वटबीजाप्रमाणं, तेवढी जागा त्याला ( क्रांतीच्या बीजाला ) फोंफावायला पुरी होते; ' ' विहिरींत मोटेचें पाणी पडलें असतां त्याचा आवाज ऐकून मनाला जसा दचका बसावा, त्याप्रमाणें त्यांचें ते हंसणें ऐकून तिची अवस्था झाली. ' एक सुंदर दृष्टान्त पहा. हा ' भंगलेल्या देवळां 'त आला आहे. " वाळूंत रुतून बसलेली होडी जशी खेळकर लाटांनीं हलवून समुद्राकडे ओढून न्यावी, तसें संकोचांत गुरफटलेलें माझें मन स्वत:च्या चतुर भाषणानें बोलकें करून ते आपल्याकडे आकर्षून घेत असत." (पृ. ७४) या प्रकारच्या सरस कल्पना माडखोलकरांच्या बहुतेक सर्व कादंबऱ्यांत मधून मधून विखुरलेल्या आहेत.

संस्कृतप्राचुर्याच्या अतिरेकामुळें माडखोलकरांची शैली कशी क्लिष्ट व कृत्रिम होते याचीं अनेक उदाहरणें सहज देतां येतील. अर्थात्, ' मुक्तात्मा ' या कादंबरींत याचा अतिरेक झाला आहे व पुढच्या पुढच्या कादंबऱ्यांत हा दोष कमी होत गेला आहे हें खरें आहे. अगदीं वेंचक उदाहरणें देतो. ' मावळत्या सूर्याची अरुण प्रभा किंवा मावळत्या चंद्राची पीत द्युति क्षुब्ध सिंधूच्या उर्मींवर आंदोलतांना पाहून......;' ' तिच्या मृदुलोष्ण ओठांचा साद्र स्पर्श ' केशवच्या कपाळाला जाणवला; ' नि:शब्द अशा गाढ स्नेहाच्या संजीवक सुधेचें सिंचन जणुं रस्त्यावर उभ्या असलेल्या केशवच्या संतप्त मनावर झालें ' ( हें अगदीं गडकरी वळणाचें आहे! ); ' स्पर्श हा मनाचें केवळ सांत्वनच करितो, असें नव्हे; तर दु:खाच्या धगीनें म्लान झालेल्या जीवकुसुमाला पुन्हा विकसितहि करितो ' ( 'म्लानस्य जीवकुसुमस्य विकासनानि, ;सन्तर्पणानि सकलेन्द्रियमोहनानि ' या भवभूतीच्या उत्तररामचरितांतील प्रसिद्ध ओळींचा हा स्पष्टपणें अनुवाद आहे! ); ' तिच्या अकलंक ललाटावर विमर्शाच्या ईषद्रेषा उमटल्या ' ( हें वाचल्यावर ' काव्याचा अर्थ कळल्यावर कवीची काय मातब्बरी राहिली बरें !' या गडकऱ्यांच्या ' पुण्यप्रभावां 'तील नूपुराच्या मार्मिक प्रश्नाचीं आठवण झाल्यास नवल नाहीं ! ); ' स्वप्नभूच्या अस्पष्टरम्य अशा आलोकांतूनच आपण संचार करीत आहों, असा भास त्याच्या विलोल मनाला झाला; ' ' तिचा ईषदरुण, पीनोन्नत उरोभाग विद्युद्दीपाच्या प्रकाशांत मोहक दिसत होता; व .....टपोऱ्या मोत्यांच्या एकावलीनें तिच्या कंबुकंठाची कांति

दुणावली होती ' ( वा ! ). अधिक उदाहरणें देण्याची जरूरी आहे असें वाटत नाहीं !

उपमा-दृष्टान्तांच्या बाबतींत जो सांकेतिकपणा माडखोलकरांनीं दाखविला आहे तोच सांकेतिकपणा त्यांच्या बहुतेक साऱ्या निसर्गवर्णनांतहि दिसून येतो. यामुळें कांहीं कल्पनांची विलक्षण पुनरुक्ति झालेली आहे. क्षितिज, आकाशाचा नीलिमा, अभ्रखंड, अष्टमीचा अथवा चतुर्थीचा चंद्र, पावसाची सर पडून गेल्यानंतरचें सृष्टीचें स्वरूप हेच त्यांच्या निसर्गवर्णनांतील पुनः पुनः येणारे विषय होत. विशेषत: चंद्राच्या कोरीचें माडखोलकरांना कांहीं विशेषच आकर्षण आहे. जवळजवळ प्रत्येक कादंबरींत चंद्राच्या अर्धबिंबाचें अथवा निमुळत्या कोरीचें वर्णन एकदाच नव्हे तर अनेकदा आलेलें आहे. या निसर्गवर्णनांपैकीं कांहीं वर्णनें तरी भाषेच्या दृष्टीनें अप्रतिम उतरलीं आहेत यांत शंका नाहीं. पण याहि बाबतींत त्यांच्या शैलीनें नकळत गडकऱ्यांचें बरेंचसें अनुकरण केलें आहे हेंहि तितकेंच खरें आहे !

निसर्गवर्णनांत माडखोलकर चंद्रकोरीसारख्या ठराविक गोष्टींचीच खैरात करतात असें नव्हे तर सबंध कल्पनांचीहि नकळत पुनरुक्ति कशी करतात याचें एक उदाहरण देतों. ' मुक्तात्मा ' कादंबरींत पुढील कल्पना आली आहे- ' पाटीवर ओढलेल्या वेडयावाकडया रेघेसारखी दिसणारी क्षीण अशी वीज जेव्हा क्षितिजावर मधून मधून मंदपणें चमके...' इत्यादि ( पृ. ४२ ). आतां या कल्पनेची ' मुखवटे ' या सात वर्षांनंतर लिहिलेल्या कादंबरींतील पुढील कल्पनेशीं तुलना करावी- " कोपऱ्यांत चमकणारी निस्तेज वीज फळयावर ओढलेल्या खडूच्या वेडयावाकडया रेघेसारखी दिसत होती. " ( पृ. ३२५ ). या दोन कल्पनांत एखादा दुसरा शब्द सोडून दिला तर काय फरक आहे ? ' नवे संसार ' या कादंबरींतहि हीच कल्पना पुन्हां अगदीं थोडया फरकानें आली आहे. " निळया फलकावर एखाद्या नादिष्ट चित्रकारानें हाताचा चाळा म्हणून खडूनें सुबक रेषाकृति काढून त्या लगेच पुसून टाकाव्यात, त्याप्रमाणें पक्षांच्या रांगा नानाप्रकाच्या चित्रविचित्र आकृति घेत एकामागून एक दिसेनाशा होत होत्या." (पृ. १८५) एकंदरींत पाहतां, निरभ्र आकाशांत तळपणारें अष्टमी-

ऱ्या चंद्राचें अर्धबिंब,पावसाची धावती सर,चंद्रप्रकाशांत चमकणारीं झाडांचीं भिजलेलीं पानें, क्षितिजाचा सतेज नीलिमा, चतुर्थीच्या चंद्राचें अपुरें लालसर बिंब, अथवा चतुर्थीच्या चंद्राची कोर, अथवा क्षितिजाची तेजाळलेली कड याच गोष्टी माडखोलकरांनीं किंचित् शाब्दिक फरक करून पुन्हां पुन्हां वर्णिल्या आहेत. आणि यामुळें शैलीच्या दृष्टीनें हीं वर्णनें स्वतंत्रपणें कितीहि आकर्षक वाटलीं तरी साकल्यानें पाहिलें तर ठराविक कल्पनांची विनाकारण झालेली पुनरुक्ति रसिकतेला किंचित् खिन्न करते यांत शंका नाहीं.

माडखोलकरांचीं निसर्गवर्णनें उत्कृष्ट शैलीनें नटलेलीं असलीं तरी बरीचशीं ठराविक पद्धतीचीं असल्यामुळें त्यांतील एखादें वर्णन नमुन्यासाठीं दिलें तरी पुरेसें होईल असें वाटतें. पुढील वर्णन 'मुखवटे' या कादंबरींतील आहे. "चंद्र आतां पुष्कळच खालीं आला होता. नारिंगी रंगाचें सुंदर खळें त्याच्या त्या मोठ्या झालेल्या कोरीभोंवतीं पडलें होतें; व नदीच्या विलोल प्रवाहावर त्याच्या सुदीर्घ किरणांचा नाच चाललेला होता. पुराचा पहिला भर ओसरून गेल्यामुळें नदीच्या पात्रांतील खडकांची रांग कांहीं ठिकाणीं उघडी पडली होती. त्या खडकावरून हत्तीच्या सोंडेसारख्या पाण्याच्या शेंकडों धारा खालच्या प्रवाहांत उडी घेत होत्या. त्या धारांचा अखंड होणारा गंभीर घोष!—त्या घोषांत रात्रींच्या वेळीं होणारे इतर सारे क्षुद्र नाद विलीन होऊन नदीकांठची ती सशब्द शांतता विशाल आणि उदात्त वाटत होती. वर चांदण्यानें उजळलेलें तारकामंडित आकाश आणि खालीं चमचम करणारा नदीचा पांढराशुभ्र फेंसाळ प्रवाह!—तो उसळता फेंस पाहून वाटे कीं, चंद्राच्या आकर्षणानें उन्मत्त झालेली नदी खदखदा हंसत आहे! क्षितिजाच्या कडेला जिथें आरक्त चंद्रकोर प्रवाहावर तरंगल्यासारखी भासत होती, तिथें आकाश आणि पाणी यांचा सतेज नीलिमा एकमेकांत मिसळून गेला होता." (पृ. १०) या वर्णनांतील अनेक शब्दसमुच्चय जसेच्या तसे आणखी कितीतरी ठिकाणीं पुन्हां पुन्हां आलेले आहेत. यालाच मी ठराविकपणा आणि सांकेतिकपणा म्हणतो.

निसर्गवर्णनांतील व उपमादि अलंकारांतील सांकेतिकपणा व ठराविकपणा,

कांहीं ठिकाणचें अतिरिक्त संस्कृतप्रचुर्य व त्यामुळें उत्पन्न होणारा कृत्रिमपणा या गोष्टी सोडून दिल्या तर अत्यंत डौलदार, सुबक व बांधेसूत परंतु प्रौढ शैलीचा माडखोलकरांनीं एक आकर्षक नमुना निर्माण केला आहे हें मान्य केलेंच पाहिजे. ही त्यांची शैली अनेक ठिकाणीं प्रकट झाली आहे हें खरें असलें तरी ' भंगलेलें देऊळ ' ही जवळजवळ सर्व कादंबरी, ' मुखवटे ' या कादंबरींतील रोजचें आत्मवृत्त, ' शाप ' ही सर्व कादंबरी इत्यादि ठिकाणीं या प्रकारच्या आकर्षक व डौलदार शैलीचा मनोरम आविष्कार आपणांस पहावयास मिळेल. भवभूतीच्या अनेक कल्पनांची छाया आपणांस जशी ठिकठिकाणीं पहावयास मिळेल तसाच इंग्रजी काव्यांतील अवतरणांचा अत्यंत उचित उपयोगहि अनेक ठिकाणीं पहावयास मिळेल. संस्कृत कवींपैकीं भवभूति व मराठी लेखकांपैकीं गडकरी यांच्या रचनेचा ठसा माडखोलकराच्या शैलीवर विशेष उमटला आहे. वाटेल तेवढीं उदाहरणें यासाठीं काढून दाखवितां येतील. अर्थात् भवभूति व गडकरी यांच्या शैलीमध्यें गौडी रचनेच्या हव्यासामुळें जो विशिष्ट कृत्रिमपणा अनेक ठिकाणीं दृष्टीस पडतो तो माडखोलकराच्या शैलींतहि दिसणें अगदीं अपरिहार्य आहे. पण पांडित्य व वैदग्ध्य यांचा संयोग कांहीं वेळां तरी मनोरम वाटतो यात शंका नाहीं ! वर ज्या शैलीचें इतकें वर्णन केलें आहे त्या शैलीचा फक्त एकच नमुना ' मुखवटे ' या कादंबरींतून देत आहें. " देवा, यौवनपुष्पांतला हा प्रीतीचा मधु--याचा आस्वाद घेणं तू इतकं कठीण का करून टाकलंस ? आणि जर त्याचा आस्वाद माणसानं सहज प्रवृत्तीनं घेऊं नये अशी तुझी इच्छा होती, तर तू प्रीतीला इतकी मादक आणि दाहक का केलीस ? माणसाला नंदनवनांत ठेवयाचा न् तिथलं सर्वांत मधुर फळ खायला मात्र त्याला मनाई करायची ही कुठली रीत ? प्रीतीचा आगम म्हणजे मनःसृष्टीचा वसंत ऋतु. यौवनानं शरीर कितीही मुसमुसलेलं असलं तरी अंतःकरणांत प्रीतीचा उद्भव होईपर्यंत भावनांना बहर येत नाहीं. प्रीतीच्या मदिर स्पर्शानं मनःसृष्टींतल्या सगळ्या कळ्या कशा उन्मत्तपणानं उमलतात ! त्या उमलत्या कळ्या निर्दयपणानं चिरडून टाकायच्या ही कुठली नीति ? आणि सगळ्यांत मधुर, सगळ्यांत उदात्त आणि सगळ्यांत आनंददायक भावना आणि घटना म्हणजे प्रीति, प्रीतीची

पूर्तता! पण संशय आणि भीति यांनीं किती कडवटपणा आणला आहे तिला! केवड्याच्या पानाला काटे आणि बनांत साप! प्रीतीचंहि तसंच नाहीं का?" (पृ. ४३)

## उत्तान शृंगारिक व कामुक वर्णनें

माडखोलकरांच्या बऱ्याच कादंबऱ्यांतून भडक शृंगारिक वर्णनें, औचित्यभंग व सदभिरुचीचा अभाव या गोष्टी दिसून येतात असा आरोप मी स्वतः वेळोंवेळीं करीत आलों आहें. 'कांता' कादंबरीच्या परीक्षणाच्या निमित्तानें प्रथम 'लोकशिक्षण' मासिकाच्या जानेवारी १९४० च्या अंकांत हा आरोप मी स्पष्टपणें केलेला होता. 'कांता' कादंबरीनंतर गेल्या सात वर्षांत माडखोलकरांनीं सात कादंबऱ्या लिहिल्या. त्यांतहि त्यांची ही प्रवृत्ति कमी झालेली दिसत नाहीं. मधून मधून या प्रवृत्तीला पायबंद घालण्याचा ते प्रयत्न करीत असले तरी लगेच दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं ती प्रवृत्ती अगदीं उफाळून उठते व मग शृंगाराच्या सर्व छटांचा माडखोलकर अक्षरशः वर्षाव करतात. 'मुक्तात्मा' व 'भंगलेलें देऊळ' या पहिल्या दोन कादंबऱ्यांत असलीं वर्णनें नाहींत. अनिरुद्धाच्या विलक्षण भोगलालसेचें व बेछूटपणाचें भडक वर्णन करणें माडखोलकरांना शक्य नव्हतें असें नाहीं. पण, काय असेल तें असो, त्यांनीं तें केलें नाहीं एवढें मात्र खरें. स्त्रीच्या सौंदर्याच्या वर्णनावर माझा मुळींच आक्षेप नाहीं हें वाचकांनीं कृपा करून विसरूं नये. संस्कृत कवींच्या काव्यांत अक्षरशः डुंबल्यामुळें या बाबतींत जी रसिकता अंगीं यावयास पाहिजे ती माझ्याठिकाणीं ओतप्रोत भरलेली आहे. तरीसुद्धां प्रचलित वाङ्मयांतील भडक, कामुकतेला उत्तेजित करणारीं, सदभिरुचीला विघातक व औचित्यभंग करणारीं सर्व उत्तान शृंगारिक वर्णनें मी त्याज्य समजतों. वाङ्मयांत भलताच सोवळेपणा असावा असा याचा अर्थ मुळींच नाहीं. माझें म्हणणें इतकेंच कीं, आधुनिक काळीं (प्राचीन काळीं नव्हे!) सुसंस्कृतता, सदभिरुचि व औचित्य यांच्या ज्या कल्पना शिष्टसंमत असतील त्यांना कोठेंहि धक्का लागतां कामा नये. संस्कृत काव्यांत व नाटकांत इतकीं उत्तान शृंगारिक वर्णनें येतात तेव्हां तीं आजच्या मराठी ललित वाङ्मयांत

येण्यास कांहींच हरकत नसावी हें म्हणणें बालिशपणाचें द्योतक आहे. त्यावेळचा वाचकवर्ग अत्यंत मर्यादित होता. बहुतेक कवीहि राजदरबारीं असल्यामुळें दरबारी मंडळींच्या कांहीं प्रवृत्तींना रिझवावें असाहि कवींचा उद्देश असण्याचा संभव आहे. तें कांहींहि असो, संस्कृत कवींच्या वाङ्मयांतील शृंगारापेक्षां आधुनिक वाङ्मयीन शृंगार कितीतरी सोज्वळ झाला आहे. आणि तसाच तो झाला पाहिजे. लावणींतील अगदीं स्पष्ट शब्दांत वर्णिलेला उत्तान शृंगार कितीहि आकर्षक आणि काव्यमय असला तरी त्याचा सर्रास आविष्कार कादंबरी-नाटकांतून झालेला आपणांस खपेल काय ? शिवाय भाषेंत लक्षणा व व्यंजना हे जे दोन अर्थ असतात त्याचा, विशेषतः व्यंजनेचा ( suggestion ) उपयोग करून चतुर लेखकाला वाटेल त्या गोष्टी मोठ्या मोहकपणें वाचकाला पटवितां येतात. अगदीं स्पष्ट शब्दांत सांगण्याचीच जरुरी असते असें मुळींच नाहीं. विशेषतः आजच्या काळीं शिक्षण सार्वत्रिक झालें असतां व वाङ्मय हें सर्वांसाठीं असावें असें आपण आग्रहानें सांगत असतां, कोणाचीहि—स्त्रियांची अथवा मुलींचीसुद्धां—अभिरुचि दुखावणार नाहीं अशी लेखकानें खबरदारी घ्यावयास पाहिजे. वाटेल ती शृंगारिक कल्पना व्यंग्यार्थाच्या द्वारें प्रकट करतां येतें हें जर खरें असेल ( आणि ध्वनिकाव्याचीं जीं उत्कृष्ट उदाहरणें संस्कृत भाषेंत आहेत त्यांवरून हें खरें आहे हें स्पष्ट दिसतें ! ) तर आधुनिक कादंबरीकारानें उत्तान, भडक व कामुक वर्णनें मुळींच करूं नयेत आणि औचित्यभंग तर सर्वस्वीं टाळावा. या योगें लेखकाच्या वर्णन कौशल्याला बाध येईल असें कोणीहि कृपा करून समजूं नये !

‘ शाप ’ या कादंबरींत प्रथम असलें आक्षेपार्ह उत्तान आणि भडक कामुक वर्णन आलें आहे. मोलकरणीच्या अर्धविवृत शरीराचें उन्मादक सौंदर्य पाहून नायक निशिकांत वेडा होतो व तिला तो आवळतो असा हा बहारदार प्रसंग आहे. हा प्रसंग दोन तीन सूचक वाक्यांत अत्यंत परिणामकारक रीतीनें माडखोलकरांसारख्या कसबी कलावंताला सहज वर्णितां आला असता. पण तें करण्याऐवजीं त्यांनीं लच्छीच्या अर्धनग्न शरीराचें इतकें कांहीं उन्मादक वर्णन केलें आहे कीं, कोणत्याहि खऱ्या रसिक पुरुषाला थोडावेळ तरी गांगरल्यासारखेंच व्हावें. ‘ भंगलेल्या देवळां-

तील ' अनू भवभूतीच्या शृंगारांत सदभिरुचीचा अभाव आहे अशी टीका करते आणि कलेंतील संयमाचें महत्त्व वर्णन करते. (पृ. ३१-२) कलेंतील ज्या संयमाचें माडखोलकरांची मानसकन्या इतकें महत्त्व मानते व एखाद्या ठिकाणीं शृंगारवर्णनाच्या बाबतींत भवभूतीच्या हातून झालेल्या प्रमादाबद्दल त्याला दूषण देते तो संयम धुडकावून लावण्याचा प्रमाद माडखोलकर मात्र एकदाच नव्हे तर वारंवार करीत आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे! लच्छीच्या उघड्या शरीराचें अगदीं तपशीलवार वर्णन केल्यानंतर जणूं सराव झाल्याप्रमाणें माडखोलकर ' कांता ' कादंबरींत याच्याहि पुढें गेले आहेत. सौंदर्यानें मुसमुसलेल्या तरुण स्त्रीच्या अनावृत शरीराची शोभा अप्रतिम असते हें कोणालाहि अमान्य करण्याचें कारण नाहीं; आणि त्या अनावृत शरीराचें कलावंतानें वर्णन केलें तर त्यांत कोणाचें काय गेलें? पण याहि बाबतींत संयम आणि औचित्य यांचीं बंधनें पाळण्याची निश्चित जबाबदारी कलावंतावर असते. अवेळीं जर तो शृंगारवर्णनांत रमूं लागला व कारण नसतां तें वर्णन सूक्ष्म तपशील देऊन करूं लागला तर त्याच्या मनांतच एतद्विषयीं कांहीं ' गंड ' निर्माण झाला असण्याचा संभव आहे असा तर्क करण्यास कांहीं हरकत नाहीं. (कदाचित् हा एखादा गंड नसून गंडमाळाहि असण्याचा संभव आहे!) विलासोन्मुख स्त्रीच्या देहाचें व शृंगारचेष्टांचें वर्णन करणें क्षम्य आहे. पण बेशुद्ध पडल्यामुळें स्वतःचें वस्त्र सावरण्याचें जिला सामर्थ्य राहिलेलें नाहीं अशा अगतिक स्त्रीच्या उघड्या मांड्याचें, पोटऱ्यांचें, नितंबाचें व उरोभागाचें वर्णन करणें हें आक्षेपार्ह आहे असें मीं म्हटलें तर रसिक वाचक गैरसमज करून घेणार नाहींत असें वाटतें.

' मुखवटे ' कादंबरीतील रोज मोहनच्या अधीरतेचा, अतृप्ततेचा व वासनिक प्रेमाचा नुसता उल्लेख करून थांबते. विवाहोत्तर आयुष्यात त्याच्या या भोगलालसेचा जो विलक्षण ताप रोजला होतो त्याचें वर्णनहि तिनें मोठ्या सूचक रीतीनें पुढीलप्रमाणें केलें आहे—' त्या पशुत्वाची लगट असह्य झाली मला! माझ्या हृदयांतल्या पुनरपि अंकुरित झालेल्या सगळ्या कोमल भावनांचा चुराडा केला त्या पशुत्वानं '! हें मोहनच्या पशुत्वाचें वर्णन इतकें सूचक आणि संयत आहे याचें कारण तें रोजच्या

आत्मकथनांत आलेलें आहे. हें काम करण्याची जबाबदारी खुद्द माड-खोलकरांनीं आपल्या शिरावर घेतली असती तर त्या भेसूर पशुत्वाचें अगदीं तपशीलवार वर्णन करावयास त्यांनीं संकोच केला नसता असें अनुमान करावयास सबळ पुरावा आहे. कोणतीहि सभ्य स्त्री आत्मकथनांत या गोष्टी स्पष्ट करणें शक्य नसल्यामुळें मोहनच्या पशुत्वाचें वर्णन केवळ व्यंजनेंत सामावलें आहे. आणि हेंच कोणत्याहि कलावंतानें करावयास पाहिजे असें माझें मत आहे.

'नवे संसार' मधील विद्याधर ध्येयवादी, निर्व्यसनी, 'प्यूरिटन' वृत्तीचा इसम असल्यामुळें व विवाहोत्तर आयुष्यात त्याला जी प्रेयसी भेटली तीहि मिराबाईचीं भजनें डोळयांत आंसवें आणून तन्मयतेनें गाणारी व मनोभावना कधींहि उच्छृंखल न होऊं देणारी ध्येयवादिनी असल्यामुळें माडखोलकरांना या ठिकाणीं स्त्रीदेहाची अथवा स्त्रीपुरुषविलासाचीं वर्णनें करण्यास मुळींच अवसर मिळाला नाहीं ही खरोखर अत्यंत खेदाची गोष्ट आहे! पण येथेंहि एक मोका त्यांना लाभला आहे हें खरें आहे. दरवडा घालून विद्याधर अपरात्रीं एकटाच परत येतो आणि दिनकरच्या बंगल्यांत तो व मुक्ता या दोघांखेरीज तिसरें कोणीहि नसतें. अंधारांत एकाच खाटेवर ती दोघें बसलेलीं असतात. नायकाच्या व नायिकेच्या मृदु व कोमल भावना उचंबळून येण्यास ही सर्वथा अनुकूल संधि आहे. आणि नायकाचे मनोविकार अपेक्षेप्रमाणें खळबळतातहि; पण मुक्ता त्याला त्याच्या जबाबदारीची जाणीव करून देते आणि तो तिच्या 'दिव्यत्वा'ची तारीफ करीत तिचे घट्ट धरलेले हात सोडून देतो. माझ्या मतें ही एक नामी संधि माडखोलकरांनीं गमावली आहे, आणि आतां 'कांहीं तरी विशेष' वाचावयास सांपडेल अशी अपेक्षा करणाऱ्या दर्दी वाचकांची निराशा केली आहे! कदाचित् दाट काळोख असल्यामुळें त्या खाटेवर काय घडलें हें लेखकालाच दिसलें नसेल!

पण 'नवे संसार' या कादंबरींत जीं वर्णनें करण्यास माडखोलकरांना संधि मिळालेली नाहीं ती 'नागकन्या' या कादंबरींत भरपूर मिळालेली आहे. किंबहुना, याबाबतींत गेल्या दोन कादंबऱ्यांतील पात्रांच्या परिस्थितीमुळें जी संधि मिळाली नव्हती ती मिळावी व स्त्रीदेहाच्या मदिरतेची,

उन्मादकतेची, गहिरेपणाची, लोभसपणाची किंवा गोंडसपणाचीं वर्णनें अगदीं मनसोक्त करतां यावींत आणि वाचकाच्या चित्तवृत्ति तल्लीन करून त्यांना बेभान, बेचैन आणि बेहोष करतां यावें याच हेतूनें माडखोलकरांनीं ही 'नागकन्या' लिहिली आहे असें स्पष्ट म्हणावेंसें वाटतें. नाहींतर 'नवे संसार' कादंबरी लिहितांना युद्धकालीन परिस्थितीमुळें जो प्रचंड क्षोभ त्यांच्या मनाचा झाला होता व ज्याचा आविष्कार करण्याची त्यांना अगदीं विलक्षण तळमळ लागून राहिली होती तो क्षोभ व ती तळमळ अवघ्या पांच महिन्यांच्या अत्यल्प अवधींत कोठें गेली? युद्ध या सुमारास थांबलें, मन:क्षोभ नष्ट होणें शक्य झालें आणि स्वास्थ्य लाभल्यामुळें आतां जरा इष्काचें वर्णन करण्यास हरकत नाहीं असें माडखोलकरांना वाटलें! कोणता हेतु ही कादंबरी लिहिण्यांत माडखोलकरांच्या मनांत होता! माझी तर खात्री आहे कीं, असलीं उन्मादक वर्णनें तन्मयतेनें करताना माडखोलकरांच्या चित्तवृत्ति जशा कांहीं फुलून येतात व वर्ण्यविषयाशीं ते अगदीं समरस होतात, तादात्म्य पावतात!

उन्मादक विलासाचें अगदीं उत्तान वर्णन करणें हाच एक हेतु 'नागकन्या' लिहिण्यांत माडखोलकरांच्या मनांत आहे. हा सोज्वळ शृंगार नसून विलासी वृत्तीचा उन्माद आहे, ही अतिरिक्त कामुकता आहे, बेडर वैषयिकता आहे. आणि या सर्व गोष्टी कोणताहि आडपडदा न ठेवतां, व्यंग्यार्थाचा मुळींच उपयोग न करितां अगदीं स्पष्टपणें, वाच्यार्थानें लेखकानें स्वैरपणें वर्णिल्या आहेत. संयम हा कलेचा आत्मा आहे असें त्यांच्याच कादंबरींतील एक व्यक्ति म्हणते व भवभूतीच्या शृंगारातल्या सद्‌भिरुचीच्या अभावावर आक्षेप घेते. पण माडखोलकरांना हें मंजूर नाहीं असें दिसतें. आणि म्हणूनच पुरुषाच्या 'लाजऱ्या' प्रेमाची चेष्टा करणाऱ्या व 'पौरुष ही काय चीज आहे' हें पूर्णपणें अनुभविलेल्या आणि प्रीति ही तारुण्यांतील केवळ एक क्रीडा आहे असें मानणाऱ्या फिरंगी तरुणीनें व फक्त चालू क्षणाचा विचार करून पायाशीं चालून आलेल्या सुखाचा मनमुराद आस्वाद घ्यावा असें भोगवादी तत्त्वज्ञान प्रमाण मानणाऱ्या तरुणानें चांदण्यामध्यें केलेल्या स्वैर आणि बेछूट जलविहाराचें अगदीं साक्षेपानें, तन्मयतेनें व तल्लीनतेनें ते वर्णन करित आहेत. मोहाची दारू

पिऊन, सगळीं वस्त्रें दूर कांठावर ठेवून आणि चांदण्यांत चमकणारें नदीचें निळसर पाणी हेंच वस्त्र परिधान करून रमणानें रमणीशीं केलेला 'मस्त' विलास पाहण्याचें व त्यानें बेहोष होण्याचें भाग्य ज्याला लाभलें तो कृतार्थ होय !

## माडखोलकरांची कैफियत

आपल्या कादंबऱ्यांतील शृंगार अनेक वेळां अतिरिक्त असतो या आरोपाची खुद्द माडखोलकरांनाहि जाणीव आहे. १९४५ मध्यें, म्हणजे अगदीं अलिकडेच लिहिलेल्या 'दोन तपें' या आत्मचरित्रांत त्यांनीं या आरोपाचा उल्लेख केला आहे आणि आपली भूमिका मांडून त्याला उत्तर देण्याचाहि प्रयत्न केला आहे. त्यांचेच शब्द देतों. "करुणाच्या जोडीला माझ्या कांहीं कादंबऱ्यांतून शृंगारालाहि प्राधान्य मिळालेलें आहे. पुष्कळांना तो शृंगार अतिरिक्त आणि काहींना तर अश्लीलहि वाटतो...श्री. उमाकांत भेंडे यांनीं 'डाक बंगल्या'ला लिहिलेल्या प्रस्तावनेंत माझ्या कादंबऱ्यांतील शृंगाराचा अन्वय चालू युगाच्या अनुषंगानें लावून या प्रश्नाला उत्तर देण्याचा मार्मिक प्रयत्न केला आहे. पण, माझें जीवन आणि लेखन यांतील विसंवादाची संगति लावण्याचा जो हा प्रयत्न त्यांनीं केला आहे, त्यामुळें अश्लीलतेच्या आक्षेपाचा निरास होण्याऐवजीं त्यातून एक नवाच वाद निर्माण झाला आहे......पण माझ्या लेखनांत आणि जीवनांत खरोखरीच इतकी विसंगति आहे का ? स्मरणशक्ति ग्रहणक्षम झाल्या दिवसापासून ज्याच्या मनावर संस्कृत साहित्याचे संस्कार अविरत घडत आले, वयाच्या बाराव्या वर्षी ज्यानें गुर्जरशास्त्र्यांसारख्या रसिक पंडितापाशीं मेघदूताची संथा घेतली आणि तारुण्याच्या अगदीं सुरवातीला पं. रमापति मिश्रजींनीं ज्याला कुमारसंभवाच्या आठव्या सर्गातील कामदोहदाचा परमार्थ विशाद करून सांगितला, त्याला संस्कृत कवींनीं इतक्या अहमहमिकेनें आळविलेल्या रसराजाविषयीं विशेष आसक्ति असावी, यांत काय नवल ?" (पृ. २५० ).

संस्कृत साहित्याचे अविरत संस्कार वयाच्या बारा वर्षापासून मनावर घडत राहिल्यामुळें आपल्या वाङ्मयांतील अतिरिक्त शृंगार निर्माण झाला

हें माडखोलकरांचे म्हणणें मोठें मौजेचें आहे. चालू पिढी सोडून दिली तर मागील पिढ्यांतील ब्राह्मणवर्गातील मुलांना तरी संस्कृत काव्यें व नाटकें यांचें सूक्ष्म अध्ययन जवळजवळ आवश्यक असे. मराठी लेखकांच्या बाबतींत पाहिलें तरी गेल्या पिढींतील बहुतेक सारे लेखक संस्कृत काव्यांचा विपुल अभ्यास केलेलेच होते असें दिसून येईल. तेव्हां संस्कृत काव्यांचा अभ्यास हा आपल्या बाबतींत कांहीं अलौकिक प्रकार घडला असा माडखोलकरांनीं समज करून घेण्याचें कांहींच कारण नाहीं. गेल्या पिढींतील अनेक शास्त्री जसे पराकाष्ठेचे रसिक होते तसेच संस्कृत साहित्याचा व्यासंग केलेले कित्येक नवशिक्षित मराठी लेखकसुद्धां पराकाष्ठेचे रसिक होते. आजहि त्यांची परंपरा आपल्याला दिसून येईल. पण संस्कृत काव्यांतील व नाटकांतील अतिरिक्त शृंगाराचें रसिकतेनें वाचन करणें व तत्सदृश किंवा तदतिरिक्त शृंगार आतां या घटकेला मराठी कादंबऱ्यांत आविष्कृत करणें या दोन गोष्टी अत्यंत भिन्न आहेत. बरेचसे संस्कृत कवि मूलत: शृंगारपंथांतीलच आहेत. कालिदासासारखे थोर कवि तर निसर्गावरसुद्धा स्त्रीत्वाचा आरोप करून मोठ्या रसिकतेनें नैसर्गिक दृश्याचें वर्णन करीत असतात हें मेघदूतांतील अनेक उदाहरणांवरून स्पष्ट होईल. पण तो काळ निराळा आणि आजचा काळ निराळा. आज त्या पद्धतीचें वर्णन सदभिरुचिला दंश करणारेंच वाटेल. ' ज्ञातास्वादो विवृतजघनां को विहातुं समर्थः ? ' या पंक्तींतील वाच्यार्थानें व्यक्त झालेली कामुकता कितीहि आकर्षक असली तरी त्याच प्रकारच्या वाच्यार्थानें ती मराठींत प्रकट होणें युक्त नाहीं असें मला वाटतें. त्या काळीं या थोर कवींनीं असें कां लिहिलें आणि तसें कां लिहिलें नाहीं हें विचारण्याचा विसाव्या शतकांतील टीकाकारांना कांहीं एक अधिकार नाहीं. त्या काळाचा तो गुण असेल !

' वरील परिच्छेदाच्या शेवटच्या वाक्यानें एका निराळयाच मुद्द्याची मला आठवण झाली. संस्कृत कवींच्या काळाचाच गुण असा असेल असें म्हटल्याबरोबर कोणी एखादा रसिक म्हणेल कीं, या काळाचा असाच गुण असल्यामुळें माडखोलकरांसारखे प्रतिभाशाली लेखक ही गोष्ट लक्षांत घेऊनच आपले वाङ्मय लिहीत असावेत. निराळया शब्दांत सांगावयाचें झालें तर, अतिरिक्त शृंगार, अनुचित शृंगार, अस्थानीं शृंगार व अवेळीं

शृंगार याविषयींची प्रचलित काळांतील स्त्रीपुरुषांची आवड इतकी वाढली आहे कीं, असल्या लोकांनीं भरलेल्या आपल्या समाजांतील आज-च्या कादंबरीकारांनीं अतिरिक्त शृंगाराला आपल्या लेखनांत फार महत्त्वाचें स्थान दिलें तर त्यांत बिघडलें काय ? असें या प्रश्नाचें स्वरूप आहे. हें किंचित् स्पष्ट केलें पाहिजे. एखाद्या विशिष्ट काळांतील वाङ्मय असें कां आणि तसें कां नाहीं याचें उत्तर त्या काळातील विविध प्रवृत्तींत सापडतें असें आपण नेहमीं म्हणतों. मग, प्रस्तुत काळांतील लोकांच्या प्रवृत्तीच जर बिघडलेल्या असल्या, लोकांनाच जर कामुक वर्णनें आवडत असलीं, औचित्यभंग आवडत असला आणि त्या प्रवृत्तींचा आविष्कार माडखोल-करांसारख्यांच्या कादंबऱ्यांत झाला असला तर तो त्यांचा दोष नसून ज्या काळांत ते लिहीत आहेत त्या काळाचाच तो दोष आहे. आणि माडखोल-करांचे मित्र श्री. भेंडे यांनीं नेमकें हेंच विधान करून माडखोलकरांचा पाठपुरावा केला आहे. श्री. भेंडे याचें म्हणणें काय आहे तें आतां पाहिलें पाहिजे.

## जगच आतां असें होत चाललें आहे ?

‘ डाकबंगला ’ या कादंबरीला श्री. उमाकांत भेंडे यानीं एक प्रस्तावना लिहिली आहे. या प्रस्तावनेंत श्री. भेंडे यांनीं माडखोलकरांच्या उत्तान शृंगारिक, क्वचित् अश्लील असलेल्या वर्णनांचा पाठपुरावा करण्याचा प्रयत्न केला आहे. श्री. भेंडे याचें लिहिणें apology च्या धर्तीचें वाटतें. त्यानीं माडखोलकरांचें उघड उघड वकीलपत्र घेतलें असलें तरी माडखोल-करांवरील आरोपांचें पूर्ण निरसन त्यांना करतां आलें नाहीं—व तें शक्यहि नाहीं—असें म्हणावेसें वाटतें.

“Probably the age is vulgar, so we are vulgar” हें श्री. भेंडे यांच्या एका मित्रानें प्रचलित जगासंबंधीं काढलेले उद्गार श्री. माडखोलकरांच्या कादंबऱ्यांच्या बाबतींतहि खरे आहेत असें त्यांना वाटतें. सध्याचें जगच बिघडलें आहे हें जर खरें असलें तर कादंबऱ्यांतून त्याच बिघडलेल्या जगाचें चित्र आलें तर तें अपरिहार्यच नाहीं का ? असा श्री. भेंडे यांच्या एकंदर विवेचनाचा रोख दिसतो. त्यांच्या वर उल्ले-

खिलेल्या मित्राचे मुख्य मुद्दे असे—आजच्या तरुणांना व तरुणींना जीवनाबद्दल जास्त आकर्षण वाटतें. शारीरिक वासना व मनोविकार यांना बळेंच दडपून टाकण्यापेक्षां त्यांना अवसर देणें बरें असें त्यांना वाटतें. आणि यामुळेंच तरुण व तरुणी परस्परांजवळ येणें शक्य होत आहे. स्त्री-पुरुषांनीं एकमेकांपासून दूरदूर राहणें ( sex-isolation ) व विषयवासनांचें निर्दालन करणें ( sex-suppression ) या जुनाट कल्पनांना ही नवीन तरुण मंडळी झुगारून देत आहेत. मनोविकार दडपून, मन मारून शरीराचा सत्यानाश करणें त्यांना मंजूर नाहीं. शरीराची भूक ' योग्य प्रमाणात ' भागविणें हीच गोष्ट हितावह आहे असें त्याना वाटूं लागलें आहे. तात्पर्य, श्री. भेंडे याच्या मित्राच्या मताप्रमाणें, ' लैंगिक गोष्टींकडे बघण्याचा तरुण पिढीचा दृष्टिकोन बदलत चालला आहे. ' स्त्री व पुरुष यांच्या नग्न चित्रांत कांहीं विशिष्ट अवयवांवर आच्छादन घालण्याऐवजीं त्यांचें भरदार, भरघोस चित्रण करणें याला काहीं मंडळी ' वास्तवता ' असें नांव देतात. श्री. भेंडे याचें म्हणणें असें कीं, असल्या ' वास्तव ' चित्रांप्रमाणेंच माडखोलकरांच्या काहीं कलाकृति ' आधुनिक ' ( modern ) अतएव रूढ भाषेंत 'अश्लील' ( vulgar ) आहेत. श्री. भेंडे पुढें म्हणतात, " हें युगच असेल कदाचित् अश्लील, म्हणून श्री. माडखोलकर हे अश्लील लिहितात. ज्या युगांत त्याचा जन्म झाला आहे, या युगाचे प्रातिनिधिक असेंच वाङ्मय त्याच्या हातून निर्माण होणार, होत आहे."

श्री. भेंडे यांचा चालू युगावरच मोठा आक्षेप आहे. त्यांना हें युगच अश्लील असेल असें वाटतें. ' कदाचित् ' असा शब्द त्यांनीं वापरला आहे. यावरून याविषयीं त्यांना खात्री वाटत नसावी असें वाटतें. हें युगच अश्लील झालें आहे असें जेव्हां भेंडे म्हणतात तेव्हां त्यांना कोणता समाज अभिप्रेत आहे ? संपन्न व ऐश्वर्यशाली लब्धप्रतिष्ठितांचा समाज त्यांच्या डोळ्यांसमोर आहे कीं सर्वच समाज त्यांच्या डोळ्यांसमोर आहे ? स्वत:ला उच्च मानणाऱ्या, वैभवशाली व स्वास्थ्यांत असलेल्या समाजाविषयीं श्री. भेंडे यांचें हें म्हणणें असेल तर तें बहुंशीं बरोबर आहे. कारण, जीवनकलहाची यत्किंचितहि तिरीप न लागल्यामुळें व खरें जग कोणत्या प्रकारचें आहे याची थोडीसुद्धां जाणीव नसल्यामुळें केवळ हातीं

असलेल्या अमर्याद ऐश्वर्याच्या जोरावर समाजाच्या आकांक्षांची व दुःखांची मुळींच पर्वा न करितां व त्याची झळ स्वतःला मुळींच लागूं न देतां हे लब्धप्रतिष्ठित लोक सर्व प्रकारच्या विलासांचा, चैनींचा व अनैतिक आचरणाचा अक्षरशः अतिरेक करीत असतात. या बाबतींत नुसताच अतिरेक करून हे लोक थांबत नाहींत तर आपलीं सारीं विलसितें सर्वांनीं पहावींत अशी त्यांची विचित्र इच्छा असते. यालाच अर्वाचीन परिभाषेंत 'exhibitionism' म्हणतात. या भोगवादी लोकांनीं स्वतःच्या आचरणाच्या समर्थनाचें एक 'टेक्निक' बनविलेलें असतें, आणि आपण म्हणजेच सारें जग अशी ते सर्वांची समजूत करून देत असतात. खऱ्या अर्थानें vulgar जर कोणी असतील तर ते याच समाजांतील लोक होत! श्री. भेंडे यांनीं या समाजाला बेलाशक vulgar म्हणावें. साराच समाज किंवा सारेंच युग अश्लील झालें आहे असें म्हणणें आणि सारें जगच आतां वेश्यागमनी व मद्यपी झालें आहे असें म्हणणें एकाच प्रकारचें आहे. म्हणून, माडखोलकरांचें वाङ्मय या युगाचें किंवा सर्व समाजाचें प्रातिनिधिक आहे असें मानणें अन्यायमूलक आणि अत्यंत धाष्टर्याचे आहे. कोणत्या समाजांतील लोकाचीं चित्रें माडखोलकरांनीं रंगविलीं आहेत हें श्री. भेंडे यांनीं जरा काळजीपूर्वक पाहिलें असतें तर सर्व जगाविषयीं आणि सर्व युगाविषयीं बोलण्याचा त्याना धीर झाला नसता. ज्यांचीं सारीं आयुष्यें भोगवादी तत्त्वज्ञानानें प्रेरित झालीं आहेत व उन्मत्त विलास करणें आणि बेछूटपणें वागणें हेंच ज्यांच्या जीविताचें सारसर्वस्व आहे अशा ज्या व्यक्ति माडखोलकरांच्या निरनिराळ्या कादंबऱ्यांतून आल्या आहेत त्यांची जात तरी कोणती आहे हें पाहणें मनोरंजक ठरेल. 'मुक्तात्मा' कादंबरींतील प्रेमाबाई अथवा मादाम द स्ताअल, प्रो. राळे, रावसाहेब भुजंगराव; 'भंगलेल्या देवळां'तील अनिरुद्ध, 'कांता' कादंबरींतील राधामोहन; 'मुखवटे' कादंबरींतील मोहन; 'दुहेरी जीवन' मधील मुकुंद; 'नवे संसार' या कादंबरींतील भय्यासाहेब, व पंपूशेठ; 'नागकन्या' या कादंबरींतील रंगा आणि मदिया; आणि 'डाकबंगला' या कादंबरींतील रतिलाल या व्यक्ति कोणत्या समाजांतील आहेत! अत्यंत उच्च गणल्या गेलेल्या संपन्न वर्गांतीलच अथवा त्यांच्या जातभाईंच्या

वर्गांतीलच हीं सारीं माणसें नाहींत काय ! हीं माणसें चालू युगाचीं अथवा सर्व समाजाचीं खऱ्या अर्थानें प्रतिनिधि आहेत असें सिद्ध करण्याचा कोणी प्रयत्न करून पाहील काय ? माडखोलकरानीं आपल्या कलाविलासासाठीं हींच पात्रें निवडलीं आहेत. समाजांत हीं पात्रें सर्व काळीं असतात हें अगदीं खरें असलें तरी, त्यांना कांहीं कोणी सर्व समाजाचें प्रतिनिधित्व बहाल करण्याचें कौतुकास्पद काम करीत नाहींत. तात्पर्य असें कीं, चालू युगांतील जगाचा जो भाग माडखोलकरांनीं निवडलेला आहे तो भाग अथवा तो समाज केवळ एका विशिष्ट वातावरणांत आणि परिस्थितींत वावरणाऱ्या लोकांचाच आहे. आणि या विशिष्ट समाजांतील लोकाचे सारे दुर्गुण, त्यांचे सारे दुराचार, त्यांची सारी भोगलोलुपता, त्यांची सारी दांभिकता व कृत्रिमता, त्याचें दुहेरी जीवन, त्यांचे मुखवटे आणि त्यांची सारी व्हल्गॅरिटी किंवा अश्लीलता किंबहुना ग्राम्यता या सर्व गोष्टी माडखोलकरांच्या कादंबऱ्यांत अगदीं ओतप्रोत भरल्या आहेत. माझें म्हणणें असें कीं, माडखोलकरांना चालू युगाचे प्रतिनिधि म्हणणें आणि त्यांच्या कादंबऱ्यांतील अनेक विकृत प्रवृत्तींचा, अतिरिक्त शृंगाराचा, भोगलोलुपतेचा, उन्मत्त विलासांचा साऱ्या समाजावर आरोप करणें ही गोष्ट मुंबईचे लाखोपती गिरणीवाले साऱ्या समाजांचे प्रतिनिधि आहेत आणि त्यांची सारीं दुश्चरितें साऱ्या समाजाचीं प्रातिनिधिक आहेत असें म्हणण्याइतकीच हास्यास्पद नाहीं काय !

खरा समाज जो कांहीं आहे त्याच्या जीवनाचें दर्शन माडखोलकरांना कधींहि झालें नाहीं आणि होणारहि नाहीं. कारण, तें करून घेण्याची त्यांना तळमळच नाहीं. निदान त्या अफाट समाजाची माडखोलकरांनीं दुरून कां होईना ओळख करून घेतली असती तर त्यांच्या दुःखांचा आपणांस थोडासुद्धां परिचय नाहीं हें त्यांना तावडतोब कळून आलें असतें. अनेक कारणांमुळें आणि अनेक मर्यादांमुळें हें काम करणें माडखोलकरांना शक्य झालें नसेल हें मी मान्य करतों. पण, आपण जीं चित्रें काढलीं आहेत, ज्या घटना वर्णिल्या आहेत आणि ज्या व्यक्ति निर्मिल्या आहेत त्यांच्यापैकीं जवळजवळ सर्वच चित्रें, घटना आणि व्यक्ति जगाच्या एका कोप-

ऱ्यांतील अत्यंत लहान भागांतील असून त्यांचा त्याबाहेरील अफाट जगाशीं फारच थोडा संबंध आहे येवढें तरी त्यांनीं मान्य करावें. हें त्यांनीं मान्य केलें तर पुष्कळसे आक्षेप नाहींसे होतील. पण, स्वत:स उच्च समजणाऱ्या स्वास्थ्यप्रिय, संपन्न व विलासी लोकांना केवळ परिस्थितीच्या अनुकूलतेमुळें जो उन्मत्त विलास करतां येतो व जें भोगवादाचें तत्त्वज्ञान कृतींत उतरवितां येतें तेवढ्याचेंच वर्णन आपण करितो आणि विशाल समाजाच्या विविध दु:खाशीं आणि आकांक्षाशीं आपला खऱ्या अर्थानें फार थोडा संबंध आहे हें माडखोलकरांनीं मान्य केलें तर मग ते चालू युगाचे प्रतिनिधि आहेत, चालू युगच अश्लील असल्यामुळें ते अश्लील लिहितात, यांत त्याचा दोष नसून चालू युगाचाच तो दोष आहे इत्यादि विधानें श्री. भेडे याना मुळींच करता यावयाची नाहींत. थोडें काळजीपूर्वक पाहिलें तर भोगवादी तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करणाऱ्या व अतिरिक्त शृंगार करणाऱ्या ज्या व्यक्ति माडखोलकरांच्या कादंबऱ्यांत आपणांस अनेक वेळां भेटतात त्या साऱ्या एका विशिष्ट आणि मर्यादित जगांतील आहेत हें कोणीहि कबूल करील. तात्पर्य, चालू युगाच्या साऱ्या दोषांचा माडखोलकरांच्या कादंबऱ्यांत आविष्कार झाला असून ते चालू युगाचे प्रतिनिधि आहेत या बोलण्यांत कांहींहि मतलब नाहीं.

बरें, सारेंच जग, माडखोलकरांच्या कादंबऱ्यात वर्णिल्याप्रमाणें, अतिरिक्त शृंगारिक, दांभिक, कृत्रिम, अनैतिक किंबहुना अश्लील बनलेलें आहे असें श्री. भेंडे यांच्या संतोषासाठीं क्षणभर मान्य केलें तरी कांहीं प्रश्नांचीं उत्तरें त्यांनीं दिलींच पाहिजेत. सारें जग अशा प्रकारें विकृत मनोवृत्तींनीं युक्त झालें आहे ही गोष्ट केवळ अपरिहार्य म्हणून नाइलाजानें पत्करावयाची, कीं झालें तें चांगलें झालें आहे, त्यांत आक्षेपार्ह असें कांहींहि नाहीं, हें असेंच व्हावयास पाहिजे, असें झालें तरच समाजाची खरी प्रगति होईल असें मानावयाचें व समाजालाहि तसेंच सांगावयाचें? यांतील कोणती भूमिका श्री. माडखोलकर अथवा त्यांचे वकील श्री. भेंडे यांना मान्य आहे? जर हें सारेंच जग खरोखरच विलासप्रिय, भोगवादी, दुराचरणी, ग्राम्य, अनैतिक, भावनाशून्य, वासनामय झालें असेल आणि तसें तें होऊं नये असें कलावंताला मनापासून वाटत असेल तर त्या विकृत

जगाला शक्य तितकें सुधारण्याचा, त्याला कांहीं चांगली ध्येयें दाखविण्याचा, थोड्या मर्यादेंत कां होईना त्याला माणुसकी शिकविण्याचा प्रयत्न आपल्या कुवतीप्रमाणें त्यानें करावा, कीं 'गोष्टी अशाच घडत असतात' या महामंत्राची ढाल पुढें करून केवळ त्या गोष्टींचें कलात्मक वर्णन करून स्वस्थ बसावें ? असलीं विकृत माणसें व असलीं विलासी दृश्यें रंगविण्याचा लेखकाचा कोणता निश्चित हेतु आहे हें पहावयास नको काय ? त्याचप्रमाणें, त्या लेखनाचा सर्वसामान्य वाचकांच्या मनावर कोणता परिणाम होणें शक्य आहे हेंहि पहावयास नको काय ? 'जगात असें घडतें हें खरें आहे, त्याचें मी वर्णनहि केलें आहे, पण तें घडूं नये असेंच मला वाटतें, व मीं जें कांहीं वर्णिलें आहे त्याच्याविषयीं वाचकाला ममत्व न वाटतां त्यांतील त्याज्य व आक्षेपार्ह भाग त्याच्या निश्चितपणें लक्षात यावा हाच माझा हेतु आहे' असें लेखकाचें मन त्याला स्पष्टपणें सांगत असल्यास विकृत मनोवृत्तीच्या माणसांचें, त्यांच्या दुराचरणांचें, त्यांच्या भोगवादाचें, त्यांच्या अतिरिक्त बदफैलीपणाचें अथवा अतिरिक्त शृंगाराचें वर्णन केलें तरी त्यांत आक्षेपार्ह असें काहींच नाहीं. पण, आता मी स्पष्टपणेंच विचारतों—अनेक भोगलोलुप व बदफैली माणसांचीं चित्रें माडखोलकरांनीं रंगविलीं आहेत, त्यांच्या आयुष्यांतील अनेक भडक घटनांचें वर्णन त्यांनीं केलें आहे. हें वर्णन करण्यांत माडखोलकरांचा कोणता हेतु आहे ? वाचकांनीं त्या माणसांचा तिरस्कार करावा व त्या घटनांचा त्यांना संताप यावा अशी त्यांनीं स्पष्टपणें योजना केली आहे काय ? 'नागकन्या' अथवा 'डाकबंगला' या कादंबरींतील विलासी घटना वर्णन करितांना कोणता हेतु माडखोलकरांच्या मनांत होता ? लच्छीच्या उघड्या अंगाचें वर्णन करितांना कोणता हेतु होता ? बेशुद्ध पडलेल्या विजयेच्या उघड्या मांड्यांचें व वक्षःस्थळाचें वर्णन करण्यांत त्यांचा कोणता हेतु होता ? 'दुहेरी जीवन' मधील मुकुंदानें केलेल्या जलविहाराचें वर्णन करण्यात त्यांचा कोणता उद्देश होता ? या साऱ्या प्रश्नांचीं उत्तरें आम्हांला अगदीं निःसंदिग्धपणें पाहिजे आहेत. तीं माडखोलकरांनीं द्यावींत अथवा योग्य माहिती मिळालेल्या त्यांच्या एखाद्या 'फ्रीडरा'नें द्यावींत !

## अहो त्यांच्यांत कसलीहि विकृति नाहीं !

सध्यांचें सारेंच जग अश्लील झाल्यामुळें माडखोलकरांच्या कादंबऱ्यांतहि अश्लीलता अथवा अतिरिक्त शृंगार या गोष्टी दिसून आल्या तर तो दोष त्यांचा नसून चालू युगाचा तो दोष आहे असा श्री. भेंडे यानीं जो 'डिफेन्स' दिला आहे त्याचा विस्तृत परामर्श घेऊन त्यांतील कच्चे दुवे वर दाखविले आहेत. पण येवढ्यानें भागत नाहीं. श्री. भेंडे यांनीं आणखी एक अभिनव विषयाचा उपन्यास केला आहे व हा विषयहि फार महत्त्वाचा आहे. ते म्हणतात, " त्यांचे ( म्हणजे माडखोलकरांचे ) आचारविचार, राहणी, आवडीनिवडी, आशाआकांक्षा, विकारवासना यांचें मी फार काळजीपूर्वक अवलोकन केलें आहे. मला त्याच्यांत 'मनोविकृति' कधींहि आढळली नाहीं. रंगेलपणाहि त्यांच्यांत दिसला नाहीं. आणि sex-obsessed तर ते नाहींतच नाहींत. अर्थात् सर्वसाधारण माणसांतील दोष, गुण, आसक्ति, आवडी, वासना, विकार त्यांच्यांतहि आहेत. पण कोणत्याहि प्रकारें ते abnormal नाहींत. म्हणून मला पुन्हा एका म्हणावेसें वाटतें कीं, त्यांच्या वाङ्मयांत जर अश्लीलता असेल, तर तो त्यांचा दोष नाहीं; ते ज्या युगांत जन्माला आले आहेत त्या युगाचा तो दोष आहे " ( ' डाकबंगला,' प्रस्ता. पृ. ११ ),

'My lady protests too much ' अशी जी इंग्रजींत म्हण आहे तिचें प्रात्यक्षिक श्री. भेंडे यांच्या वरील उद्‌गारांत दिसून येईल. श्री. भेंडे यांना माडखोलकरांमध्यें कोणतीच विकृति आढळली नाहीं. नसेलहि कदाचित् ! पण श्री. भेंडे इतकें आवर्जून कां सांगत आहेत आम्हांला हें ? माडखोलकरांमध्यें विकृति आहे असें म्हणावयाचा आम्हांस अधिकारच काय ? आमचें म्हणणें इतकेंच कीं, माडखोलकरांच्या कादंबऱ्यांतील अतिरिक्त शृंगाराचीं स्थळें अगदीं काळजीपूर्वक पाहिलीं तर असें दिसून येतें कीं, हा भडक शृंगार आहे, विकृत शृंगार आहे, sex-obsessed लोकांचा शृंगार आहे, नॉर्मल लोकांचा कांहीं हा शृंगार नाहीं ! कांहीं तरी विशेष मस्त पौरुषानें उफाळलेल्या लोकांचा हा तितकाच मस्त शृंगार आहे. ज्यांची भोगलालसा प्रतिक्षणीं वाढतच जाते, कधींहि कमी म्हणून होत

नाहीं, भरपूर खाद्य मिळालें तरी कमी होत नाहीं, ' हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ' या वचनाप्रमाणें जिचा तोरा सारखा वाढतच जातो अशा कामवासनेनें बेचैन झालेल्या, भ्रमिष्ट झालेल्या लोकांचा हा शृंगार आहे. आणि यालाच मी विकृत शृंगार म्हणतो ! आणि याच कारणामुळें ' दुहेरी जीवन ' मधील मुकुंदाला मागें मी ' डॉन जुअन ' ही पदवी दिली होती; किंबहुना, चिडून जाऊन माडखोलकरांच्या कांहीं व्यक्तींना ' लिंगपिसाट ' हीहि रास्त पदवी मीं दिली होती. माझा प्रश्न असा कीं, सोज्ज्वळ शृंगार करणाऱ्या रसिक लोकांचीं वर्णनें न करितां अनिरुद्ध, मुकुंद, मोहन, मदिया, रंगा, रतिलाल इत्यादि अतिरिक्त भोगलालसेनें युक्त असलेल्या व्यक्तींचाच भरणा माडखोलकरांनीं आपल्या कादंबऱ्यांत कां केला आहे ? सर्वांचाच शृंगार एकाच पद्धतीचा नाहीं कां ? त्यांत कोणती ' व्हरायटी ' आहे ? कोणतीहि नाहीं ! आणि म्हणूनच हे लोक ' ॲब्नॉर्मल ' आहेत, किंबहुना त्यांतील कांहीं तर 'मॉर्बिड' आहेत असें म्हणण्याचा मोह माझ्यासारख्याला झाला तर त्यांत कांहीं नवल नाहीं !

आतां, माडखोलकर स्वत: ' ॲब्नॉर्मल ' नाहींत, ' सेक्सऑब्सेस्ड ' नाहींत, आणि म्हणून त्यांच्या वाङ्मयातहि कसलीच विकृति नाहीं या श्री. भेंडे यांच्या विधानांत यत्किंचित् दम नाहीं हें सिद्ध करणें अत्यंत सोपें आहे ! लेखकांत रंगेलपणा नसला, तो गुलछबू नसला, तो इष्काची शिकार करावयास टपलेला शिकारी नसला, व्यवहारांत तो अगदीं साधाभोळा व सोज्ज्वळ असला, प्रेमाच्या रंगेल छटा उडविण्याच्या बाबतींत तो लाजाळू असला, किंबहुना पराकाष्ठेचा कर्मठ असला म्हणजे त्याचें शृंगारिक वाङ्मय त्याच्यासारखेंच लाजाळू, साधेंभोळें, सोज्वळ असेल असा भरंवसा कोणालाहि देतां येणें शक्य नाहीं. मानसशास्त्राचा आणि मनोविश्लेषणशास्त्राचा आधार घ्यावयास हरकत नसेल (सायको-अॅनॅलिसिसच्या शत्रूंनीं मला माफ करावें ! ) तर, रंगेलपणाचा ज्यांच्यांत पूर्ण अभाव दिसतो अशीं कर्मठ माणसेंच वासनानिरोधामुळें ( repression ) अनेक वेळां पराकाष्ठेचीं रंगेल माणसें जें बोलणार नाहींत अथवा जें लिहिणार नाहींत तें बोलून जातात व लिहून जातात. माडखोलकरांच्या बाबतींत नेमकें हेंच झालें असावें असें मला वाटतें, नव्हे अशी माझी खात्री

आहे ! नाहीं तर अंतर्यामीं टणक असलेल्या पण स्पर्शाला मऊ असलेल्या रसरशीत ताज्या नारिंगाप्रमाणें वाटणाऱ्या उरोजांच्या टचटचीत अग्रांच्या बोचक स्पर्शाचें त्यांनीं इतकें रसपूर्ण व भावपूर्ण वर्णन घोळून घोळून केलेंच नसतें ! ' रसरशीत नारिंग, ' ' गुलाबाच्या दाठर कळ्या ' ' टचटचीत अग्रें ' ' बोचक स्पर्श ' इत्यादि शब्दसमुच्चयांपैकीं प्रत्येक शब्दसमुच्चय पराकाष्ठेचा उन्मादक, उत्तेजक व उद्दीपक आहे हें कोणीहि ' पुरुष ' सांगेल ! एकच उदाहरण नाहीं असलें. बेशुद्ध पडून हवालदिल झालेल्या विजयेच्या केळीच्या गाभ्याप्रमाणें गोऱ्यापान पुष्ट मांड्यांवरील पातळ बाजूला सरल्यामुळें दिसणाऱ्या दृश्याचें व ब्लाउजच्या गुंड्या सुटल्यामुळें व आंत बॉडीस नसल्यामुळें उघड्या पडलेल्या तिच्या वक्षःस्थळाच्या व स्तनांच्या शोभेचें त्यांनीं असलेंच उद्दीपक व उत्तेजक वर्णन केलें आहे. रंगराव व मदिया यांनीं पाण्यांत नग्न अवस्थेंत केलेल्या अजब क्रीडेविषयीं तर बोलावयासच नको ! या क्रीडेचें सारेंच वर्णन विलक्षण उत्तेजक, उद्दीपक व ' कार्यप्रवण ' करणारें आहे हें कोणीहि ' समजूतदार ' पुरुष नाकबूल करील असें वाटत नाहीं !

आतां अडचण कशी निर्माण झाली आहे पहा ! व्यवहारांत माडखोलकरांत ' रंगेलपणाहि ' दिसत नाहीं अशी ग्वाही त्याचे वकील मित्र देतात आणि कादंबऱ्यांत मात्र वर वर्णिलेल्या नमुन्याच्या शृंगाररूपी ओढ्याचा अवखळ खळखळाट चाललेला आहे ! या विसंगतीचा अन्वय आणि अर्थ कसा लावावयाचा ? श्री. भेंडे यांनीं माडखोलकरांची जी धूर्त ' वकिली ' केली आहे तिच्यांतून ही भलतीच आफत उत्पन्न झाली आहे. आणि खुद्द माडखोलकरांच्याहि लक्षांत ही गोष्ट आलेली आहे याचा पुरावाहि उपलब्ध आहे. ' दोन तपें ' या आत्मचरित्रांत पृष्ठ २५० वर माडखोलकर म्हणतात, " पण, माझें जीवन आणि लेखन यांतील विसंवादाची संगति लावण्याचा जो हा प्रयत्न त्यांनीं ( श्री. भेंडे यांनीं ) केला आहे, त्यामुळें अश्लीलतेच्या आरोपाचा निरास होण्याऐवजीं त्यांतून एक नवाच वाद उपस्थित झाला." खरें म्हणजे श्रीं. भेंडे यांनीं या विसंवादांत संगति लावण्याचा प्रयत्नच करावयास नको होता. तत्त्वज्ञानांत ज्याला (antinomy) किंवा अपरिहार्य विसंगति म्हणतात तसली विसंगति व्यवहारांतहि अनेक

वेळा दिसून येतेच कीं ! लेखकाचें व्यक्तिगत जीवन व त्याच्या वाङ्मयांतील प्रवृत्ति यांमधील असल्या विचित्र विसंगतीचें एक गमतीचें उदाहरण प्रख्यात फ्रेंच लेखक आंद्रे मोर्वा यांनें आपल्या *Ariel* या पुस्तकांत दिलें आहे. उदाहरण प्रख्यात इंग्लिश कवि बायरन याचें आहे. बायरनचें सारेंच आयुष्य विलक्षण भोगलालसेनें व बेछूट विलासांनीं भरलेलें होतें हें सर्वांना ठाऊक आहे. स्त्रियांना एखाद्या खेळण्यापलिकडे त्यानें कधींच किंमत दिली नाहीं; त्या केवळ उपभोग्य वस्तु आहेत असें तो स्पष्टपणें म्हणत असे. प्रत्यक्ष लग्नाच्या बायकोला लग्नानंतर थोड्याच वेळांत त्यानें कोणतें प्रेमकाव्य ऐकविलें होतें याचा मागें उल्लेख येऊन गेलेलाच आहे. इंग्लंडनें त्याला हद्दपार केलें होतें; इंग्लिश समाजांत त्याला मानाचें राहिलेंच, पण कसलेंच स्थान उरलें नव्हतें; समाजानें त्याचा भयंकर अपमान केला होता. पण, इतकें असूनहि, सामाजिक मानमान्यतेइतकी दुसरी कोणतीच गोष्ट त्याला आदरणीय वाटत नसे. तो स्वत: जातिवंत बदफैली होता; पण नीतिनियमांनीं मान्यता दिलेल्या सोज्वळ प्रेमालाच तो मान देत असे. आंद्रे मोर्वाचें शब्दच देतों—" Banished frm society, he valued nothing so much as social success. A bad husband, it was only to legitimate love that he paid respect. " तात्पर्य, बायरनचें प्रत्यक्ष जीवन व त्याचीं मतें अथवा त्याचें वाङ्मय यांतील विसंगतीप्रमाणेंच माडखोलकरांचें सोज्वळ, रंगेलपणाचा अभाव असलेलें नॉर्मल जीवन आणि त्यांच्या वाङ्मयांतील ॲब्नॉर्मल, बेछूट, भडक, उत्तान आणि उद्दीपक शृंगार यांतील विसंगति समजावी. बायरनच्या बरोबर उलट माडखोलकरांचें उदाहरण आहे इतकेंच !

## सफल न झालेलीं स्वप्नें आणि कला

मी तर आणखी पुढें जाऊन असें म्हणतों कीं, व्यवहारांत माडखोलकर खरेखुरे रंगेल असते तर फार बरें झालें असतें. त्यांची प्रवृत्ति जर रंगेल असती तर त्यांच्या कादंबऱ्यातील शृंगाराचे प्रसंग एखाद्या वेळीं जरी अमर्याद होण्याच्या बेतांत आले असते तरी ते भडक, उत्तान आणि उद्दीपक झाले नसते. माडखोलकर रंगेल नाहींत म्हणूनच या प्रसंगांत विकृ-

तीची छटा दिसत आहे. श्री. भेंडे यांनीं माडखोलकरांच्या रंगेलपणाच्या अभावाचा उल्लेख केला हें फार चांगलें झालें. कादंबऱ्यांत माडखोलकर असें कां लिहितात याचा चटकन उलगडा झाला. थोडक्यांत सांगावयाचें झालें तर, कादंबऱ्यांतील उद्दीपक आणि उत्तेजक शृंगारवर्णनाचे प्रसंग हें माडखोलकरांचें ‘स्वप्नरंजन’ आहे! अंगीं रंगेलपणा नसल्यामुळें ज्या गोष्टी प्रत्यक्षांत कृतींत उतरविणें त्यांना अशक्य होत असेल, परंतु त्यांचा अनुभव असावा असें तर त्यांना सारखें वाटत असेल त्या गोष्टी कलेच्या द्वारें व्यक्त झाल्या नाहींत तरच आश्चर्य आहे! कलेचें कार्य कोणतें याविषयीं ‘शाप’ कादंबरींतील नायक निशिकांत यानें जें विवेचन केलें आहे तें प्रस्तुत प्रकरणीं फार उद्बोधक ठरेल असें वाटतें. खरा कलाविलास हा आत्मप्रतीतीसाठीं असतो असें सांगून निशिकात यावर पुढीलप्रमाणें भाष्य करीत आहे. “आपल्या मनांतल्या ज्या आकांक्षा आणि आंदोलनें रोजच्या व्यवहारांतल्या शब्दांनीं आणि क्रियांनीं आपल्याला व्यक्त करितां येत नाहींत तीं प्रकट करण्यासाठीं कला आहे......दडपून टाकलेलीं दुःखं, आवरून धरलेले अश्रु, अपुऱ्या राहिलेल्या आकांक्षा, सफल न झालेली स्वप्नं यांची सारी आर्तता, सौंदर्य आणि ओज कला प्रकट करते.” (पृ. ९७) कलेचें जें कार्य निशिकांतानें येथें विस्तारानें सांगितलें आहे तें माडखोलकरांनाहि मान्य आहे हें प्रत्यक्ष त्यांच्या कलकृतींवरून अगदीं स्पष्ट दिसत आहे. ‘नागकन्या’ ही कादंबरीं सर्व अर्थीनीं स्वप्नरंजनात्मक आहे; ‘डाकबंगला’ हेंहि स्वप्नरंजनच आहे; १९४२ च्या भयंकर राजकीय चळवळीच्या पार्श्वभूमीवरच सर्वस्वीं आधारलेल्या ‘प्रमद्वरा’ या कादंबरींतहि विलक्षण स्वप्नरंजन आहे. स्वतः माडखोलकर या कादंबरीच्या प्रस्तावनेंत लिहितात— “**वास्तविक ही कथा नव्हे, आणि कादंबरी तर नव्हेच नव्हे. हें निव्वळ स्वप्नरंजन आहे.** त्याला कथानक नाहीं किंवा वस्तुस्थितीशींहि त्याचा कांहीं संबंध नाहीं. स्वप्नांतील दृश्यांत जितकी संगति किंवा सत्यता असूं शकते, तितकीच या कथेंतील प्रसंगांतहि आढळेल.” (जाड टाईप माझा.) प्रत्यक्ष डोळ्यांसमोर घडत असलेल्या विलक्षण चळवळीचें वर्णन करतांनाहि माडखोलकरांना स्वप्नरंजानावाचून दुसरा मार्ग नाहीं हें लक्षांत घेतलें

असतां कलेच्या कार्याविषयीं निशिकांतानें केलेलें जें विवेचन वर दिलें आहे तें माडखोलकरांचें स्वतःचेंच विवेचन आहे याविषयीं जाणत्या वाचकाला तरी संदेह वाटण्याचें कांहींहि कारण नाहीं !

मनोविश्लेषणशास्त्र सांगतें कीं, (या शास्त्राच्या शत्रूंनीं पुन्हां एकदा मला माफ करावें !) ज्या गोष्टींची प्रत्यक्षांत सफलता होते त्या गोष्टींबद्दल मनुष्य स्वप्नरंजनाच्या मागें लागत नाहीं. जे प्रत्यक्षात प्राप्त होत नाहीं, पण व्हावें असें मात्र सारखें वाटतें असतें त्याविषयीं मनुष्य स्वप्नरंजन कारतो. आणि 'रंगीत स्वप्नसृष्टीं'त धुंद होऊन जाणारा मनुष्य जर कलावंत असला तर तो कलेच्या सृष्टींत त्या स्वप्नाचें साफल्य प्राप्त करून घेत असतो असें दिसून येतें. प्रस्तुत प्रकरणीं मनोविश्लेषणशास्त्राचा अध्वर्यु डॉ. सिग्मुंड फ्रॉय्ड याचीच आतां साक्ष काढूं. कलावंत आपल्या 'अपुऱ्या राहिलेल्या आकांक्षा' कलेच्या जगांत पूर्ण करून घेतो व 'सफल न झालेलीं स्वप्नं' कलेच्याच जगांत सफल करून घेतो या गोष्टीची फ्रॉय्डनें मानस-शास्त्रीय चिकित्सा केलेली आहे. ज्याला माडखोलकर 'स्वप्नरंजन' म्हण-तात त्यालाच फ्रॉय्डनें 'फँटसी' (phantasy) असें नांव दिलें आहे. मनुष्य स्वप्नरंजनांत गुंग होत असला तरी या स्वप्नरंजनाला पुन्हां वास्तवाचें स्वरूप देण्याचा एक मार्ग असतो असें फ्रॉय्ड सागतो. कला हा तो मार्ग होय. कलावंत हा केव्हां विकृत होईल हें सागतां येत नाहीं. प्रबळ होणाऱ्या सहजप्रवृत्तीमुळें त्याला अनेक गोष्टी प्राप्त करून घ्याव्या असें तर वाटत असतें; पण प्रत्यक्ष व्यवहारांत या गोष्टी मिळविण्याचें सामर्थ्य त्याच्याजवळ नसतें आणि साधनेंहि त्याला माहीत नसतात. म्हणून, अतृप्त इच्छापूर्ती-मुळें खऱ्या जगाकडे पाठ फिरवून स्वतःच्या साऱ्या भावना, साऱ्या वासना तो स्वप्नसृष्टींत प्राप्त करून घेऊं पाहतो. सामान्य माणसाला, म्हणजे जो कलावंत नाहीं अशा माणसाला, असल्या स्वप्नरंजनापासून फारसें समाधान मिळत नाहीं. पण तें स्वप्नरंजन कलेच्या द्वारें व्यक्त करून कलावंत त्याला वास्तवाचें रूप देतो आणि अशा प्रकारें अननुभूत सुखाची कलेच्या द्वारें प्राप्ति करून असें फ्रॉय्डच्या विवेचनाचें सार आहे. जिज्ञासूंसाठीं हें सारें आतां त्याच्याच शब्दांत देतों. फ्रॉय्ड म्हणतो,

" There is, in fact, a path from phantasy back again

fo reality, and that is–art. The artist has also an introverted disposition and has not far to go to become neurotic. He is one who is urged on by instinctive needs which are too clamorous; he longs to attain to honour, power, riches, fame, and the love of women. So, like any other with an unsatisfied longing, he turns away from reality and transfers all his interest, and all his libido, too, on to the creation of his wishes in life...... Further he possesses the mysterious ability to mould his particular material until it expresses the idea of his phantasy faithfully; and then he knows how to attach to this reflection of his phantasy-life so strong a stream of pleasure that, for a time at least, the repressions are outbalanced, and dispelled by it......then he has won–through his phantasy–what before he could only win in phantasy: honour, power, and the love of women."¶

कलावंत हा न्यूरॉटिक केव्हां होईल याचा नेम नसतो हें फ्रॉयड्चें विधान वाचून अनेक हळवे व लुसलुशीत कलावंत अपस्माराचा झटका आल्याप्रमाणें करतील यात शंका नाहीं. फ्रॉयड्चें हें विवेचन थोडेंफार अतिरंजित असावें असें मलाहि वाटतें. पण, जीवन व वाङ्मय यांतील विसंगतींचा अन्वयार्थ लावावयास यायोगें मदत व्हावयास हरकत नाहीं. फ्रॉयड्चें विवेचन ' विपर्यस्त ' ( misleading ) आहे असा डब्ल्यू. एच्. ऑडेन यानेंहि शेरा मारला आहे. तरीसुद्धां कलावंत हा निराश झालेल्या मनाला विरंगुळा उत्पन्न करण्यासाठीं कलेकडे धाव घेतो ही महत्त्वाची गोष्ट फ्रॉयडनें सांगितली आहे हें ऑडेन मान्य करतो हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ऑडेन म्हणतो, "......and he ( artist ) starts from the same point as the neurotic and the day-dreamer, from *emotional frustration*." × ( इटॅलिक्स माझे. )

---

¶ *Introductory Lectures to Psycho-analysis.*

× *The Arts To-day* (John Lane the Bodley Head), p. 4.

फ्रॉयड्नें आपल्या *Totem and Taboo* या पुस्तकांत आणखी एकदा असेंच विधान केलें आहे. "It is in the sphere of art alone, that man, consumed by his wishes, creates something akin to the gratification of these wishes."+

श्री. माडखोलकरांचें सोज्वळ जीवन व त्यांच्या कादंबऱ्यांतील उत्तान, भडक, कामुक, उद्दीपक आणि उत्तेजक शृंगार यांमधील विसंगतीची मीमांसा संपूर्णपणें आपणांस एकदम करितां आली नाहीं तरी मनोविश्लेषणशास्त्री रा. रा. फ्रॉय्ड यांच्या सिद्धान्ताचा कांहीं उपयोग होईल असें वाटतें !

## सामाजिक प्रश्न

माडखोलकरांच्या अकरा कादंबऱ्यांपैकीं सामाजिक प्रश्नांचा संबंध ज्यांच्याशीं प्रत्यक्ष आला आहे अशा तीनच आहेत. 'भंगलेलें देऊळ,' 'दुहेरी जीवन' व 'नवे संसार' या त्या कादंबऱ्या होत. तीनहि कादंबऱ्यांतून उत्पन्न होणारा मूलभूत प्रश्न खरें म्हणजे एकच आहे. विवाहानंतर पुरुष कोणत्याहि कारणामुळें दुसऱ्या एखाद्या स्त्रीकडे वळला तर पहिल्या स्त्रीनें काय करावें ? हा तो प्रश्न होय. माडखोलकरांच्या कादंबऱ्यांत या प्रश्नाचीं कोणतीं उत्तरें सापडतात हें पाहिलें पाहिजे. 'भंगलेल्या देवळां'तील अनू घटस्फोट न मागताच आपल्या नवऱ्यापासून फक्त वेगळी राहते. तिनें घटस्फोट घ्यावा असा अनिरुद्धाचा आग्रह होता. पण त्याच्यावरील आसक्ति वयोमानाप्रमाणें कमी न झाल्यामुळें अनू घटस्फोटाचा विचारसुद्धां करीत नाहीं; व स्वतःच्या मनांत कुढत बसते. अशा स्थितींत अपत्याचा प्रश्न कसा सोडवावयाचा ? इरसाल नवरा मुलांना सोडावयास तयार नसतो याचें कारण नेहमींच तो अपत्यवत्सल असतो असें मुळींच नाहीं, तर जिच्याविषयींची सारी वैषयिक अभिलाषा नष्ट झाली आहे आणि म्हणूनच जी डोळ्यांसमोर नकोशी झाली आहे अशा आपल्या पहिल्या बायकोला शक्य तितकें छळावें अशीच त्याची विचित्र इच्छा असते हेंच याचें कारण होय. ज्यांचीं लग्नें सिव्हिल मॅरेज ॲक्टा-

---

+ *Totem and Taboo* ( Pelican ), p. 144.

प्रमाणें झालीं आहेत अशा स्त्रियांची इच्छा असेल तर त्यांना घटस्फोट मागतां येतो व वाटल्यास ‘ दुसरा घरोबा ’ ( अर्थात् तारुण्य शिल्लक असल्यास ) करतां येतो; किंवा हें जर करावयाचें नसेल तर, ( शक्यता असल्यास ) स्वतःची उपजीविका स्वतःच नोकरी करून करतां येते. पण, जुन्या पद्धतीनें ज्याचीं लग्नें झालीं आहेत आणि म्हणून ज्यांना घटस्फोटाची शक्यता नाहीं अशा स्त्रियांनीं काय करावयाचें ! त्याच्यापुढें दोन मार्ग आहेत. होईल तो छळ सोसून नवऱ्याच्या घरीं सवतीच्या देखरेखीखालीं आणि आश्रयाखाली रहावयाचें किंवा नवऱ्याचें घर सोडून देऊन स्वतंत्रपणें पोट भरावयाचें. पण ती जर शिकलेली असेल तरच हें शक्य आहे. शिकलेली नसेल तर तिचे हाल विचारूंच नका ! परंतु आतां पांढरपेशा समाजांत, विशेषत: ब्राह्मण समाजांत, बहुतेक स्त्रिया शिकत असल्यामुळें त्यांना कोणत्या तरी प्रकारची नोकरी करून स्वतःचें पोट भरण्याची शक्यता निर्माण झालेली आहे. माडखोलकरांची अनू नवऱ्यापासून वेगळी राहते; पण घटस्फोट घ्यावयाची तिची इच्छा नाहीं. ‘दुहेरी जीवन’मधील सुलोचना नवऱ्याचा सारा बदफैलीपणा अगदीं डोळयांनीं दिसत असतां कोणत्याहि प्रकारें न रागावतां, त्यालाच मानवतेचें मर्म दिसलें असून आपणच हिणकस आहोंत अशी मनाची समजूत करून घेऊन ‘ जें जें होईल तें तें ’ पाहत बसते. ‘ नवे संसार ’ या कादंबरींतील मिरेची स्थितीहि अशीच आहे. विद्याधर मुक्तेकडे दिवसेंदिवस जास्तच आकृष्ट होत आहे हें तिला डोळयांनीं दिसत आहे पण स्वतःचा कांक्षेखोरपणा व्यक्त करणें किंवा मधून मधून नवऱ्याला टोंचून बोलणें याशिवाय तीही कांहीं करीत नाहीं.

खरें सांगावयाचें म्हणजे सुशिक्षित आणि संभावित समाजांतील स्त्रियांची स्थिति या बाबतींत मोठी केविलवाणी असते. स्वतःच आपलें लग्न त्यांनीं जमविलें असेल तर मामला आणखी बिघडतो. आपण शिकलेल्या व सुसंस्कृत आहोंत आणि म्हणून नवरा दुसऱ्या एखाद्या बाईशीं किंवा अविवाहित तरुण मुलीशीं फार वेळ बोलत राहिला, त्यांची सलगी वाढत चालली तरी त्याविषयीं कसलीहि कुशंका न घेतां मनाचें औदार्य प्रकट करणें त्यांना नाइलाजास्तव भाग पडतें. आणि त्यांची सलगी मर्यादेचें अतिक्रमण करूं लागली म्हणजे मग त्या बिचाऱ्यांना आपली पदच्युति

झाली आहे असें अचानक कळून येतें; आणि मग त्या कांहींहि करूं शकत नाहींत. बायका जितक्या जास्त सुशिक्षित तितकीं या बाबतींतील त्यांचीं दुःखें जास्त! दिवसेंदिवस विवाहित पुरुष आणि अविवाहित तरुण व सुशिक्षित मुली यांचा संबंध अनेक कारणामुळें जास्तच येण्यासारखी परिस्थिति उत्पन्न होऊं लागली आहे हें आपल्याला डोळ्यांसमोर दिसत आहे. अविवाहित पुरुष व अविवाहित स्त्रिया यांचा संबंध कितीहि दाट असला तरी त्या संबंधाची विवाहांत परिणति होण्यासारखी असेल तर अशा संबंधांत आक्षेपार्ह कांहींहि नाहीं. पण अविवाहित स्त्रियांचा विवाहित पुरुषांशीं संबंध आला म्हणजेच प्रश्न उपस्थित होतो. सध्यांची परिस्थिति अशी आहे कीं, निदान शहरांत आणि मोठ्या गावांत तरी, तरुण अविवाहित स्त्रियांचा विवाहित पुरुषांशीं परिचय वाढून त्याचें सलगींत रूपांतर होणें ही गोष्ट नित्याचीच झाली आहे. आतां एक प्रश्न असा उत्पन्न होईल कीं, या अविवाहित तरुण मुली अथवा स्त्रिया अविवाहितांशीं परिचय न वाढवितां विवाहित पुरुषांशींच इतका परिचय का वाढवितात? प्रश्न बिनतोड वाटेल यांत शंका नाहीं. पण याचें एक संभाव्य उत्तर असें कीं, विवाहित पुरुष या बाबतींत बरेचसे दर्दी असतात, जाणते असतात, धोरणी असतात, समयसूचक असतात. स्वतःच्या भावना अनावर होऊं न देतां अविवाहित तरुण स्त्रियांच्या भावना कशा चाळवाव्या या कलेंत ते कसबी असतात. आणि यामुळेंच अविवाहितांपेक्षा तरुण विवाहित पुरुषच बरेचसे यशस्वी होतात. असें असल्यामुळें, यापुढें तरी विवाहित स्त्रियांना दिवसेंदिवस अधिक वाढत जाण्याचा संभव असलेल्या या नवीन सकटाला तोंड देणें भाग आहे. माडखोलकरांनीं या व असल्या इतर प्रश्नांची सोडवणूक करण्याचा प्रयत्न केलेला नसला तरी त्यांनीं ज्या घटना वर्णिल्या आहेत त्यांतूनच जे प्रश्न निर्माण होत आहेत व पुढें निर्माण होण्याचा संभव आहे त्यांचा कांहींतरी विचार आपणांस करावा लागेलच. आज करावा लागला नाहीं तरी उद्या करावा लागेल!

अपत्यांचा प्रश्नहि चालू पिढींतील 'नव्या संसारां'त महत्त्वाचा होऊन बसलेला आहे. 'नवे संसार' या कादंबरींत या प्रश्नाची माडखोलकरांनीं विद्याधराच्या तोंडून थोडीशी चर्चा केलेली आहे. बालमानसशास्त्र व

मुलांच्या सर्वांगीण विकासासंबंधीं नवीन विचार यांमुळें मध्यम स्थितींतील कुटुंबाला अपत्यपोषणाचें व अपत्यांच्या शिक्षणाचें काम फार खर्चाचें होऊन बसलें आहे. चालू पिढींतील मुलांच्या हौशी आईबापांच्या उत्तेजनामुळें फार वाढल्या आहेत. त्यांच्या खाण्यापिण्यासंबंधींहि आईबापांच्या कल्पना मागच्या पिढींतील लोकांच्या कल्पनापेक्षां खूपच निराळ्या होऊं लागल्या आहेत. नानाप्रकारचे महाग खेळ व भारी खेळणीं, किंडरगार्टन, नर्सरी स्कूल इत्यादि गोष्टींचा लाभ आपल्याला मिळाला नाहीं तरी आपल्या मुलांना तो अवश्य मिळावा या सद्भावनेनें नव्या संसारांतील आईबाप मुलांसाठीं अनेक वेळां स्वत:च्या ऐपतीपेक्षां कितीतरी जास्त खर्च करतात, आणि मग खर्चाची तोंडमिळवणी करतांना ते अगदीं रंजीस येतात या साऱ्या गोष्टी अनेकांच्या अनुभवाच्या आहेत. माडखोलकरांचा विद्याधर म्हणतो, "ज्या रीतीनें आज आशाला न् आनंदाला तू वाढवते आहेस, त्या रीतीनं जर मामांनीं मला वाढवला असता, तर कदाचित् मी रानडे किंवा राधाकृष्णन् यांच्याएवढा झालों असतों! एम्. ए. होऊनहि जो मी आज शाळेंत मास्तरकी करतो आहे तो मी लहानपणीं माझी नीट काळजी न घेतल्यामुळें! तूं संध्याकाळीं रोज मुलांना पार्कमध्यें खेळायला नेतेस. माझं सारं बाळपण रस्त्यावरच्या धुळींत गोट्या खेळण्यांत न् त्याबद्दल मार खाण्यांत गेला! मुलं वाढवायच्या आपल्या नव्या शास्त्रीय कल्पनांमुळें मुलं होणं ही एक अत्यंत खर्चाची न् जबाबदारीची बाब होऊन बसली आहे अलीकडे!" ('नवे संसार,' पृ. ३६)

## पुरुषांची अतृप्तता व भोगलालसा

पुरुषांच्या भटकेपणाचे, शिकारीपणाचे, आणि अतिरिक्त भोगलोलुपतेचे कांहीं विचित्र नमुने माडखोलकरांनीं निर्मिले आहेत. आणि त्यांच्या कादंबऱ्यांतील पुरुषपात्रांचा साकल्यानें विचार केला तर हा नमुना त्यांना विशेष आवडतो असें दिसतें. अनिरुद्ध, मुकुंद, मोहन, रंगा, रतिलाल या व्यक्ति याबाबतींत विशेष उल्लेखनीय आहेत. भोगवाद हेंच यांच्या आयुष्याचें सारसर्वस्व आहे. यांच्यापैकीं अनिरुद्ध, मुकुंद, मोहन व रतिलाल यांच्या बायकांना या अतिरिक्त भोगलालसेचा आणि वैचित्र्याच्या हव्या-

साचा भयंकर त्रास झालेला आहे; व त्यामुळें त्यांचें आयुष्य व्यर्थ गेलें आहे. 'अतृप्तता हा शापच आहे मुळीं पुरुषजातीला' असें अनू म्हणते. पुरुष भटक्या आणि शिकारी असून तारुण्याची रग असेपर्यंत 'त्याला तृप्ति म्हणून कशी ती माहीत नसते मुळींच' अशी तिची तक्रार आहे. मोहननें प्रीति मनमुराद कवटाळली होती, उपभोगली होती, अव्हेरिलीहि होती. रोजला त्याच्या दृष्टींत 'अधीरता' 'अतृप्तता' याच्याखेरीज कोणताहि भाव दिसत नसे. त्याची 'निर्दय आसक्ति' आणि 'दुर्दम अतृप्तता' यांचें ती भक्ष्य बनली होती. रतिलालचा प्रणय आणि शृंगार हीं दोन्हीं इतकीं शारीरिक आणि उद्दाम स्वरूपाचीं होतीं कीं, त्यामुळें कांचनगौरीच्या प्रेमाविषयींच्या साऱ्या नाजूक भावनांचा अक्षरशः चुराडा होऊन गेला होता.

## ध्येयवादी पुरुष

चंद्रशेखर ('मुक्तात्मा'), प्रियदर्शन ('कांता'), स्वामीजी ('प्रमद्वरा'), दिनकर ('नवे संसार'), जयसिंग ('कांता') व जयंत चितळे ('कांता') हे खरे ध्येयवादी पुरुष आहेत. ध्येयवादामुळें उत्पन्न होणारी निश्चयी वृत्ति व कठोरता त्यांच्या ठायीं भरपूर आहे. तरी सुद्धा, प्रेमाबाईच्या मायाजालांत न सापडणारा करारी चंद्रशेखर ललितेच्या आकर्षणामुळें थोडा वेळ कां होईना बेचैन होतो व आपलें कर्तव्य विसरतो. प्रियदर्शन पराकाष्ठेचा ध्येयवादी असल्यामुळें आणि त्याच्या कठोर ध्येयवादाशीं समरस न होतां आल्यामुळें त्याची पत्नी कांता मनातल्या मनांत कुढते व स्वतःचा कोंडमारा करून घेते. दिनकर हा तर केवळ ध्येयपूर्तीसाठींच अविवाहित राहिला आहे. ज्याला कांहीं महत्कार्य करावयाचें आहे त्याला कोणताहि मोहपाश असतां कामा नये असें त्याचें स्पष्ट मत आहे. चंद्रशेखर, जयंत चितळे, जयसिंग व दिनकर हे सारे सशस्त्र क्रांतीच्या पंथांतील कार्यकर्ते असून स्वामीजी हे १९४२ च्या चळवळींत प्रत्यक्ष भाग घेणारे वीर आहेत. ध्येयाच्या दर्शनामुळें या साऱ्यांचींच आयुष्यें मोठी तेजस्वी झालीं आहेत. आपलें अंतिम उद्दिष्ट साधणें ही गोष्ट त्यांच्यापैकीं सर्वांनाच साधलेली नसली तरी रणांतून पळ काढणें त्यांना माहीत नाहीं एवढें मात्र खरें !

## विफल ध्येयवाद

या खऱ्या ध्येयवादी पुरुषांचीं चित्रें कांहीं मोहवश आणि दुबळ्या पुरुषांच्या सांनिध्यानें अधिकच उठावदार दिसत आहेत. वास्तविक केशव, उमाकांत, निशिकांत व विद्याधर हे सारेच ध्येयवादाला मान देणारे आहेत. पण अंगच्या कमकुवतपणामुळें व मोहवशतेमुळें ते फिके पडतात. ते कच्च्या दिलाचे आहेत, त्यांच्यांत खरा कठोरपणा नाहीं; आणि त्यामुळें स्वतःचा ध्येयवाद कृतींत उतरविणें त्यांना शक्य होत नाहीं. चंद्रशेखरचा कठोरपणा केशवच्या अंगीं नसल्यामुळें तो चटकन सुमतीच्या बाबतींत अवेळीं मोहवश होतो व आपलें कर्तव्य विसरतो. उमाकांताची हीच स्थिति आहे. ध्येयवादानें ज्याचा जीवनक्रम उध्वस्त झाला आहे असा निशिकांत लच्छीच्या सौंदर्यामुळें वेडा होतो व त्याच्या हातून त्याक्षणीं घडलेल्या अविचारीपणामुळें त्याच्या साऱ्या ध्येयवादावर पाणी पडतें. विद्याधरहि ध्येयवादी आहे; पण ध्येयवाद सफल करून घेण्यासाठीं साहस, धैर्य, कठोरपणा, करारीपणा इत्यादि जे गुण आवश्यक असतात ते त्याच्या ठिकाणीं नसल्यामुळें क्रांतीसारख्या कार्यांत त्याचा कांहींहि उपयोग नाहीं. शिवाय मुक्तेच्या बाबतींत तो अवेळीं मोहवश झाल्यामुळेंहि त्याच्या हातून कांहींहि महत्कार्य होणें शक्य नाहीं हें अगदीं स्पष्ट आहे.

या साऱ्याच व्यक्ति विफल ध्येयवादामुळें कष्टी झाल्या तर त्यांत कांहीं नवल नाहीं. ध्येयवादी जीवन हा आपल्याला एक शाप आहे असें निशिकात म्हणतो, अवेळीं मोहवश झाल्याबद्दल केशव चंद्रशेखरची क्षमा मागतो, आणि विद्याधर तर आपलें सारें जीवन विफल झालें अशी स्पष्ट कबुली देतो. ‘ जीवन विफल होण्याच्या भीतीसारखा दुसरा शाप नाहीं तरुण मनाला ’ असें तो अगदीं कळवळून म्हणतो. माडखोलकरांच्या कादंबऱ्यांत कांहीं ध्येयवादी व्यक्ति असल्या तरी ध्येयवादाचें खरें साफल्य झालेलें पाहणें त्यांच्या नशिबीं नाहीं. उलट, ध्येयवाद अनेक कारणांमुळें विफल झाल्यामुळें ज्यांना एक प्रकारची खिन्नता येणें अपरिहार्य आहे अशाच व्यक्ति त्यांनीं जास्त निर्मिल्या आहेत. विफल ध्येयवादामुळें उत्पन्न होणाऱ्या जीवनवैफल्यावर माडखोलकर इतका भर कां देत आहेत ? स्वतः माडखो-

लकरांच्या ' दोन तपें ' या आत्मचरित्रांत आलेल्या एका उद्गारांत या प्रश्नाचें उत्तर सांपडण्याचा संभव आहे असें वाटतें. १९४४ च्या मे महिन्यांत माडखोलकर साताराचे श्री. आण्णासाहेब नावर यांना स्वत: विषयीं म्हणाले होते-" आपल्याला जें तेज माझ्या लिहिण्यांत आहे असं वाटतं ना, तें खरोखरी तेज नव्हे. ती पिचलेल्या निखाऱ्यांची धग आहे नुसती ! " पुढें ते म्हणतात, " पण हीं ' दोन तपें ' वाचल्यावर तरी आतां कळून येईल कीं, मी जें हें बोलतों, त्याला कांहीं अर्थ आहे; स्वतःच्या जीवनाच्या विफलतेविषयीं माझ्या मनाला वाटणारी तळमळ या बोलांतून व्यक्त झाली आहे. " ( ' दोन तपें, ' पृ. २५१-२ ) आपलें स्वतःचें जीवन विफल झालें आहे अशी माडखोलकरांची समजूत असल्यामुळें ज्यांचें जीवन विफल झालें आहे अशा कांहीं व्यक्ति त्यांनीं निवडाव्या यांत कांहीं नवल नाहीं. आणि जें जीवनसाफल्य आपल्या बाबतींत झालें नाहीं व जो ध्येयवाद कृतींत उतरला नाहीं त्या जीवनसाफल्याचीं व सफल ध्येयवादाचीं चित्रें त्यांनीं रंगवावीं यांतहि कांहीं नवल नाहीं. पहिली गोष्ट आत्मप्रतीतीवर आधारलेली असली तर दुसरी स्वप्नरंजनात्मक समजावी. आणि म्हणूनच ' प्रमद्वरा ' कादंबरींतील स्वामीजींच्या बाबतींत माडखोलकरांनीं इतकें विलक्षण स्वप्नरंजन केलें आहे ! या विशिष्ट मनोवृत्तीमुळेंच ज्या पंधरासोळा स्त्रियांचीं चित्रें माडखोलकरांनीं रंगविलीं आहेत त्यापैकीं फक्त तीनचार अपवाद सोडून दिले तर बाकीच्या साऱ्या पराकाष्ठेच्या दुबळ्या आहेत !

## कलाविषयक दोन विरोधी मतें

कलेच्या व साहित्याच्या कार्याविषयीं ' मुक्तात्मा, ' ' शाप ' व ' नवे संसार ' या तीन कादंबऱ्यांत थोडीशी चर्चा आलेली आहे. ' मुक्तात्मा ' कादंबरींतील ललितेचें म्हणणें असें आहे कीं, मानवी जीवित हें जात्याच दु:खमय असल्यामुळें कलेच्या प्रांतांतहि तींच सारीं दु:खें दिसणें बरें नव्हे. कलेनें मानवाला त्या दु:खांचा विसर पाडून त्याच्या व्यथित मनाला विरंगुळा प्राप्त करून दिला पाहिजे. लौकिक सृष्टि अपूर्ण असते; पण

काव्यसृष्टि मात्र मानवी जीवनांतील सारी अपूर्णता नाहींशी करून ती परिपूर्ण आणि सुखमय करते. "कलावंताचा जन्म काय जगाच्या दुःखांत भर घालण्यासाठीं का आहे ? मानवी जीवित हें जात्याच मुळीं आधीं दुःखमय. कवींनीं त्या दुखांत भर घालायची कीं त्याचा भार कमी करायचा ?...या अपूर्ण जगाला पूर्णता देण्यासाठींच कलावंताचा अवतार आहे ना !" असे अनेक प्रश्न ललिता विचारते. ('मुक्तात्मा', पृ. ५८) या ठिकाणीं रंजन हेंच एक कलेचें ध्येय असलें पाहिजे असें अगदीं स्पष्टपणें म्हटलें आहे. 'शाप' मधील निशिकांत कला ही नेहमीं व्यक्तिनिष्ठ, आत्मनिष्ठच राहिली पाहिजे असें आग्रहानें म्हणतो. त्याच्या मतें खरा कलाविलास हा आत्मप्रतीतीसाठीं, आत्मविकासासाठीं असतो. हें खरें individualism आहे. ललितेप्रमाणेंच तो म्हणतो, "कला ही जीवनाची सावली नाहीं, तर त्याला पूर्णता आणण्यासाठीं धडपडणाऱ्या मानवी कल्पनेचा फुलोरा आहे. दडपून टाकलेलीं दुःखं, आवरून धरलेले अश्रु, अपुऱ्या राहिलेल्या आकांक्षा, सफल न झालेलीं स्वप्नं यांची सारी आर्तता, सौंदर्य आणि ओज कला प्रकट करते..." कलेच्या स्वरूपाविषयीं आणि कार्याविषयीं इतकें विवेचन केल्यावर कलेचा प्रचारासाठीं उपयोग करण्याचें जें धोरण समाजवादी लोकांनीं रशियांत पत्करलें त्याविषयीं निशिकांत म्हणतो, "साम्यवाद्यांनीं कितीहि गप्पा मारल्या, तरी कलेला कांहीं त्यांना आपल्या तंत्रानं राबवून घेतां येणार नाहीं. रशियानं या बाबतींत केलेला प्रयत्न फसल्यासारखा दिसत आहे आज." आणि तो पुन्हां एकदा आग्रहानें म्हणतो, "कला ही व्यक्तिनिष्ठच राहणार सदैव." ('शाप,' पृ. ९६-७) साम्यवादाचा प्रयोग करून पाहण्याची लालसा बाळगणारा हा गृहस्थ कला ही नेहमीं आत्यंतिक व्यक्तिनिष्ठच रहाणार हें जीव तोडून सांगतो आहे हें चिंत्य आहे.

कलाविलास हा आत्माविष्कारार्थ, आत्मविकासार्थ असतो; आणि जीवनांतील व्यथांचा मानवाला विसर पाडून त्याच्या गांजलेल्या मनाला विरंगुळा उत्पन्न करणें हेंच कलेचें कार्य होय असें एक मत आपण पाहिलें. या मताच्या उलट केशवचें मत आहे. केवळ काव्यानंदांत रमणें आणि संगीतमाधुरींत तरंगणें हें जीविताचें ध्येय होणें शक्य नाहीं असें त्याला वाटतें.

ज्याला खरा देशाभिमान आहे त्याला केवळ साहित्यसेवेनें कधींहि समाधान मिळणार नाहीं, राष्ट्राविषयींची आपलीं कर्तव्यें त्याला पार पाडतां येणार नाहींत इत्यादि विवेचन करून तो पुढें म्हणतो, "आयुष्य हें कांहीं केवळ पुनवेचें चांदणें नव्हे कीं, ज्यांत कमलांनीं फुलून एकमेकांचें स्पर्शसुख अनुभवीत वाऱ्याच्या झुळकेबरोबर स्वच्छंद डुलावें. आयुष्य हें किती तरी विकट आणि भीषण आहे." ('मुक्तात्मा,' पृ. ६१) केशवच्या या विचारापेक्षांहि 'चंदनवाडी'तील अवधूतचे विचार अधिक सडेतोड आहेत. समाजसुधारणेचे विचार आणि गरिबांविषयीं दया व सहानुभूति या गोष्टी असल्या म्हणजे साहित्य समाजाचें खरें हित करूं शकेल असें त्याला वाटत नाहीं. समाजात सर्व प्रकारची क्रांति घडवून आणण्यासाठीं अनुकूल भूमि निर्माण करणें हेंच साहित्याचें खरें कार्य असून तें साध्य करून घेण्यासाठीं साहित्यसेवकानें नवीं ध्येयें आत्मसात् केलीं पाहिजेत असें त्याचें स्पष्ट मत आहे. "साहित्यिक जोंवर निव्वळ भूतदया आणि सुधारणा यावर भर देत राहतील, तोंवर समाजांत क्रांतीला अवश्य असलेली ईर्ष्या उत्पन्न करण्याचें प्रभावी कार्य त्याच्या हातून होणें अशक्य आहे...... साहित्यिक हा नुसता अखबारनवीस असून भागणार नाहीं, नुसता प्रेक्षक, नुसता कथक असून चालणार नाहीं. मी त्याच्याकडे क्रांतीचा अग्रदूत, भविष्याचा द्रष्टा म्हणून पहातो." (पृ. १९८)

## साहित्याचीं नव्या युगांतील कार्यें

चालू युगाचा महिमाच असा आहे कीं, केवळ आत्मप्रकटीकरण, स्वतःच्या वैयक्तिक दुःखांचा अथवा संवेदनांचा आविष्कार, स्वतःच्या दडपलेल्या इच्छांचा आणि आकांक्षाचा सार्वजनिक उच्चार, स्वतःच्या विकृत मनोवृत्तींचें वंचक समर्थन आणि त्यांना दिलेली ध्येयवादाची झूल, क्षणिक व फसव्या सुखाच्या आहारीं जाऊन केलेला सुखवादाचा पाठपुरावा, स्वतःच्या अथवा वाचकांच्या विषयवासना चाळविण्यासाठीं केलेलीं भडक शृंगारिक वर्णनें व अशा वर्णनांपासून थोडावेळ मिळणारें फसवें समाधान इत्यादि गोष्टी साहित्याचें कार्य होऊंच शकणार नाहींत. पूर्वीं केव्हातरी स्वास्थ्य आणि सर्व प्रकारची सुबत्ता असतांना

साहित्याचीं हीं कार्यें असतीलहि. आतां सारीच परिस्थिति आमूलाग्र बदललेली आहे. आणि म्हणूनच, साहित्यांतील अमर्याद सुप्त सामर्थ्य विचारांत घेतां, साहित्यिकानें निराळीं ध्येयें आणि निराळीं कार्यें डोळ्यांसमोर ठेवलीं पाहिजेत हें ओघानेंच आलें. हें जर साहित्यिक करणार नाहींत, तर ते समाजाची व त्याबरोबरच स्वतःचीहि वंचना करून घेतील व स्वतःच्या सामर्थ्याचा विनाकारण दुरुपयोग करतील. बदललेल्या काळांतील बदललेले सामाजिक विचार, नव्या भावना, नव्या आकांक्षा, नवीं सामाजिक ध्येयें, नवीं सामाजिक दुःखें या सर्वांशीं खऱ्या अर्थानें समरस होऊन, त्यांशीं तादात्म्य पावून, त्यांच्यापासून अलिप्त न राहतां साहित्यिकानें नव्या युगाला मार्गदर्शन करावें आणि तें चुकत असल्यास, वाममार्गानें बळेंच जात असल्यास त्यास सत्पथावर आणण्याचा निदान प्रयत्न करावा. हें सारें करणें म्हणजे आपल्या प्रकृतिपेलव,सुकुमार, नाजुक, हळव्या आणि अल्लड कलाकन्यकेला भलतेंच कांहीं अवघड काम आपण सांगत आहोंत असा त्यानें वृथा गैरसमज करून घेऊं नये. कला ही फुलापेक्षांहि मृदु आहे, गोंडस आहे, सुकुमार आहे, नाजुक आहे, सारें मान्य. पण, मनोहर चंद्रिकेचें सुकुमार तेज जसें तिच्याठिकाणीं आहे त्याचप्रमाणें कडाडून दिपवून टाकणाऱ्या विजेचें अफाट सामर्थ्यहि तिच्याठायीं आहे. विजेनें डोळे दिपले तरी तिच्या त्या क्षणनष्टदृष्ट तळपेंतहि एक प्रकाणचें विलक्षण आकर्षण असतें, सौंदर्य असतें हें कोण रसिक अमान्य करील ? तात्पर्य, कलेचें सारें सौंदर्य, तिचा लडिवाळपणा, तिचा आकर्षक विलास अबाधित ठेवूनहि साहित्यिकाला नव्या सामाजिक दुःखांचा आणि नव्या सामाजिक ध्येयांचा आविष्कार करणें पूर्णपणें शक्य आहे. तें त्याच्या मनांत मात्र आलें पाहिजे. ज्यावेळीं हें त्याच्या मनांत नसतें त्यावेळीं कलेला हें काम झेपणार नाहीं, कला म्हणजे कांहीं व्यासपीठ नव्हे, तें मयूरसिंहासन आहे इत्यादि गोष्टींचा पुनरुच्चार करीत राहण्यांतच तो धन्यता मानतो.

साहित्याचीं हीं नव्या युगांतील कार्यें व ध्येयें ज्याला पटलेलीं असतील व त्या कार्यांना व ध्येयांना जो प्रामाणिकपणें शब्दस्वरूप प्राप्त करून देण्याची इच्छा बाळगीत असेल तोच चालू युगांतील खरा द्रष्टा, प्रागतिक

आणि त्या युगाचा खरा प्रतिनिधि ! श्री. भेंडे यांना मात्र माडखोलकरांचें द्रष्टेपण आणि प्रागतिकता त्यांच्या अश्लीलतेंत दिसत आहे. श्री. भेंडे यांचें हें वचन पहा. " श्री. माडखोलकर यांना मी ' आधुनिक ' पण रूढ भाषेंत ' अश्लील ' म्हणतो, तो त्यांचा गौरव आहे. कारण कुठल्याहि युगांत प्रागतिक आणि द्रष्ट्या कलाकारांना या दोन शब्दांचाच अहेर मिळाला आहे. " ( ' डाकबंगला, ' प्रस्तावना पृ. २० ) इतकें बेछूट विधान असलेली प्रस्तावना माडखोलकरांनीं आपल्या कादंबरीसाठीं मिळविली हेंच खरें द्रष्टेपण, हीच खरी प्रागतिकता, आणि हेंच नव्या युगाचें प्रतिनिधित्व !

## राजकारण

माडखोलकरांच्या एकूण अकरा कादंबऱ्यांपैकीं ' मुक्तात्मा, ' ' कांता, ' ' मुखवटे ' व ' प्रमद्वरा ' या चार कादंबऱ्या पूर्णपणें ' राजकीय ' या सदरांत पडतील. या कादंबऱ्यांत राजकीय घटनांनाच प्राधान्य आहे. इतर कादंबऱ्यांमध्यें अनेक ठिकाणीं राजकीय प्रश्नांवर चर्चा व व्याख्यानें या गोष्टी आल्या असल्या तरी त्या नैमित्तिक स्वरूपाच्या आहेत. ' नवे संसार ' या कादंबरींत दहशतवादी राजकारणांतील घटनांचीं वर्णनें असलीं तरी वरील चार कादंबऱ्यांप्रमाणें ती संपूर्णपणें राजकीय नाहीं.

वर उल्लेखिलेल्या चार संपूर्ण राजकीय कादंबऱ्या व ' नवे संसार ' ही अंशत: राजकीय कादंबरी यांतील राजकारणाचा साकल्येंकरून विचार केला तर, सामान्यत: माडखोलकर राजकीय घटनांपेक्षां राजकारणाच्या प्रश्नांवरील चर्चांना आणि वादविवादांनाच अधिक महत्त्व देतात असें दिसून येईल. राजकीय घटनांना ज्यांमध्यें प्राधान्य मिळालें आहे अशा ' मुखवटे ' व ' प्रमद्वरा ' या कादंबऱ्यांतहि प्रमाणशून्य वादविवाद व चर्चा आहेत. या कादंबऱ्यांतील राजकारणी घटनांच्या स्वरूपाचा विचार केला असतां कांहीं गोष्टी अगदीं ठळकपणें नजरेंत भरतात. ' मुक्तात्मा ' या कादंबरींत साम्यवादी व दहशतवादी राजकारण आहे, ' कांता ' या कादंबरींत सनदशीर राजकारण व दहशतवादी राजकारण यांचें मिश्रण आहे; ' मुखवटे ' या कादंबरींत मध्यप्रांतांत पहिल्या कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या कारकीर्दींत

झालेल्या राजकीय कारस्थानांचा इतिहास व गांधीजींचा दंभस्फोट या गोष्टींना प्राधान्य आहे; ' नवे संसार ' या कादंबरींत पुन्हां दहशतवादी राजकारणांतील कांहीं घटनांचें वर्णन आहे; आणि ' प्रमद्वरा ' या शेवटच्या कादंबरींत १९४२ च्या देशव्यापी चळवळींत हिरीरीनें भाग घेतलेल्या लोकांपैकीं कांहींची गांधीवादावरील श्रद्धा कशी ढासळून गेली यांचें वर्णन आहे.

दहशतवादी राजकारणांत पडलेल्या माडखोलकरांच्या व्यक्ति मूळच्या जरी कर्तृत्ववान असल्या तरी कांहीं अंगभूत दोषामुळें अथवा उणीवांमुळें आणि प्रतिकूल परिस्थितीमुळें प्रत्यक्ष भरीव असें कोणतेंहि काम त्या करीत नाहींत हें नाकारतां येणार नाहीं. कांहीं ठिकाणीं तर, जेवढी काळजी घ्यावयास पाहिजे तेवढी न घेतल्यामुळें त्यांचें बेत फसतात, व दहशतवादी राजकारणहि अपेशी होतें असें दिसून येईल. ' मुक्तात्म्यां 'तील चंद्रशेखर व ' नव्या संसारां 'तील दिनकर या जहाल क्रांतिकारकांनीं ऐन मोक्याच्या वेळीं केलेल्या चुकांमुळें त्यांच्या कारस्थानांत कसा व्यत्यय येतो हें मागें विस्तारानें दाखविलें आहे.

' मुखवटे ' या कादंबरींतील राजकारणाच्या स्वरूपासंबंधी मागें भरपूर लिहिलें असलें तरी एकदोन गोष्टींचा याठिकाणीं उल्लेख करणें आवश्यक आहे. माडखोलकरांनीं अगदीं ताज्या राजकीय घटनांवर ही कादंबरी आधारलेली आहे. अवघ्या आठ वर्षांपूर्वीं ज्या घटना घडल्या असें माडखोकरांनीं वर्णिलें आहे त्या काल्पनिक असत्या तर वादाला किंवा तक्रारीला जागा राहिली नसती. पण त्या काल्पनिक घटना नाहींत. त्या खरोखरी घडलेल्या ऐतिहासिक घटना आहेत. डॉ. खरे यांनीं मध्यप्रांत मंत्रिमंडळांतील आपल्या मुख्य प्रधानकीचा दिलेला राजीनामा ही ऐतिहासिक घटना या कादंबरीचा विषय आहे. या घटनेचा दोन्ही बाजूंनीं विचार करून केवळ सत्याविष्कार ( statement of facts ) करणें इतकीच माडखोलकरांची इच्छा असती तर त्यांनीं वर्तमानपत्रांत अथवा मासिकांत या घटनेचा सांगोपांग इतिहास लिहिला असता व शेवटीं स्वतःचा निर्णयहि दिला असता. नुकत्याच घडलेल्या महत्त्वाच्या घटनांचीं सांगोपांग चर्चा करणारीं पुस्तकें पाश्चात्य राष्ट्रांत नाहीं कां होत ! असा एखादा पुराव्यावर व कागदपत्रांवर आधारलेला इतिहास लिहावयास

माडखोलकरांना कोणी बंदी केली होती ? मग त्यांनीं तसें कां केलें नाहीं ? माझें उत्तर असें कीं, याबाबतींत जी जबाबदारी शिरावर पडली असती ती पत्करण्याचें धैर्य माडखोलकरांमध्यें नव्हतें. धैर्याचा हा अभाव त्यांना नडला यांत शंका नाहीं. आणि यामुळें शिखंडीच्या आड दडणाऱ्या प्राचीन काळच्या योद्धयाप्रमाणें ते कादंबरीच्या आड दडले आणि आपल्या मनांतील सारी मळमळ त्यांनीं काढून टाकली. आपल्याला जें कांहीं म्हणावयाचें तें तर त्यांनीं संपूर्णपणें वाचकांच्या कानांवर घातलें व आपण स्वतः तद्विषयक जबाबदारींतून मुक्त झाले. कादंबरीकाराला हें काम फार सोपें असतें. 'या कादंबरींतील सर्व घटना व सर्व पात्रें सर्वस्वीं काल्पनिक असून सत्यसृष्टींतील घटनांशीं व पात्रांशीं त्यांचा कसलाहि संबंध नाहीं' असें जाड टायपांतलें लेबल महिरपींत अगदीं पहिल्याच पानावर डकविलें कीं कादंबरीकार फडकें झटकून मोकळा होऊं शकतो. इतिहासकाराला ती करामत करतां येणें अगदीं शक्य नसतें. आणि म्हणूनच माडखोलकरांनीं डॉ. खरे यांचें प्रकरण इतिहासाच्या द्वारें न मांडतां कादंबरीच्या द्वारें मांडलें आहे. दुसरें असें कीं, अगदीं समोर घडलेल्या घटनांवर कोणाहि कादंबरीकाराला पूर्ण अपक्षपातीपणानें लिहितां येणें ही गोष्ट अशक्य आहे. कोणती तरी एक बाजू त्याला खरी वाटणें स्वाभाविक आहे. म्हणजे तो पक्षपाती ( partisan ) असणें स्वाभाविक आहे. मानवी मनाची ही मूलभूत उणीव असल्यामुळें ज्या लेखनप्रकारांत पक्षपाती राहणें हा गुन्हा ठरतो असाच लेखनप्रकार असल्या महत्त्वाच्या राजकीय घटनांच्या चर्चेसाठीं निवडावयास नको काय ? इतिहास हा तो लेखनप्रकार होय. कादंबरीकाराचे पूर्वग्रह जर दूषित असले ( आणि ते दूषित असणें अपरिहार्य आहे ! ) तर ते कादंबरींत स्वैरपणें थैमान घालणार नाहींत कशावरून ? माडखोलकरांच्या बाबतींत नेमकें हेंच झालें आहे. गांधी ही व्यक्ति व गांधीवाद यांविषयींचा त्यांचा द्वेष अत्यंत जहाल असल्यामुळें ज्या प्रकरणात गांधीजींचा बराचसा संबंध आला असेल अशा प्रकरणाची पूर्वग्रहदूषित व निर्मळ चर्चा माडखोलकरांना या जन्मीं तरी शक्य नाहीं. ते स्वतःच फार विशाल अंतःकरणाचे थोर गृहस्थ असते तरच हें शक्य झालें असतें. पण माडखोलकरांवर असा आरोप करावयास एखादा

अर्धवट माणूस सुद्धां तयार होणें शक्य नाहीं. तात्पर्य, त्यांनीं गांधीजींना इरसाल 'व्हिलन' ठरविलें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. गांधीजींना एखाद्यानें खलपुरुष म्हटलें तर मला रागावण्याचें कांहींच कारण नाहीं. पण तें भावगीतांत अथवा कादंबरींत दुसऱ्या पात्रांच्या तोंडून म्हणण्याचा भेकडपणा न करितां अगदीं स्पष्टपणें स्वमुखानें म्हणावें इतकाच माझा आग्रह आहे हें कोणीहि विसरूं नये. 'मी काय करणार ? हें कादंबरींतील अमुक पात्राचें म्हणणें आहे' अशी पळवाट कादंबरीकाराला सांपडते. आणि माडखोलकरांनीं नेमकी हीच पळवाट शोधली आहे. माडखोलकरांच्या ऐवजीं एखादा गांधीभक्त कादंबरीकार असता तर त्यानें हीच कथा अगदीं निराळ्या रीतीनें खास रंगविली असती. म्हणून माझें म्हणणें असें कीं, कादंबरीकारानें या भानगडींत पडूं नये. जो कांहीं विशेषज्ञ न्यायबुद्धीनें प्रेरित झाला असेल, स्वतःच्या प्रामाणिकपणाबद्दल ज्याची खात्री असेल, आत्मपरीक्षण (introspection) निर्भयपणें करण्याची ज्याच्यांत कुवत असेल, आणि ज्याच्यांत उच्च प्रतीचें नैतिक धैर्य वास करीत असेल अशा महानुभाव लेखकानें हें कादंबरीच्या द्वारें सुद्धां करावयास माझी हरकत नाहीं. पण तो कादंबरीकार खऱ्या अर्थानें 'महानुभाव' असला पाहिजे. माडखोलकर या अर्थानें महानुभाव आहेत असें त्यांचे चोपदार व चवरीवाले सुद्धां म्हणणार नाहींत. असलेच तर ते 'मानभावी' या पदवीचे धनी असतील ! मला अंतर्गत माहिती कांहींच नाहीं.

## साम्यवादी तत्त्वज्ञानाच्या विविध छटा

घटनांच्या वर्णनाला जिच्यांत भरपूर प्राधान्य मिळालें आहे अशी 'मुखवटे' ही एकच राजकीय कादंबरी माडखोलकरांनीं लिहिली आहे. 'प्रमद्वरा' या कादंबरींतहि घटनांना बरेंचसें महत्त्व त्यांनीं दिलें आहे. पण इतर कादंबऱ्यांत घटनांना प्राधान्य न देतां किंवा त्या घटनांच्या मागें असलेल्या व्यक्तींचाहि फारसा विचार न करतां राजकीय विषयांवरील चर्चांच्या रूपानें माडखोलकरांनीं आपलें राजकारण प्रकट केलें आहे. राजकीय विषयांवरील मुद्देसूत चर्चा हा त्यांच्या राजकीय व बिनराजकीय

अशा सर्वच कादंबऱ्यांचा ठळक विशेष सांगतां येईल. अगदीं वादमंडळांत बसलेल्या व्यक्ति ज्या तयारीनें वादविवादाला बहर आणतील त्याच तयारीनें माडखोलकरांच्या कादंबऱ्यांतील पात्रें वादविवादाला बहर आणतात. राजकारणांतील अनेक प्रश्नांची व विवाद्य विषयांची चर्चा आपल्याला या कादंबऱ्यांतून वाचावयास मिळेल. क्रांतीचें महत्त्व व दहशतवादाचें महत्त्व या गोष्टी त्यांच्या कांहीं जहाल क्रांतिकारक पात्रांनीं वेळोवेळीं वर्णिल्या असल्या तरी त्यांनाहि आपल्या मार्गाच्या परिणामकारकतेबद्दल शंका वाटू लागते व ते साम्यवादाचा किंवा समाजवादाचा पुरस्कार करूं लागतात असें दिसून येईल. माडखोलकरांचीं मुख्य पात्रें समाजवादी आहेत ( किंवा समाजवादाचा पुरस्कार करतात ), त्याचप्रमाणें गौण पात्रेंहि समाजवादी विचारसरणीचीं आहेत. ' मुक्तात्म्या 'मधील चंद्रशेखर हा क्रांतिकारक नायक समाजवादी आहे, आणि गुप्ते मास्तरहि समाजवादी आहेत. समाजसत्तावादाचा प्रसार करावयास प्रचलित काळ अत्यंत अनुकूल आहे असें चंद्रशेखरला वाटतें. पण टॉल्स्टॉय, रस्किन, मॉरिस, ओवेन इत्यादि ' अर्धवट ' इसमाचा समाजवाद त्याला नको; तर नवीन समाजवाद पाहिजे. साम्यवाद हा देशाचा उद्धार करण्यासाठीं एकच मार्ग उरला आहे असें चंद्रशेखरला खात्रीनें वाटतें. सुशिक्षित मुलींना ' समाजसत्तावाद या नावाची एखादी चीज जगांत आहे ' याचा सुद्धां पत्ता नसतो याबद्दल त्यानें आपला संताप व्यक्त केला आहे. ललितेचे वडील भगवंतराव यांचाहि टॉल्स्टॉय व मार्क्स यांच्या वाचनानें समाजसत्तावादावर विश्वास बसलेला आहे. ' शाप 'मधील निशिकांताला ' साम्यवादाचा प्रयोग ' करून पहावयाचा आहे. त्याला साम्यवाद पटलेला असला तरी कम्युनिस्ट भाईशीं मात्र त्याचे तीव्र मतभेद आहेत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तो ' प्रथम महाराष्ट्रीय आहे आणि नंतर साम्यवादी आहे.' त्याचें या बाबतींतील भाष्य महत्त्वाचें असल्यामुळें विस्तारानें देतों. निशिकांत म्हणतो, " स्वत:चा टीचभर देश शेंकडों वर्षे पारतंत्र्यांत खितपत पडला असतां जगांतल्या साऱ्या कामगार वर्गाच्या बंधमोचनाच्या वल्गना करणं रुचत नाहीं माझ्या महाराष्ट्रीय मनाला.—मला माझा देश हवा, माझी भाषा हवी, माझा इतिहास हवा, माझी संस्कृति हवी आणि त्या सगळयांच्या उन्नतीच्या,

विकासाच्या आड जे निर्बंध येत आहेत ते तोडून टाकण्यासाठीं साम्यवाद हवा......मला साम्यवाद हवा तो हिंदुस्थानच्या परिस्थितीला लागू पडणारा हवा; रशियन जमिनींत रुजलेलं विदेशी रोपडं नको!—महाराष्ट्राच्या प्रत्येक गोष्टीचा अभिमान वाटतो मला." ('शाप,' पृ. ८६) 'मुखवटे' या कादंबरींतील बदफैली व व्यसनी मोहनसुद्धां समाजवादाचा कळकळीचा पुरस्कर्ता आहे आणि आपल्या प्रेयसीला 'समाजवादाची संथा देण्यासाठीं त्यानें एक ग्रंथालयच आपल्या अभ्यासिकेंत उघडलें' आहे. 'चंदनवाडी'-तील सिराज अवधूतला 'कम्युनिस्ट' म्हणतो. पण स्वतःला कम्युनिस्ट म्हणवून घेणें अवधूतला पसंत नाहीं. तो समाजवादी विचारसरणीचा असला आणि समाजवादी चळवळींत तो भाग घेत असला तरी आपण कम्युनिस्ट ठरत नाहीं असें त्याचें म्हणणें आहे. कम्युनिस्ट होणें म्हणजे 'स्वतःच्या देशाच्या दास्यमोचनासाठीं बाहेरल्या एखाद्या पक्षाच्या तोंडाकडे पहाणं होय' असें त्याला वाटतें. रशियांतून येणाऱ्या किंवा कम्युनिस्ट पक्षांतून सुटणाऱ्या फर्मानानुसार आपलें राजकारण चालवणें धोक्याचें व परप्रत्ययनेय बुद्धीचें द्योतक आहे असें म्हणून समाजवादाच्या आवश्यकतेविषयीं तो म्हणतो, "समाजवादाचा एक उपयोग अगदीं निर्विवाद आहे. धार्मिक आणि जातीय उच्चनीचतेनं आणि यादवीनं ग्रासलेल्या या देशांत व्यक्तिमात्राला समान संधि आणि समान हक्क देणारा समाजवाद हाच सर्व जनतेला राष्ट्रीयतेच्या एका समान भूमिकेवर आणूं शकेल." ('चंदनवाडी,' पृ. १५१–२) अवधूतला नुसती राजकीय किंवा नुसती आर्थिक क्रांति नको असून त्याला 'सर्वांगीण राष्ट्रीय क्रांति' पाहिजे आहे. अशी सर्वांगीण राष्ट्रीय क्रांति झाल्याशिवाय या भरतखंडांत 'नवे मानव्य' व 'नवी विश्वसंस्कृति' उत्पन्न होणार नाहीं असें त्याला वाटतें. (कित्ता, पृ. १५५) या राष्ट्रीय क्रांतीच्या कल्पनेचा पुनरुच्चार 'प्रमद्वरा' कादंबरींतील स्वामीजींनी केला आहे. स्वामीजींना मार्क्सवाद अपुरा वाटतो. मार्क्सवादाची मौलिक उपयुक्तता त्यांना अंशतः मान्य आहे. पण प्रचलित परिस्थितींत सर्व प्रकारच्या विषमतेवर त्वेषानें शस्त्र धरणारा 'राष्ट्रीय क्रांतिवाद' आवश्यक आहे असें त्यांना वाटतें. शेवटीं ते म्हणतात, "मार्क्सवादातल्या निरात्मक भौतिक समतेपेक्षां आपल्या

उपनिषदांतला अध्यात्मिक समतावाद हा सगळ्याच दृष्टींनीं अत्यंत उच्च आणि पूर्ण आहे." ('प्रमद्वरा,' पृ. ३४).

तात्पर्य, माडखोलकरांच्या कादंबरींतील व्यक्तींना साम्यवाद किंवा समतावाद किंवा समाजवाद हें तत्त्व हिंदुस्थानातील प्रचलित परिस्थितींत आवश्यक आणि हितकर वाटत आहे. पण हा साम्यवाद विविध रूपांनीं नटलेला आहे हें मात्र वाचकांनीं विसरूं नये. चंद्रशेखरचा दहशतवादी समाजवाद, निशिकांताचा व्यक्तिनिष्ठ समाजवाद, अवधूतचा सर्वांगीण क्रांति करूं पाहणारा समाजवाद व स्वामीजींचा अध्यात्मिक समाजवाद इत्यादि अनेक रंगच्छटा या समाजवादामध्यें सहज दिसतात व त्यामुळें आपलें मन हरखून जातें.

## मतैक्याचा एकमेव विषय

माडखोलकरांच्या पात्रांचे समाजवादाच्या स्वरूपाविषयीं कितीहि मतभेद असले तरी या सर्व ध्येयवादी पुरुषाचा आणि बाकीच्या ध्येयशून्य किंबहुना भोगलंपट पात्रांपैकीं बहुतेकांचें एका बाबतींत विलक्षण मतैक्य आहे हें लक्षांत ठेवण्यासारखे आहे. गांधीजींची कुत्सित हेटाळणी हा मतैक्याचा एकमेव विषय आहे. 'गोखले आणि टॉलस्टॉय यांच्या परस्परविरोधी मतांची भेसळ करून तीं मतं आपलीं म्हणून सांगत फिरणारा विक्षिप्त मनुष्य' असें अतिजहाल क्रातिकारक गांधीजींचें चंद्रशेखर वर्णन करतो. 'अन्यायावर आणि विषमतेवर भूतदयेची झिलई चढलेली दिसली कीं, त्याच्या भूतदयेनं द्रवणाऱ्या मनाचं समाधान होतं' असेंहि त्याचें म्हणणें आहे. 'शाप'मधील निशिकांताची गांधीजींच्या मार्गावरील श्रद्धा पार नष्ट झालेली आहे. कायदेभंगाच्या चळवळीमुळें भावनावश तरुणाच्या आयुष्याचा कायमचा चिचका झाला अशी त्याची तक्रार आहे. 'काता' या कादंबरींतील सर महादेव ठाकुरांचा गांधींच्या मार्गावर मुळींच विश्वास नाहीं. त्यांच्या मार्गानें जाण्यांत देशाचें कल्याण नाहीं असें त्यांना खात्रीपूर्वक वाटतें. गांधीजींची धार्मिकता त्यांना तिरस्करणीय व दांभिक वाटते. पण सरसाहेबांना गांधीजींच्या खाजगी जीवनाविषयीं आदर आहे. फक्त त्यांच्या राजकीय चारित्र्यावर त्यांचा आक्षेप

आहे. ' लोकांची प्रतारणा करण्याच्या बाबतींत ' गांधीजींनीं युरोपांतल्या ' निढावलेल्या मुत्सद्यांवरहि ताण ' केल्यामुळें सर महादेव यांना गांधीजींचें राजकीय चारित्र्य मान्य नसलें तरी त्यांचें खाजगी जीवन अत्यंत शुद्ध आहे अशी त्यांची खात्री आहे. पण सर महादेव इतकें जपून बोलले तरी त्यांच्या परिवारांतील इतर माणसांच्या ठायीं समतोलपणा नाहीं. ' मानवी विकृतीचा एक अजब नमुना ' असें जयसिंग गांधीजींचें वर्णन करीत आहे. ' एकीकडे ब्रम्हचर्यावर प्रवचनं झोडायचीं न् दुसरीकडे तरुण शिष्यिणीं-कडून शरीरसेवा करून घ्यायची ' गाधीजींची पद्धति त्याला आक्षेपार्ह वाटते. सर महादेवाचे चिरंजीव बॅ. राधामोहन यांनीं गांधीजींना ' रास-पुतीन ' ही पदवी मोठ्या प्रेमानें बहाल केली आहे. गांधीजींना लैंगिक चर्चेविषयीं विलक्षण हव्यास वाटतो, स्त्रीसहवासाविषयींची त्यांची आसक्ति अनावर आहे आणि आपल्या प्रत्येक कृतीला धार्मिक स्वरूप देऊन स्वत:चें माहात्म्य पद्धतशीर रीतीनें वाढविण्याचा त्याचा सतत प्रयत्न चाललेला असतो याहि बॅ. राधामोहन यांच्या गांधीजींविषयीं आणखी तक्रारी आहेत.

पण गांधीजी व त्यांचें तत्त्वज्ञान यांवरील सर्वांत महत्त्वाची व प्रखर टीका ' मुखवटे ' या कादंबरींत अंतर्भूत झाली आहे. प्रियदर्शन हा या कादंबरीचा धीरोदात्त नायक असून गांधीजी हे अत्यंत हीन मनोवृत्तीचे अहंकारी व्हिलन आहेत हें अगदीं स्पष्ट आहे. या कादंबरींतील उत्तमराव या पात्राच्या द्वारें माडखोलकरांनीं गांधीजींना शिव्या देण्याची आपली सारी हौस पूर्णपणें भागविली आहे व आपल्या क्षुद्र, विकृत मनाचें उत्तान प्रदर्शन केलें आहे. इयागोपेक्षांहि गांधी ही व्यक्ति कितीतरी भयंकर नीच आहे अशी समजूत ही कादंबरी वाचून एखाद्या अनभिज्ञाची होईल. गांधीजींच्या ठायीं कसलाहि गुण नाहीं, व अनेक दुर्गुणांचे ते मूर्तिमंत पुतळे आहेत असाच समज माडखोलकरांनीं अत्यंत कलात्मक रीतीनें आपल्या पात्रांच्या द्वारें या कादंबरींत निर्माण केला आहे व हें सारें जाणूनबुजून केलें आहे. जिच्यांत सद्‌गुणाचा अंशहि नाहीं अशी व्यक्ति कादंबरींत अथवा नाटकांतहि रंगवूं नये असें टीकाकार सागतात. आणि येथें सत्यसृष्टींतील एक अत्यंत महत्त्वाची व्यक्ति संपूर्णपणें दुर्जन आहे

असें माडखोलकरांनीं वर्णिलें आहे. यालाच अभिजात आणि थोर कला म्हणतात! 'द्रष्टेपण' म्हणून जें कांहीं असतें तें हेंच! वास्तविक, सत्य-सृष्टींतील व्यक्तींचे फोटोग्राफ तयार करणें हें कलावंताचें काम नव्हे. सत्यसृष्टींतील आपल्यासमोर असलेल्या व्यक्तींचे फोटोच काढावयाचे असतील तर त्याला ललितवाङ्मयाचें माध्यम कशाला? चरित्र हें माध्यम यासाठींच आहेच. आणि स्वत: गांधीजींनीं आपलें चरित्र पराकाष्ठेच्या प्रामाणिकपणानें लिहिलेलें उपलब्ध नाहीं काय? माडखोलकरांनीं खरें म्हणजे गांधीजींचें चरित्र लिहावयास पाहिजे व गांधी व्हिलन आहेत ही गोष्ट तमाम लोकांना कळावी यासाठीं प्रसिद्ध भाषातून त्याचीं भाषातरें करवून घ्यावयास पाहिजेत. पण प्रामाणिकपणाची देणगी ज्यांना अगदीं सुमारच लाभलेली आहे आणि शुद्ध नैतिक धैर्यामुळें उत्पन्न होणारा निर्भयपणा ज्यांच्या ठायीं बेताचाच आहे असे माडखोलकरांसारखे गृहस्थ हें काम या जन्मांत करूं शकतील कीं काय याविषयीं जबर शंका वाटते हें कबूल केलें पाहिजे. सत्यसृष्टींतील एखादी व्यक्ति कादंबरींत जशीच्या तशी फोटोग्राफरप्रमाणें चित्रित करणें हें कादंबरीकाराचें काम नव्हे असें जें मी वर म्हटलें आहे ते माझें म्हणणें एखाद्याला पटणार नसेल तर प्रसिद्ध इंग्लिश टीकाकार सर आर्थर क्विलर–कूच याच्या शब्दांत तें मांडतों. "For in truth it is not the way of the imaginative artist: and if the reader will not take that from me he may take it from Aristotle. Poetry never works on photographs, but on hints; never on persons, on individuals..............."¶

आतां 'मुखवटे' कादंबरींतील गांधीनिंदेकडे वळूं. मोहनसारख्या इरसाल बदफैली बदमाषाचाहि गांधीवादावरील विश्वास उडाला आहे असें आपल्याला सुरवातीलाच कळतें. उत्तमरावांचा गांधींच्या सत्य–अहिंसेवर फार राग आहे. त्याचें तत्त्वज्ञान आपल्याला कधींच पटलें नाहीं व त्यांचें व्यक्तित्व आपल्याला कधींच आकर्षक वाटलें नाहीं; गांधींच्या गोतावळ्यांत जिकडे तिकडे ढोंगीपणा बोकाळलेला आहे; त्यांच्या चळवळीचें अंतरंग हिडिस

---

¶ *Shakespeare's Workmanship, chap XVII..*

आहे; सत्य आणि आणि अहिंसा हे लोकांना फसविण्यासाठीं केवळ मुखवटे आहेत; हिंदुस्थानांतील अडाणी व अंधश्रद्ध लोकांना झुलविण्यासाठीं फार उपयोगीं पडतो म्हणून गांधींनीं संतपणाचा मुखवटा तोंडावर चढविला आहे; त्याचें राजकारण म्हणजे पद्धतशीर कौटिल्य व ढोंग आहे; स्टॅलिन, मुसोलिनी व हिटलर यांच्यापेक्षांहि गांधी फारच घोटीव अरेराव आहे; त्यांचें मन क्षुद्र असून ते पराकाष्ठेचे अहंकारी आहेत; ते पक्षपाती आहेत; आपल्या विश्वस्त गटांच्या अरेरावीकडे ते दुर्लक्ष करतात; ढोंगी आणि अरेरावी गांधीयुगाची हयात वाढण्यापेक्षां देशात अराजक माजलेलें पुरवलें —इत्यादि सिद्धात महान राजकारणी पुरुष राजेश्री उत्तमराव तावातावानें सांगत आहेत. प्रियदर्शन मधूनमधून गांधीजींची स्तुति करून त्यांच्या अनुयायांची निंदा करतो हें खरें असलें तरी हे सारें सिद्धसाद्धकांप्रमाणें अथवा व्यवहारांतील दृष्टांत द्यावयाचा झाल्यास मोटारड्रायव्हर व क्लीनर यांच्या संवादाप्रमाणें वाटतें. गाडी ओव्हरलोड झाली असली आणि वाटेंत एखादें अडलेलें गिऱ्हाईक जागेसाठीं आर्जवें करूं लागलें म्हणजे ड्रायव्हर आणि क्लीनर यांचे उलटसुट मुद्दे सुरू होतात. त्या गिऱ्हाइकाला गाडींत बसवावयाचें हें दोघाचेंहि मनोमन ठरलेलें असतें. पण आविर्भाव असा आणतात कीं काहीं विचारूं नका. शेवटीं केवळ क्लीनरच्या आग्रहास्तव ड्रायव्हर त्या नडलेल्या गिऱ्हाइकाला जागा देऊं करतो. तसेंच येथेंहि झालें आहे. प्रियदर्शन गांधींविषयीं जें कांहीं बरें बोलतो तें उत्तमरावाला गांधींची अधिक टवाळी करण्यासाठीं केवळ निमित्त म्हणूनच उपयोगीं पडतें हें स्पष्ट दिसतें. शेवटीं प्रियदर्शनहि गांधींची व त्यांच्या तत्त्वज्ञानाची भरपूर निंदा करतो. त्यांचें राजकारण त्याला आत्मनिष्ठ व लहरी वाटूं लागतें व त्याचें तत्त्वज्ञान प्रतिगामी वाटूं लागतें. त्यांच्या नेतृत्वाचा आजच्या शास्त्रीय युगांत विशिष्ट मर्यादेपलिकडे उपयोग होणें शक्य नाहीं असें तो म्हणतो.

नेमके हेच विचार ‘ नव्या संसारां ’ तील दिनकरसुद्धां प्रकट करतो. “ गाधीवादाचं हिंदी राजकारणांतलं कार्य संपलंय आता” असें तो म्हणतो. तोंडानें आत्यंतिक कृतीची भाषा बोलावयाची व दुसरीकडे आपल्या शब्दावर झुलणाऱ्या जनतेला निष्क्रियतेच्या पराकोटीला न्यावयाचें हा गांधीवादी नेतृत्वाचा नमुना त्याला अजब वाटतो. गांधींची अहिंसासुद्धां पराकाष्ठेची

अघोरी आहे असें त्याचें मत आहे. ' प्रमद्वरा ' कादंबरींतील स्वामीजींनाहि गांधीवादाची अशास्त्रीयता आणि अपूर्णता अगदीं स्पष्ट दिसत आहे. गांधींनीं आपल्या अहंनिष्ठ, साक्षात्कारी पद्धतीनें सुरू केलेली ( ४२ची ) अशास्त्रीय चळवळ यशस्वी होणें शक्य नाहीं अशी त्यांची खात्री आहे.

## कादंबऱ्यांतील चर्चा

माडखोलकरांच्या कादंबऱ्यांतील राजकारणी घटनांचे व राजकारणी वादविवादांचें हें असें स्वरूप आहे. प्रचलित काळीं आपलें जीवन अंतर्बाह्य राजकीय झालें असल्यामुळें कादंबऱ्यांतून राजकारणी घटना व राजकीय प्रश्न येणें अगदीं अपरिहार्य आहे हें माझेंहि ठाम मत आहे.* पण पूर्वग्रहदूषित, अभिनिविष्ट, व प्रचारकी थाटाच्या राजकारणी चर्चा येवढेंच कादंबरीचें स्वरूप राहूं नये असें मला वाटतें. दुसरें असें कीं, कादंबरींत चर्चा व वादविवाद यांनाच प्राधान्य मिळून प्रत्यक्ष राजकीय घटना व त्यांच्या मागें असलेल्या व्यक्ति यांच्याकडे लेखकाचें दुर्लक्ष होतां कामा नये. लेखकाचें सगळें चित्त व्यक्तींमध्यें केंद्रित झालें असलें पाहिजे. केवळ घटनांचें अलिप्तपणें केलेलें वर्णन कितीहि कलात्मक असलें आणि व्यक्तींविषयीं जर त्याला आपुलकी वाटली नाहीं तर त्या घटनांच्या वर्णनांत कांहींहि जीव नसतो. पण नुसत्या वादविवादाविषयीं आणि चर्चाविषयीं एखाद्यानें आक्षेप घेतला तर तें अगदीं समर्थनीय आहे. स्थळकाळनिरपेक्ष व व्यक्तिनिरपेक्ष ' व्यासपीठी ' व्याख्यानांवर व चर्चांवरच माझा खरा आक्षेप आहे. कादंबरी म्हणजे वसंतव्याख्यानमालेचा अहवाल नव्हे. अथवा कौन्सिलांतील भाषणांचा सरकारी रिपोर्ट नव्हे. वादविवादच करावयाचे तर त्याला कादंबरी हें माध्यम कशाला? गुरुशिष्यसंवादांसारखे आधुनिक राजकीय संवाद स्वतंत्रपणेंच लिहावेत. घटनांतून अपरिहार्यपणें उत्पन्न झालेले जेवढे वाद असतील तेवढयाच वादांना कादंबरींत योग्य स्थान आहे. केवळ एखाद्यानें सहज विषय काढावा, त्यावर पूर्वपक्ष उत्तरपक्ष व्हावे, नवीन एखादा प्रश्न निघावा आणि पुन्हां नवीन चर्चा सुरू व्हावी

---

* मागें पृष्ठ १६४ पहावें.

असले दिवाणखानी वादविवाद कादंबरींत किती यावेत याला कांहीं सुमार आहे कीं नाहीं ? आपलें जीवन राजकारणी झालें आहे हें मान्य, आपण अनेक वेळां राजकीय प्रश्नांवर भरपूर वाद करतों हेंहि मान्य. पण हे वादविवाद कादंबरींत प्रविष्ट झाले म्हणजे त्यांच्यावर कादंबरीच्या तंत्राची हुकमत सुरू होते हें कोणीहि विसरूं नये. आणि केवळ याच दृष्टीनें मी माडखोलकरांच्या अनेक कादंबऱ्यांतील चर्चांवर व व्याख्यानावर आक्षेप घेतला आहे. याबाबतींत गैरसमज होण्याचें कांहीं कारण आहे असें मला वाटत नाहीं.

## माडखोलकरांचें वाङ्मयीन यश

श्री. माडखोलकर स्वतः टीकाकार आहेत. इतरांच्या ललितवाङ्मयावर टीका करीत असतांना वाङ्मयीन मूल्यांविषयीं त्यांचीं कांहीं मतें वेळोवेळीं प्रकट झालीं आहेत. त्याचप्रमाणें कलेच्या कार्याविषयीं व उद्दिष्टांविषयींहि त्यांनीं कांहीं ठिकाणीं चर्चा केलेली आहे. साहित्याचा जीवनाशीं कसा व किती संबंध असावा, कला आणि नीति यांचा अन्योन्यसंबंध कोणता याहिविषयीं त्यांनीं प्रकट केलेलीं मतें जाणत्या वाचकांच्या परिचयाचीं आहेत. माडखोलकरांना जीं कलाविषयक मूल्यें मान्य असावीत असें त्याचें एतद्विषयक लेखन वाचून माझा ग्रह झालेला आहे त्यांचा निकष मीं प्रस्तुत प्रबंधांत अनेक ठिकाणीं खुद्द त्यांच्याच कादंबऱ्यांच्या बाबतींत वापरला आहे हें मार्मिक वाचकांच्या सहज ध्यानात येईल. कलेच्या प्रयोजनाविषयीं व कार्याविषयीं त्यांनीं प्रणीत केलेले सिद्धान्त व प्रत्यक्ष त्यांच्या कलाकृति याचा कितपत मेळ बसतो हें कोणीहि तपासून पहावें. श्री. माडखोलकर हे आज तरी महाराष्ट्रांतील अव्वल दर्जाचे कादंबरीकार असल्यामुळें त्याच्या ललित लेखनाचें महत्त्वमापन करीत असतां कोणाहि टीकाकारानें जागरूकच रहावयास पाहिजे असें मी म्हटलें तर माडखोलकराचे खरे आणि खोटे भक्त रागावणार नाहींत असें वाटतें.

माडखोलकराच्या या अकरा कादंबऱ्या १९३३ ते १९४३ या अकरा वर्षांच्या कालखंडांतील आहेत. या कालखंडांत महाराष्ट्रांत व हिंदुस्थानात फार महत्त्वाच्या घटना घटल्या. या घटनाचें माडखोलकरांनीं वर्णन केलें आहे हें खरें असलें तरी त्यांमध्यें त्यांना जिव्हाळा वाटतो असें दिसत नाहीं.

गांधीवादावर प्रखर टीका करून त्यानीं समाजवादाचा पुरस्कार केला आहे. पण समाजवादी चळवळीचें अंतरंग दाखविणें त्यांना शक्य नसल्यामुळें हें सारें तोंडपाटिलकीप्रमाणें वाटतें. स्वतःच्या आयुष्यांत ज्या जीवनवैफल्याच्या भावनेनें ते तळमळत आहेत ('दोन तपें,' पृ. २५२) त्याच जीवनवैफल्याचा त्यांचे अनेक नायकहि अनुभव घेत आहेत, आणि यामुळें त्यांच्या हातून कोणत्याहि क्षेत्रांत कसलेंहि महत्कार्य झालेलें आपणांस दिसत नाहीं.

वासनाशून्य प्रेमाच्या मागें लागलेला पुरुष अथवा स्त्री, भोगलंपट व स्त्रीच्या भावनांकडे दुर्लक्ष करणारा चंडोल, पुरुषाच्या इच्छेपुढें मान तुकविणारी व त्याच्या भोगलालसेला बळी पडल्यामुळें जिच्या मनाचा विलक्षण कोंडमारा झालेला आहे अशी आधुनिक सुशिक्षित स्त्री, व ज्याला आयुष्यांत कोणतेंच महत्कार्य पूर्णपणें तडीस नेतां आलें नाहीं असा ध्येयवादी पुरुष हे माडखोलकरांच्या कादंबऱ्यातील व्यक्तींचे मुख्य नमुने होत. या नमुन्यापैकीं प्रियदर्शन, अनू, चंद्रशेखर, कांता, सुहास, मुक्ता हीं स्वभावचित्रें उत्कृष्ट उतरलेलीं आहेत. 'नवे संसार'मधील विठोबा आणि 'चंदनवाडी'तील येसू व रखमा हीं स्वभावचित्रेंहि अप्रतिम आहेत. पण हें कबूल केलें तरी माडखोलकरांनीं असामान्य मन असलेली व असामान्य कर्तृत्व असलेली एकहि व्यक्ति निर्माण केली नाहीं हेंहि मान्य करावयास पाहिजे. तें त्याच्या आटोक्याबाहेरचें आहे. प्रचलित राजकीय घटनाचें त्यांनीं कलात्मक वर्णन केलें असलें तरी ज्याला courage of conviction म्हणतात तें त्यांच्याठायीं नसल्यामुळें गांधीवादाच्या विध्वंसनाचें काम करून त्यांची लेखणी विराम पावली आहे. विध्वंसनानंतर नवीन गोष्टीची प्रतिष्ठापना झालीच पाहिजे. आणि कोणत्याहि नवीन तत्त्वज्ञानाच्या प्रतिष्ठापनेसाठीं जे गुण आवश्यक असतात ते माडखोलकरांमध्यें नसल्यामुळें कादंबरीच्या द्वारें समाजवादाचा अथवा इतर कोणत्याहि तत्त्वज्ञानाचा केवळ शाब्दिक बडिवार माजविण्यापलिकडे त्याना कांहींहि करतां येणें शक्य नाहीं. आणि यामुळेंच समाजवादाचें महत्त्व वर्णन करण्यापलिकडे त्याचीं प्रमुख पात्रें सुद्धां कांहींहि विशेष करीत नाहींत असें दिसून येईल. तात्पर्य, माडखोलकर द्रष्टे नाहींत अथवा प्रचलित

काळाचे प्रतिनिधि सुद्धां नाहींत. ते या काळांतील घटनांचे केवळ 'अखबार-नवीस' आहेत असें म्हटल्यास कांहींहि वावगें होणार नाहीं. क्वचित् एखादा थोर विचार त्यांच्या एखाद्या पात्राच्या तोंडून बाहेर पडला असेल, नाहीं असें नाहीं. पण तो विचार केवळ नैमित्तिक समजावा. त्या थोर विचाराचा संपूर्ण विस्तार करून तो विचार प्रत्यक्ष कृतींत उतरविणाऱ्या व्यक्ति निर्माण करण्याचें कार्य माडखोलकरांनीं केलेलें नाहीं. त्यांच्या वैचारिक आणि कलात्मक मर्यादांमुळेंच त्यांना हें शक्य झालें नाहीं. तरीसुद्धा, उत्कृष्ट शैली, कांहीं उत्कृष्ट व मार्मिक स्वभावचित्रें, भावनाचें सूक्ष्म आविष्करण व सूक्ष्म अवलोकन इत्यादि गुणांमुळें त्यांच्या कादंबऱ्यांचें वाङ्मयीन यश मराठी कादंबरीच्या क्षेत्रात खास डोळयांत भरण्यासारखें आहे. त्यांच्या कलेचा उत्कर्ष-बिंदु येऊन गेला आहे. खरें म्हणजे त्यांची सारी कला 'चंदनवाडीं' तच संपली. जिच्यात मानवी भावनांचें अत्यंत उत्कृष्टपणें आविष्करण केलें आहे, व जिच्यांत पहिल्या दर्जाच्या दोन व्यक्तिरेखा आहेत अशी 'चंदनवाडी' ही कलादृष्ट्या महत्त्वाची कादंबरी लिहिल्यानंतर कलादृष्ट्या व विचार-दृष्ट्या अगदीं सामान्य असलेली 'प्रमद्वरा' ही कादंबरी माडखोलकरानीं लिहिली हा त्यांची खरी कला वयस्क व कमकुवत झाल्याचाच पुरावा आहे. यापुढें माडखोलकर कादंबऱ्या लिहिणार नाहींत असें नाहीं. कदाचित् पूर्वीच्या कांहीं कादंबऱ्यातील कला व विचार यापेक्षां अधिक उत्कृष्ट कला व थोर विचार ते प्रकट करतील. हें शक्य असलें तरी असें होईलच अशी खात्री मात्र देतां येत नाहीं. कारण त्यांचें कलात्मक कर्तृत्व आतां संपलें आहे असें मला वाटतें. आणि कदाचित् त्यांच्या कलेचें अधिक उज्ज्वल व आकर्षक स्वरूप यापुढें एखाद्या कादंबरींत दिसून आलेंच तर त्यांचें मनापासून अभिनंदन करावयास व त्यांचें कौतुक करावयास मी प्रथम पुढें येईन !